# गांधी-तत्त्वज्ञान

[ मूळ ग्रंथात १९४७ पर्यंत भर घालून अद्यावत् केलेला ]


अनुवादक

शशिशेखर केसरीनाथ वेदक

मूळ संग्राहक

श्री रामनाथ 'सुमन'



प्रकाशक:

धी महाराष्ट्र-ग्रंथभांडार, लि., मुंबई नं. ४.

## संकेत शब्दांचें स्पष्टीकरण.

यं. इं.—'यंग इंडिया.'
न. जी.—'नवजीवन.'
हिं. न. जी.—'हिंदी नवजीवन.'
ह. ज.—'हरिजन.'
ह. बं.—'हरिजन बंधु.'
ह. से.—'हरिजन सेवक.'
आ. क.—'आत्मकथा.'

---

सन १९४७

मूल्य ३॥ रुपये

---



मुद्रकः—मि. सी. एन्. रामन्, 'न्यू जॅक् प्रिं. वर्क्स' लि., परेल–मुंबई
प्रकाशक—शं. वा. कुलकर्णी, महाराष्ट्र-ग्रंथभांडार, लि., गिरगांव–मुंबई

ती. अण्णा अन् सौ. आई

यांच्या चरणीं सप्रेम नि सादर

अर्पण.

—शशिशेखर.

# विषय-क्रम.

# पूर्व-वचन

## [ मराठी संस्करण के लिए विशेष रूप से लिखित ]

मुझे यह जानकर प्रसन्नता हुई कि '**गांधी वाणी**' का मराठी संस्करण, महाराष्ट्रीय जनता के हित की दृष्टि से, प्रकाशित किया जा रहा है।

गांधीजी युग-पुरुष हैं। युग-पुरुष की भाँति उन्होंने हमारे जीवन को आच्छन्न कर लिया है। हम चाहे या न चाहे, उनके विरोधी हों या समर्थक, उनके प्रभाव से आजकी हमारी विचार-धारा अथवा हमारे जीवन की कोई दिशा अछूती नहीं रह सकती। एक प्राकृतिक शक्ति की भांति उन्होंने लक्ष-लक्ष व्यक्तियों को प्रभावित किया है। राजनीति, समाजशास्त्र, मनोविज्ञान, शिक्षण और नीतिशास्त्र सबके प्रति उनकी अपनी देन इतनी महत्त्वपूर्ण है कि उनका अध्ययन वर्तमान जगत् के विद्यार्थी के लिए अनिवार्य हो गया है।

यद्यपि उनके विषय में प्रचुर साहित्य उपलब्ध है किन्तु अधिकांश प्रचारात्मक है। उनको ठीक-ठीक समझने और समझाने की चेष्टा बहुत कम हुई है। मैं तो यह भी मानता हूं कि उनके विषय में आज भी हमारा अज्ञान भयंकर है। इसलिए आवश्यक है कि गांधीजी तथा उनकी विचार-धारा के विषय में सत्य और वास्तविक ज्ञान का प्रसार लोगों में हो। इसकी अपेक्षा कि लोग उनके अनुयायी बनें। यह अधिक आवश्यक है कि उनकी बातों और सिद्धान्तों को तोड़मरोड़ कर उन्हें गलत रूप में न रखा जाए। गांधीजी हिंसा की आग में जलती दुनिया के सामने एक

शाश्वत सिद्धान्त—प्रेम और सत्य—के प्रतीक हैं। वे हमारे जीवन में बढ़ती हुई नास्तिकता के विरुद्ध एक चुनौती—एक 'चैलेंज' के समान हैं। जब धन हमारा केन्द्रबिन्दु हो रहा है, और जब तुच्छ स्वार्थ, लोभ और दैन्य ने हमें अपने प्रति अविश्वस्त और मूर्छित कर रखा है तब मानों वे हमें पुकार कर कहते हैं—तुम मनुष्य हो; तुम में ईश्वरांश है; तुम्हें अपने पशुत्व से ऊपर उठना होगा। उनके शब्दों में प्राचीन ऋषिवाणी हमें पुनः पुकार रही है।

भारतीय स्वतंत्रता की समस्या हल होने में अब बहुत समय न लगेगा। किन्तु राजनीतिक स्वतंत्रता के पश्चात् यदि भारतीय शासन और समाज का संघटन हिंसा और प्रतिहिंसा से भरी पश्चिमी संस्कृति के आधार पर हुआ तो न केवल हमारा युगों का श्रम और कष्टसहन निरर्थक हो जायगा बल्कि संतप्त और शोषित मानवता के प्रति भारत के सन्देश और भावी कर्तव्य का मार्ग भी रुद्ध हो जायगा। इसलिए आवश्यक है कि विचारशील पाठक गांधीजी के विचारों एवं उनकी देनका भली भाँति, शुद्ध मन से, अध्ययन करें। प्रबुद्ध युवकों एवं उच्च वर्गों के छात्रों का कर्तव्य है कि वे भारत के महान् सन्देश को व्यर्थ न होने दें।

इस दिशा में यह पुस्तक कुछ लाभ पहुँचा सकी तो लेखक और अनुवादक का श्रम सफल होगा।

साधना सदन,
इलाहाबाद.
१–२–४६

—श्री रामनाथ 'सुमन'

# १ सत्य   

## सत्य म्हणजे काय ?

......या परिमित सत्याशिवाय एक शुद्ध सत्य आहे. तें अखण्ड आहे आणि सर्वव्यापक आहे. परंतु तें अवर्णनीय आहे. कारण सत्यच ईश्वर आहे. अथवा परमेश्वरच सत्य आहे. इतर सर्व गोष्टी मिथ्या आहेत. अर्थातच दुसऱ्या ज्या गोष्टींत या प्रमाणात सत्य असेल तर तेंहि चांगलें आहे.

x x x

जो सत्य जाणतो—मनानें, वाणीनें आणि देहानें सत्याचें आचरण करतो तो परमेश्वराला ओळखतो. यामुळें तो ( सत्याचरणी व्यक्ति ) त्रिकालदर्शी होतो. त्याला याच देहीं मुक्ति प्राप्त होते.

x x x

सत्य कथन आणि सत्य आचरण हा माझा स्वभावच झाला आहे. पण जें सत्य मी अप्रत्यक्ष रीतीनें जाणतों, त्याचें पालन मी निश्चयपूर्वक करूं शकत नाहीं. माझ्याकडून अज्ञानानें अतिशयोक्ति होणें शक्य आहे. या सर्वांत असत्याची छाया आहे. तें सत्याच्या कसोटीला उतरू शकत नाहीं. ज्याचें जीवन सत्यमय आहे तो शुद्ध स्फटिकमण्याप्रमाणें होतो. त्याचेजवळ असत्य जरा वेळही थारा घेऊं शकत नाहीं. सत्याचरणी व्यक्तीला कोणी धोका देऊं शकत नाहीं, कारण त्याच्या समोर खोटें बोलणें अशक्य होतें. जगामध्यें कठिणांतलें कठीण व्रत "सत्या" चें आहे.

x x x

माझ्यासमोर जर कोणीं असत्य भाषण केलें तर मी त्याच्यावर रागावण्याच्या ऐवजीं माझ्यावरच अधिक रागावतों; कारण माझ्यामध्यें असत्य वास करीत असल्याची जाणीव मला असते.

— नवजीवन हिं. न. जी. २७-११-२१.

## सत्यामध्यें अहिंसेचा समावेश होतो.

सत्यामध्यें सर्व गोष्टींचा समावेश होतो. अहिंसेमध्यें एखादे वेळेस सत्याचा समावेश होणार नाहीं पण सत्यामध्यें मात्र अहिंसेचा समावेश होतो.

x x x

निर्मल अंतःकरणाला जें प्रतीत होतें तेंच सत्य होय. त्याच्यावर निष्ठा ठेवल्यानें शुद्ध सत्याची प्राप्ति होते.

x x x

सत्यानें प्रेम मिळतें. सत्यानें मृदुता मिळते.

x x x

शरीराचें अस्तित्व बहुतेक अहंकारामुळेंच संभवनीय आहे. शरीराचा आत्यंतिक नाश हाच मोक्ष. ज्याच्या अहंकाराचा आत्यंतिक नाश झाला आहे तो प्रत्यक्ष ‘ सत्याची मूर्ति ’ होतो.

—१७-३-२३ श्री. जमनालाल बजाज यांना साबरमती जेलमधून लिहिलेल्या पत्रांतील उतारा.

## सत्य.

सत्य नेहमीं स्वावलंबी असतें. बल, हा सत्याचा स्वभाव होय.

x x x

## सत्याचें बल.

पृथ्वी सत्याच्या बलावर टिकून राहिली आहे. ‘ असत् ’–असत्य–म्हणजे ‘ नाहीं. ’ ‘ सत् ’–सत्य–अर्थात् ‘ आहे. ’ जेथें ‘ असत् ’ अर्थात् अस्तित्व नाहीं, त्याची सफलता कशी होईल ? त्याचप्रमाणें जें सत्–म्हणजे आहे, त्याचा नाश कोण करूं शकेल ? बस, यामध्येंच सत्याग्रहाचें समग्र शास्त्र समाविष्ट झालें आहे.

—द. अ. का. सत्याग्रह, उत्तरार्ध, हिन्दी; पृष्ठ १३७; १९२४

## कटु भाषा म्हणजे सत्यविरोध.

निरोगी पोट आणि तिखट मिर्ची यांचें सानिध्य जितकें विरोधी [ अनिष्ट ] आहे तितकेंच तिखट चटपटी [ अलंकारिक ] भाषा आणि सत्य यांचें सांनिध्य विजातीय आहे.

x x x

सत्य स्वतः पूर्ण शक्तिमान् आहे, पण जर कटु शब्दांनीं तें जोरदार करण्याचा प्रयत्न केला तर तें अपमानित होतें.

x x x

जो मनुष्य स्वतःच्या जिभेवर ताबा ठेवूं शकत नाहीं त्याच्यामध्यें सत्याचें अधिष्ठान नाहीं.

x x x

"......कटुतेनें कल्पनापथ मलिन होतो."

—यं. इं. हिं. न. जी १७-९-२५, पृष्ठ ३४-३५.

## सत्याची सत्ता.

सृष्टीमध्यें फक्त सत्याची सत्ता आहे. त्याशिवाय दुसरी कुणाची नाहीं. हा माझा विश्वास दररोज वाढत आहे.

—सत्याग्रहाश्रम, साबरमती. मार्गशीर्ष शुक्ल ११ सं. १९२२; आत्मकथामधून.

## मी सत्यरूपी परमेश्वराचा शोधक आहें !

परमेश्वराच्या व्याख्या अपार आहेत. कारण त्याच्या विभूतिही अनंत आहेत. त्याच्या विभूति मला आश्चर्यचकित करून सोडतात. क्षणभर मी मुग्धही होतों. पण मी तर सत्यरूपी परमेश्वराचा पूजक आहें. माझ्या दृष्टीनें तें एकच सत्य आहे. दुसरें सर्व काहीं मिथ्या आहे. परंतु हें सत्य अजूनपर्यंत माझ्या हातीं लागलें नाहीं. अजूनपर्यंत मी त्याचा शोधक मात्र आहें. हो, त्याच्या शोधाकरिता मी माझ्या आवडत्यांतल्या आवडत्या गोष्टींचा त्याग करावयाला तयार आहें, आणि ह्या शोधरूपी यज्ञामध्यें माझ्या शरीराचा होम करण्याची मीं तयारी केली आहे.

—"आत्मकथा"मधून.

## सत्य.

सत्य एक विशाल वृक्ष आहे. त्याची जितकी जितकी सेवा केली जाते तितकीं तितकीं अनेक फळें त्याला आलेलीं दिसून येतात. त्यांना अन्तच नाहीं. मी जों जों त्यांत खोल शिरत आहें, तों तों त्यांमधून रत्नें निघत आहेत. सेवेची संधि अधिकाधिक मिळत आहे.

—हिं. आ. क. भाग ३, प्रकरण ११, पृष्ठ २४०.

## शुद्ध सत्याचा शोध.

......रागद्वेषादिकांनीं पूर्ण असा मनुष्य सरल [मनाचा] असणें शक्य आहे.—तो वाणीनें सत्यपालनादि करीत असेल, परंतु त्याला शुद्ध सत्याची प्राप्ति होणें शक्य नाहीं. शुद्ध सत्याचा शोध करणें याचा अर्थ हा कीं, रागद्वेषादि द्वंद्वांपासून सर्व प्रकारें मुक्ति प्राप्त करून घेणें होय.

—हिं. आ. क. भाग ४, प्रकरण ३७, पृष्ठ ३८८.

## सत्य आणि अहिंसा

मी अहिंसेला जितकें जाणतों त्याच्यापेक्षां मी सत्याला अधिक ओळखतों अशी माझी कल्पना आहे. आणि जर मीं सत्य सोडून दिलें तर मला अहिंसेचा बिकट प्रश्न कधींहि सोडवितां येणार नाहीं, असा माझा अनुभव आहे.

—हिं. आ. क. भाग ५, प्रकरण २९ पृष्ठ ५०६–७

"मीं सत्य ज्या रूपात पाहिलें, ज्या मार्गानें पाहिलें, तें मी त्या रूपांत आणि त्या मार्गानें सांगण्याचा नेहमीं प्रयत्न केला आहे.........मी सत्यालाच परमेश्वर मानतों.........सत्यमय बनण्याचा अहिंसा एक राजमार्ग आहे.........माझी अहिंसा खरी असली तरी सुद्धां ती कच्ची आणि अपूर्ण आहे. म्हणून माझें सत्य, त्या सत्यरूपी सूर्याच्या एका तेज-किरणाबरोबरीचें आहे, कीं ज्या तेजाचें मापन हजारों सूर्यांच्या तेजाच्या एकत्रीकरणाबरोबर होणार नाहीं. अजूनपर्यंत मीं केलेल्या प्रयोगाच्या आधारानें इतकें सहज सांगूं शकतों कीं, संपूर्ण अहिंसेशिवाय सत्याचें संपूर्ण दर्शन अशक्य आहे.

"अशा व्यापक सत्यनारायणाच्या प्रत्यक्ष दर्शनाकरितां प्राणिमात्रांवर आत्मवत् प्रेम करण्याची मोठी जबाबदारी आणि अत्यंत आवश्यकता आहे. हें सत्य मिळविण्याची इच्छा करणारा मनुष्य जीवनाच्या कोणत्याच क्षेत्राबाहेर राहूं शकत नाहीं. याच कारणामुळें माझ्या सत्यपूजेनें मला राजनीतीच्या क्षेत्रांत ओढलें. 'राजनीतीचा धर्माशीं कांहीं संबंध नाहीं' असें जे सांगतात, ते धर्म जाणत नाहींत असें मी निस्संकोचपणें म्हणतों...

"......आत्मशुद्धीशिवाय प्राणिमात्रांशीं एकतेचा अनुभव घेतां येणार नाहीं. त्याचप्रमाणें आत्मशुद्धीच्या अभावानें अहिंसाधर्माचें पालन करणें सर्व तऱ्हेनें असभवनीय आहे. कारण अशुद्धात्मा परमात्म्याचें दर्शन करण्याला असमर्थ असतो, याकरितां जीवनपथावरील सर्व क्षेत्रामध्यें शुद्धीची जरूरी आहे. ह्या तऱ्हेची शुद्धि शक्य आहे, कारण व्यक्ति आणि समाज या दोहोंत इतका निकट संबंध आहे कीं, एकाची शुद्धि अनेकाच्या शुद्धीला कारणीभूत होते आणि व्यक्तिगत प्रयत्नाची शक्ति सत्यनारायणानें सर्वांना जन्मापासून दिली आहे.

"मला दर क्षणीं असा अनुभव येत आहे कीं, शुद्धीचा हा मार्ग कठीण आहे. शुद्ध होण्याचा हेतु, आचार-विचार-उच्चारांत निर्विकार होणें, रागद्वेषापासून अलिप्त होणें. या निर्विकार स्थितीप्रत पोहोंचण्याकरितां, प्रतिक्षणीं प्रयत्न करूनहि तेथपर्यंत जाऊं शकलों नाहीं, म्हणूनच लोकांच्या प्रशंसेनें मी भुलून जाऊं शकत नाहीं. उलट ती माझ्या दुःखाला कारणीभूत होते. मी तर मनाच्या विकारांना जिंकणें, साऱ्या जगाला शस्त्र-युद्धामध्यें जिंकण्यापेक्षां कठीण समजतों........माझा कठिण मार्ग अजून निश्चित करावयाचा आहे, याची मला जाणीव आहे. याकरिता मला शून्यवत् बनलें पाहिजे. जोंपर्यंत मनुष्य स्वतःच स्वतःला सर्वांपेक्षां लहान मानत नाहीं तोंपर्यंत मुक्ति त्याचेपासून दूर रहाते. अहिंसा नम्रतेची पराकाष्ठा आहे........आणि ही अनुभवसिद्ध गोष्ट आहे कीं, अशा तऱ्हेच्या नम्रतेशिवाय मुक्ति मिळूं शकत नाहीं."

—हिं. आ. क. भाग ५; प्रकरण ४४, पृष्ठ ५५३–५४.

## सत्याचा आणखी कसा सन्मान होणार ?

......सत्य-पालनांत शांति आहे. सत्य हाच सत्याचा सन्मान होय. बहुमोलाहून बहुमोल वस्तु विकणाऱ्याला, त्यापेक्षां अधिक बहुमोल वस्तु मिळूं शकत नाहीं, त्याप्रमाणेंच सत्यवादीहि सत्यवृद्धीशिवाय आणखी कोणती वस्तु इच्छिणार ?........सत्य जेथें सूर्याप्रमाणें ताप देतें तेथें प्राणाचें सिंचन करतें.

नवजीवन हिं. न. जी. १९–१२–२९, पृष्ठ १३८.

## सत्यामध्यें गौप्य नसतें.

सत्य गौप्याचा तिरस्कार करतें.

—यं. इं. २१-१२-३१.

## सत्यच परमेश्वर आहे.

परमेश्वर ' सत्य ' आहे, असें म्हणण्यापेक्षां सत्यच परमेश्वर आहे असें म्हणणें सयुक्तिक होईल.

## सत्याशिवाय शुद्ध ज्ञान नाहीं.

जेथें सत्य नाहीं तेथें शुद्ध ज्ञान संभवत नाहीं. ......जेथें सत्यज्ञान आहे तेथें आनंदही आहे, शोक असणेंच शक्य नाहीं, आणि सत्य शाश्वत आहे, त्या अर्थी आनंदही शाश्वत आहे.

## सत्याची आराधना हीच भक्ति.

सत्याची आराधना हीच भक्ति होय.. ......तो मरूनहि अमर राहण्याचा मंत्र आहे.

येरवडा जेल २२-७-३०

## सत्यनारायण.

विचारानें देहाचा संसर्ग सोडून दिला तर शेवटीं देह मला सोडील. तीच ( अवस्था ) म्हणजे मोहरहित स्वरूप सत्यनारायण होय.

## सत्य स्वतंत्र आहे.

परम सत्य एकटेंच उभें असतें. सत्य हें साध्य आहे आणि अहिंसा साधन आहे.

येरवडा जेल १९-८-३०.

## सत्याची शक्ति.

सत्याचे जवळ स्वतःचें रक्षण करण्याची एक अमोघ शक्ति आहे. सत्य हेंच जीवन आहे आणि तें जेव्हा मानव व्यक्तीच्या हृदयांत आश्रय करतें तेव्हां तें स्वतःच स्वतःची वृद्धि करतें.

ह. से. १७-३-३३

## ' सत्य ' हीच धर्माची प्रतिष्ठा आहे.

' सत्य ' ही एक धर्माची खरी प्रतिष्ठा आहे. जर ' सत्य ' हेंच परमेश्वर आहे तर धर्मामध्यें असत्याला स्थान कधींही असणें शक्य नाहीं.

## ' सत्याची ' अपार शक्ति.

मला माझें जीवन सत्यमय बनवावयाचें आहे. सत्याच्या नांवावर असत्याचरणी लोक आदरास पात्र होत आहेत हें मी पहात आहें. धर्माचा उद्देश, बंधुत्व वाढविणें आणि माणसामाणसांतील कृत्रिम भेद कमी करणें हा आहे. पण आज त्याच्या (धर्माच्या) नांवावर अस्पृश्याशीं वाईट वागणूक होत आहे. असत्य स्वतःच कमजोर आणि परतंत्र आहे हें मीं सांगितलेंच आहे. सत्याच्या आधाराशिवाय तें उभें राहूं शकत नाहीं. मग मी आपल्याला हें सांगूं इच्छितों कीं, सत्याच्या नावावर असत्याचा जर इतका विजय होतो तर स्वतः सत्याचा विजय किती होईल? त्याचें मापन कोण करूं शकेल?

—सर्वोदय, पृष्ठ १९.

........सामान्य लोक आकाशापर्यंत पाहूं शकतात. वैज्ञानिक सांगतात कीं, ते आकाशगंगेंतील जगतें पाहातात, पण त्यांच्यापलीकडे काय आहे त्याचा पत्ता लागत नाहीं. पण सत्य तर आकाश छेदून पलीकडे जातें. मला माझें जीवन सत्यमय बनवावयाचें आहे......मीं सांगितलेंच आहे कीं, असत्य स्वतः कमजोर आहे, परतंत्र आहे. सत्याच्या आधाराशिवाय तें स्वतःच उभें राहूं शकत नाहीं.

—गांधी-सेवासंमेलन, हुदली २०-४-३७.

## सत्याचरणी एकटा नाहीं.

........मला सत्यधर्म आणि हिंदुधर्म पर्यायवाचक शब्द आहेत. हिंदुधर्मामध्यें जर कांहीं असत्याचा अंश असेल तर मी तो मानूं शकत नाहीं. आणि जर याकरितां साऱ्या हिंदु समाजानें माझा त्याग केला आणि मला एकटें रहावें लागलें, तरीसुद्धां मी सांगेन, मी एकटा नाहीं, तुम्ही सारे एकटे आहांत! कारण माझ्याबरोबर सत्य आहे आणि तुमच्याबरोबर तें नाहीं. सत्य तर प्रत्यक्ष परमात्मा आहे.

— गांधी-सेवासंघसंमेलन, हुदली २०-४-३७.

# २ अहिंसा : : :

## (१) अहिंसा आणि तिची शक्ति

### अहिंसेचा पूर्ण अर्थ

अहिंसा जणूं काय पूर्ण निर्दोषताच होय. प्राणिमात्राविषयींच्या दुर्भावनांचा पूर्ण अभाव हाच पूर्ण अहिंसेचा अर्थ.

x x x

अहिंसा ही एक पूर्ण स्थिति आहे. साऱ्या मनुष्यजातीचें तें [अहिंसा] ध्येय आहे आणि स्वभावतःच ती [मनुष्यजात] अहिंसेकडे नकळत जात आहे.

यं. इं., हिं. न. जी. १२–३–२५.

### अहिंसा.

........अहिंसा एक महाव्रत आहे. तलवारीच्या धारेवर चालण्यापेक्षांहि तें कठीण आहे. देह असलेल्यांना त्याचें [महाव्रताचें] सोळा आणे पालन करतां येणें असंभवनीय आहे. त्याच्या पालनाकरितां घोर तपश्चर्येची आवश्यकता आहे. येथें तपश्चर्येचा अर्थ त्याग आणि ज्ञान असा केला पाहिजे.

—नवजीवन, हिं. न. जी. २०–८–२५

### सत्य आणि अहिंसा.

"......सत्य विधायक आहे. अहिंसा निषेधात्मक आहे. [सत्य म्हणजे आहे, असत्य म्हणजे नाहीं..........अहिंसा परमधर्म आहे. सत्य स्वयंसिद्ध आहे. अहिंसा त्याचें [सत्याचें] संपूर्ण फल आहे. अहिंसा सत्यामध्यें दडलेली आहे. ती सत्याप्रमाणें स्पष्ट नाहीं.

x x x

"......अहिंसा सत्याचा प्राण आहे. त्याशिवाय मनुष्य पशु आहे."

—नवजीवन. हिं. न. जी. १५–१०–२५.

x x x

"......माझ्या बाबतींत सत्यापलीकडे दुसरा कोणता धर्म नाहीं, आणि अहिंसेपेक्षां जास्त श्रेष्ठ कर्तव्य नाहीं. '**सत्यान्नास्ति परो धर्मः**' आणि '**अहिंसा परमो धर्मः**' या दोन सूत्रात धर्म शब्दाचे अर्थ भिन्न आहेत. सत्यापेक्षा श्रेष्ठ कोणतेंही ध्येय नाहीं, आणि अहिंसेपेक्षां कोणतेंही श्रेष्ठ कर्तव्य नाहीं. हें कर्तव्य करतां करता मनुष्य सत्याची पूजा करूं शकतो.

सत्याच्या पूजेचें दुसरें कोणतेंही साधन नाहीं. सत्याकरिता देशाचा नाश पहावा लागला तरी पाहिला पाहिजे. देशत्याग करावा लागला तरी केला पाहिजे.

......जर माझा काहीं सिद्धात सांगावयाचा झाला तर तो इतकाच आहे. त्यामध्यें गाधीवाद म्हणून विशेष असें काहीं नाहीं......मी जें काहीं लिहिलें आहे तें, जे मी काही केले आहे त्याचें वर्णन आहे. आणि जें मीं कांहीं केलें आहे तें म्हणजे सत्य आणि अहिंसेचें सर्वात मोठें भाष्य ( व्याख्या ) होय.

—गांधीसेवासंघ संमेलन ३-३-३६.

## अहिंसा प्रेमाची परमावधि आहे.

......दुसऱ्याकरितां प्राणार्पण करणे म्हणजे प्रेमाची परमावधि होय आणि याचेंच शास्त्रीय नाव अहिंसा आहे. अहिंसाच सेवा होय. हेंच हें सागतें. जगामध्यें जीवन आणि मृत्यूचें युद्ध होत असलेलें मी पहात आहें. परंतु दोहोंचा परिणाम मृत्यु नसून जीवन आहे.

—नवजीवन, हि. न. जी. १५-९-२७.

## अहिंसा.

......अहिंसा प्रचंड शस्त्र आहे. त्यामध्यें श्रेष्ठ पुरुषार्थ आहे. ती भित्र्यापासून दूर पळते. ती वीर पुरुषाची शोभा आहे—त्याचें सर्वस्व आहे. ती शुष्क, नीरस, जड नाही. ती चेतना आहे. तो आत्म्याचा विशेष गुण आहे.

—नवजीवन, हिं. न. जी. १३-९-३३.

× × ×

अहिंसा सत्येश्वराचें दर्शन होण्याचा सरळ आणि जवळचा मार्ग दाखवते.

—ह. से. १०-११-३३.

# अहिंसा सर्वांत मोठी शक्ति आहे.

सत्यानंतर या जगांत अहिंसा ही मोठ्यांत मोठी सक्रिय शक्ति आहे. ती विफल कधीं होत नाहीं. हिंसेवर ती एकमात्र उपयोगी पडते.

—ह. से. २८-९-३४.

× × ×

अहिंसेची शक्ति अपरिमित आहे. त्याचप्रमाणें अहिंसकाची शक्तिही अतुलित आहे. अहिंसक स्वतः कांहींच करीत नाहीं. त्याचा प्रेरक ईश्वर असतो......पूर्ण सत्याग्रही म्हणजे ईश्वराचा पूर्ण अवतार......यामध्यें थोडीसुद्धां अत्युक्ति नाहीं. हें जग म्हणजे या तऱ्हेचा अवतार होण्याची प्रयोगशाळा आहे. आपण अशी श्रद्धा ठेवली पाहिजे कीं, जर आपण सर्व मिळून अंशरूप जरी तयारी केली तर कधीं ना कधीं तरी पूर्ण अवतार अवश्य प्रकट होईल.

—५-४-३५च्या एका पत्रामधून.

× × ×

अहिंसा ही मानवजातीजवळ प्रबलाहून प्रबल शक्ति आहे कीं, तिला कांहीं अंत नाहीं. माणसाच्या बुद्धीनें जगांत प्रचंडाहून प्रचंड शस्त्रें-अस्त्रें बनविलीं आहेत, त्यांहूनही अहिंसा ही प्रचंड शक्ति आहे. संहार हा कांहीं मानवधर्म नाहीं. मनुष्य आपल्या बंधूला मारून नव्हे तर उलट जरूर पडली तर त्याच्या हातून मरण्यास तयार रहाण्यानेंच तो खरा जिवंत रहातो. कोणत्याही कारणाकरितां कां होईना पण हत्या किंवा अन्य प्रकारची हिंसा घडल्यास तो मानवजाती विरुद्ध अक्षम्य अपराध आहे.

—ह. से. २६-७-३५.

× × ×

माझ्यामध्यें अहिंसेची अपूर्ण शक्ति आहे, हें मला ठाऊक आहे. पण जी कांहीं शक्ति आहे ती अहिंसेची आहे. लाखों लोक माझ्याकडे येतात. प्रेमानें मला आपलासा मानतात. स्त्रिया निर्भय होऊन माझ्या-बरोबर राहूं शकतात. माझ्याजवळ अशी कोणती गोष्ट आहे ? केवळ अहिंसा हीच शक्ति आहे. आणखी कांहीं नाहीं. अहिंसेची ही शक्ति एका नवीन नीतीच्या रूपांत मी जगाला देऊं इच्छितों आहें.

—गांधीसेवासंघाची सभा, वर्धा २२-६-४०.

## पूर्ण अहिंसकाची शक्ति.

"......कधीं कधीं असा विचार येतो कीं, सर्व सोडून देऊन एकदम एकांतांत जाऊन आपला प्रयोग करून पाहिला तर? स्वतःच्या शांति आणि कल्याणसाधनाकरितां नव्हे तर आत्मनिरीक्षणाकरितां. आत्म्याचा आवाज अधिक स्पष्टतेनें ऐकण्याकरितां, जगताच्या कल्याणाचा प्रतिक्षणीं विचार असला पाहिजे, आणि यानें [ वरील ] विचाराची सहज सिद्धि प्राप्त होऊं शकेल, तेव्हां माझा अहिंसेचा प्रयोग सफल होईल. पूर्ण अहिंसक मनुष्य गुंफेंत बसून हें सारें जगत् हालवूं शकतो. याविषयीं मला शंका नाहीं. पण त्या विचाराच्या पाठीशीं पूर्ण एकाग्रता आणि पूर्ण शुद्धि झाली पाहिजे."

—ह. से. २७-४-४०.

## अहिंसा श्रद्धेचा विषय आहे.

"......अहिंसेच्या बाबतींतसुद्धां मला शेवटपर्यंत बुद्धीचा प्रयोग करावा लागेल, हें खरें आहे, पण मी आपणाला सांगतों कीं, अहिंसा केवळ बुद्धीचा विषय नाहीं. तो श्रद्धा आणि भक्तीचा विषय आहे. जर आपला विश्वास आपल्या आत्म्यावर नाहीं, ईश्वर आणि प्रार्थनेवर नाहीं, तर अहिंसा आपल्या कामाला येणारी गोष्ट नाही."

—गांधी-सेवासंघसंमेलन, डेलांग २७-३-३८.

## नम्रतेची अंतिम सीमा = अहिंसा.

"......मला याहूनहि बिकट रस्ता पार पाडावयाचा आहे हें मी जाणतों. मला स्वतःच शून्यवत् बनावयाचें आहे. जोंपर्यंत मनुष्य आपली गणना पृथ्वीवरील प्राणिमात्राच्या शेवटीं करीत नाहीं, तोंपर्यंत त्याला मोक्ष मिळणार नाहीं. नम्रतेच्या अंतिम सीमेचें नांवच अहिंसा आहे."

'—सर्वोदय' नव्हेंबर १९३४.

## अहिंसा.

"......अहिंसा असा गुण नाहीं कीं, तो तयार करितां येईल. तो ( गुण ) एक आंतून विकास पावणारा गुण आहे. आत्यंतिक व्यक्तिगत प्रयत्न हा त्याचा आधार आहे."

—ह. से. २३-४-३८.

## अहिंसा स्वयंभू शक्ति आहे !

" अहिंसा एक स्वयंभू शक्ति आहे. "

—गां. से. सं. संमेलन, मालिकांदा, बंगाल २१–२–१९४०.

## संहारामध्यें अमृताचा प्रवाह.

"......हें जग प्रतिक्षणीं बदलत आहे. त्यामध्यें संहाराची इतकी शक्ति आहे कीं, कांहींही स्थिर राहूं शकत नाहीं, तरीहि मनुष्यजातीचा संहार झाला नाहीं. याचा हाच अर्थ होय कीं, सर्व जग अहिंसेनें ओतप्रोत भरलेलें आहे. मी तिचें दर्शन घेत आहें. गुरुत्वाकर्षण शक्तीप्रमाणें, अहिंसा जगातील साऱ्या गोष्टींना स्वतःकडे खेंचत आहे. प्रेमात ही शक्ति भरलेली आहे. "

—गां. से. सं. सम्मेलन, मालिकांदा २२–२–४०.

x x x

## अहिंसेच्या नामाचा प्रभाव.

"......रामनामाविषयीं आपण असें ऐकलें आहे कीं, रामनामानें लोक तरून जातात. तर प्रत्यक्षच राम आला तर काय होईल ? अहिंसेच्या नामानेंच जर इतकें केलें तर, तर खरोखरच खरी अहिंसा आपल्यात आली तर आपण आकाशांत उडूं लागूं. आपला शब्द आकाशगंगेलासुद्धां पार भेदून निघून जाईल. या जमिनीचा स्वर्ग होईल. "

—गांधी-सेवासंघाची सभा, २२–६–४०

## हिंसा : अहिंसा.

"......असें सांगितलें जातें कीं, रामनामाच्या प्रतापानें पाण्यावर दगड तरतो, त्याप्रमाणें अहिंसा नामानें जी प्रवृत्ति निर्माण झाली त्यानें देशांत फार जागृति झाली, आणि आपली प्रगति झाली. ज्यांचा विश्वास अविचल आहे ते या प्रयोगाने आणखीन पुढें जाऊं शकतात. "

x x x

"......सर्वसामान्य असा अनुभव आहे कीं, बऱ्याच वेळेला हिंसेचें निवारण अहिंसा द्वारें होतें. या अनुभवानें आपण असें अनुमान करूं शकतों की, तीव्र हिंसेचा प्रतिकार तीव्र अहिंसेनें होणें शक्य आहे. "

—ह. से. २७–७–४० पृष्ठ १९५.

# ( २ ) अहिंसेची व्यापकता आणि तिचा संदेश.

अपकर्षण नव्हे तर आकर्षण हेंच निसर्गाचें तत्त्व आहे.

"......माझ्या मतें, माझी खात्री आहे कीं, कुराणामध्यें किंवा महाभारतामध्येंहि हिंसेला प्राधान्य दिलेलें नाहीं. जरी निसर्गांत आपल्याला पुष्कळसें अपकर्षण दिसत असलें तरी तें आकर्षणाच्याच मदतीनें अस्तित्वांत राहूं शकतें. पारस्परिक प्रेमामुळेंच जगताचा व्यवहार चालत आहे. मनुष्य संहारावर आपला निर्वाह करूं शकत नाहीं. आत्मप्रेमामुळें दुसऱ्याविषयीं आदरभाव अवश्य उत्पन्न होतो. लोक एकमेकांविषयीं आदरभाव राखतात, यामुळें राष्ट्रात एकता होते. ज्याप्रमाणें आपण आपली कौटुंबिक दृष्टि राष्ट्रव्यापत एक विशाल कुटुंब निर्माण करून केली, त्याप्रमाणें एके दिवशी आपल्याला आपली राष्ट्रीय दृष्टि विश्वव्यापी करावी लागेल."

—यं. इं. हिं. न. जी. ५–३–२३.

## प्रेम ही सहजवृत्ति आहे.

"......तिरस्कारापेक्षा प्रेम अधिक आहे. असत्यापेक्षां सत्य अधिक आहे. म्हणून जगत् आज विद्यमान आहे. धोकेबाजी आणि जबरदस्ती हे रोग आहेत. सत्य आणि अहिंसा मांगल्य होय. रोगापेक्षा स्वास्थ्य अधिक आहे, हेंच जग अजूनही नष्ट झालें नाहीं याचें प्रमाण होय."

—यं. इं. हिं. न. जी. १५–१२–२७.

## अहिंसा जीवनधर्म आहे.

" आणि जर आपली अहिंसा व प्रेम जीवनधर्म नसता, तर या मर्त्यलोकांत आपलें जीवन कठीण झालें असतें. जीवन हेंच मृत्यूवर मिळविलेल्या विजयाचें सनातन विजयचिन्ह होय."

× × ×

" आणि मनुष्य आणि पशु यांत जर कांहीं मौलिक आणि सर्वांत मोठें अंतर असेल तर तें म्हणजे मनुष्याला, दिवसेंदिवस या धर्माचा (अहिंसा जीवनधर्म) अधिकाधिक साक्षात्कार होत आहे, आणि आपल्या व्यक्तिगत जीवनामध्यें तो त्याचा अंमलहि करूं शकत आहे. जगांतील सारे

प्राचीन आणि अर्वाचीन सन्तपुरुष आपापल्या शक्ति आणि पात्रतेप्रमाणें या श्रेष्ठ जीवनधर्मांचीं ज्वलन्त उदाहरणें होत. कधीं कधीं आमच्या हृदयांत लपलेला पशु आमच्यावर विजय मिळवितो ही गोष्ट निःसंशय खरी आहे पण यामुळें हा धर्मच खोटा आहे असें सिद्ध होत नाहीं. हा (धर्म) आचरणांत आणणें कठीण आहे हेंच फक्त यानें सिद्ध होतें. "

—ह. से. २६-९-३६.

## अहिंसेची व्यापकता.

"......आणि जर अहिंसा सर्वव्यापी होऊं शकत नसेल, तर तो धर्मच नव्हे. माझ्यांत जर कांहीं विशेषता असेल तर ती ही कीं, मी सत्य आणि अहिंसा सर्वव्यापी ( संघटित ) करीत आहें. जी गोष्ट मी करूं इच्छितों आणि ती करीत असतां मरूं इच्छितों ती ही कीं, मी अहिंसा सर्वव्यापी करूं इच्छितों आणि जर ती सर्व क्षेत्रांत उपयोगी नसली तर ती नकली आहे. मी सांगतों कीं, जीवनाचीं जितकीं क्षेत्रें आहेत त्या सर्वांत अहिंसेचा उपयोग आहे ...... "

—गांधी सेवासंघ सम्मेलन, हुदली २०-४-३१

## अहिंसा आणि समाजाची स्थिति.

"......गुरुत्वाकर्षणानें पृथ्वी जशी स्थिर झाली आहे त्याप्रमाणेंच सारा समाज अहिंसेवर स्थिर झाला आहे. "

—ह. से. ११-२-३५.

## व्यापक आणि सार्वजनिक अहिंसा.

अहिंसा जर व्यक्तिगत गुण असेल तर माझ्या बाबतींत ती त्याज्य आहे. माझी अहिंसेची कल्पना व्यापक आहे. ती कोट्यवधि लोकांची आहे. मी तर तिचा सेवक आहें. जी गोष्ट क्रोडोंच्याकरितां नाहीं ती मला त्याज्य आहे, आणि माझ्या साथीदारांनाही त्याज्य झाली पाहिजे. अहिंसा केवळ व्यक्तिगत आचाराचा नियम नाहीं हें सिद्ध करण्याकरितांच आपण जन्माला आलों आहों. ती समुदाय, जाति आणि राष्ट्राची नीति होऊं शकते......माझा असा विश्वास आहे कीं, अहिंसा नेहमींकरतां आहे. तो आत्म्याचा गुण आहे आणि आत्मा सर्वमय आहे. अहिंसा सर्वांकरितां

आहे, सर्व स्थलाकरितां आहे, सर्व काळाकरितां आहे, आणि जर ती [ अहिंसा ] आत्म्याचा गुण असेल तर ती आपल्यांत सहज बाणली आहे. आज असें सांगितलें जातें कीं, ' सत्य व्यापारात चालत नाहीं. राजकारणात चालत नाहीं. ' तर मग तें कोठें चालतें ? आणि जर सत्य जीवनाच्या सर्व क्षेत्रात चालूं शकत नसेल तर तें कवडीमोल आहे. जीवनांत त्याचा उपयोग तरी काय रहातो ?......सत्य आणि अहिंसा म्हणजे काहीं आकाश-पुष्प नव्हे. तीं आमच्या प्रत्येक शब्दात, व्यापारात नि कर्मांत प्रगट झालींच पाहिजेत.

—गां. से. सं. सम्मेलन, मालिकांदा २३–२–४०.

x x x

.........आपल्याला सत्य आणि अहिंसा केवळ व्यक्तीनें अमलांत आणण्याच्या गोष्टी करावयाच्या नाहींत—तर अशी गोष्ट बनवावयाची आहे कीं, जी जमात, समाज आणि राष्ट्र अमलात आणूं शकेल. मी हें खरें करण्याकरितां जिवंत आहे. आणि तें करण्याचा प्रयत्न करीत असतां मरेन. सत्याचा शोध करण्याकरितां माझी श्रद्धा मला नित्य नवीन उत्साह देते. अहिंसा आत्म्याचा स्वभाव आहे आणि म्हणून प्रत्येक व्यक्ति जीवनाच्या प्रत्येक गोष्टींत ती अमलांत आणूं शकते.

—ह. से. १६-३-४०.

## अहिंसा सामाजिक धर्म आहे.

......अहिंसा सामाजिक गोष्ट आहे. ती केवळ व्यक्तिगत नाहीं, असा मी विशेष आग्रह धरला आहे. मनुष्य केवळ व्यक्ति नाहीं. तो पिण्ड आहे आणि ब्रह्माण्ड आहे. तो ब्रह्माण्डाचें ओझें आपल्या खांद्यावर घेऊन फिरतो आहे. जो धर्म व्यक्तीबरोबर नाश पावतो तो माझ्या कामाचा नाहीं. मी ठांसून सांगतों कीं, सारा समाज अहिंसेचे आचरण करूं शकतो आणि आजही करीत आहे.

—गांधीसेवासंघाची सभा, वर्धा २२–६–४०.

× × ×

आमच्या लोकांनीं अशी खोटी समजूत करून घेतली आहे कीं, अहिंसा व्यक्तिगत रूपानें विकास पावूं शकते आणि व्यक्तीपुरती मर्यादित राहूं शकते. खरी गोष्ट अशी नाहीं. अहिंसा सामाजिक धर्म आहे आणि सामाजिक

धर्माच्या आधारें विकास पावते हें समजविण्याचा माझा प्रयत्न आणि प्रयोग आहे. ही नवीन गोष्ट आहे. याकरितां ती खोटी समजूत फेकून देण्याचा प्रयत्न कोणी या युगांत करणार नाहीं. ती कठीण आहे, म्हणून अशक्य आहे, हें सुद्धा कोणी या युगांत म्हणणार नाहीं; कारण कीं आपल्या डोळ्यांनीं आपण पुष्कळ गोष्टी नव्याच्या जुन्या झालेल्या पाहिल्या आहेत. जें अशक्य वाटत होतें तें शक्य बनलेलें आपण पाहिलें आहे.

—सेवाग्राम, ६-७-४० ह. से. २४-८-४०.

## संयम, अहिंसा आणि सत्य.

"......संयमाला काहीं मर्यादा नाहीं, यामुळें अहिंसेलाहि कांहीं मर्यादा नाहीं. जगांतलीं सगळीं शास्त्रें संयमाचें स्वागत करितात, स्वच्छंदनेच्या बाबतींत शास्त्रात मतभेद आहे. काटकोन ( समकोन ) सर्व ठिकाणीं एकाच प्रकारचा असतो, दुसरे कोन अगणित आहेत. अहिंसा आणि सत्य हीं सर्व धर्मांचे काटकोन ( समकोन ) आहेत."

—नवजीवन हि. न. जी. २०-८-२५.

## भारत आणि अहिंसा.

आजहि माझी ज्वलन्त श्रद्धा आहे कीं, जगांतील सर्व देशांत भारतच असा देश आहे कीं, तो अहिंसेची कला शिकूं शकेल.

x x x

" शस्त्रीकरणाच्या धडपडींत सामील होणें म्हणजे हिंदुस्थानच्या दृष्टीनें आत्मघात करणें होय. जर भारत अहिंसेला मुकेल तर जगाच्या अंतिम आशेवर पाणी पडेल."

—ह. से. १४-१०-३९.

x x x

मला ठाऊक आहे कीं, अधिकाधिक तार्किक चिन्तनानें सुद्धां पृथ्वीवर अहिंसेचें राज्य स्थापित होऊं शकणार नाहीं. फक्त एकच गोष्ट हें करूं शकेल, आणि ती म्हणजे राष्ट्रीय स्वतंत्रतेची प्राप्ति आणि तिचें रक्षण करण्याकरितां अहिंसेचें सामर्थ्य निःसंदेह प्रदर्शित करण्याची भारताची योग्यता.

—सेवाग्राम ८-६-४० ह. से. १५-६-४०.

........जर हिंदुस्थान जगाला अहिंसेचा संदेश देऊं शकत नसले तर, आज किंवा उद्यां येणारा नाश, उद्याच्या ऐवजीं आजच येण्याचा संभव अधिक आहे. जग युद्धाच्या शापापासून अलिप्त राहूं पहात आहे, पण अलिप्त कसें रहावयाचें ते [ जगाला ] ठाऊक नाहीं. त्याची चावी हिंदुस्थानच्या हातांत आहे.

# ( ३ ) अहिंसेचें आचरण.

## अहिंसेची साधना.

" मानसिक अहिंसेची स्थिति प्राप्त होण्याकरितां कष्टमय अभ्यासाची जरूरी आहे. आपल्या दैनंदिन जीवनक्रमात व्रतपालनाची आणि नियम-पालनाची आवश्यकता आहे. ही शिस्त आम्हांला आवडो वा न आवडो, पण ती एकाद्या शिपायाला जितकी आवश्यक आहे, तितकी आपल्याला आहे. परंतु मी असें मानतों कीं जर, मानासिक सहाय्य न मिळालें तर ती बाह्य आचरणाची गोष्ट होईल. तिनें आपलें नुकसान होईल आणि दुसऱ्याचेंही. जेव्हां मन, वाचा आणि काया यांची एकता होते त्या वेळीं सिद्धावस्था प्राप्त होऊं शकते. हा अभ्यास एक प्रचंड मानसिक आंदोलन आहे. अहिंसा ही काहीं सहज यांत्रिक कवायत नाहीं. ती ( अहिंसा ) म्हणजे हृदयाचा सर्वोत्कृष्ट गुण आहे, आणि तो साधनेनें प्राप्त होऊं शकतो. "

—सर्वोदय, नव्हेंबर ३८,

## अहिंसेचा व्यवहार.

पूर्ण अहिंसेच्या नावानेंहि चमकून जाता कामा नये. या अहिंसेला स्पष्टपणें समजून घेऊन, तिच्या सर्वातोपरि उपयोगितेचा स्वीकार केल्यावर तिचें आचरण जितकें कठीण मानलें जातें, तितकें कठीण नाहीं. ऋषिकवि हांक मारून सागत आहेत, " ज्या धर्मांत सहज शुद्ध अर्थ आणि काम यांचा समावेश झाला आहे, त्या धर्माचें आपण कां आचरण करीत नाहीं ? हा धर्म गंध लावण्याचा आणि गंगास्नान करण्याचा नाहीं. पण अहिंसा आणि सत्य आचरण्याचा आहे. आपल्याकडे दोन अमर वाक्यें आहेत. **" अहिंसा परम धर्म आहे "** आणि **" सत्याशिवाय दुसरा धर्म नाहीं. "** यात सर्व वांछित अर्थ आणि काम मिळतो. मग आपण कां

कुरकुर करतों ?......जें सरळ आहे, तें लोकाना कठीण वाटतें. हें आमची ‘ जडता ’ दाखवितें. येथें ‘ जडता ’ शब्द निंदात्मक समजूं नये. मीं इंग्रजी शास्त्रांतील शब्दांचा अनुवाद केला आहे. वस्तुमात्राच्या ठिकाणीं जडता नामक एक गुण आहे, आणि तो आपल्या जागीं उपयोगीही आहे. त्या गुणानें आपण स्थिर रहातों. जर तो नसला तर आपण नेहमीं अस्थिर राहूं. या जडतेला वश होऊन आपल्या अंतःकरणांत असा समज झाला आहे कीं, सत्य आणि अहिंसेचें पालन कठीण आहे. ही दूषित जडता आहे. हा दोष आपण काढून टाकला पाहिजे. प्रथम तर संकल्प केला पाहिजे, कीं असत्य आणि हिंसेच्या द्वारा कितीहि लाभ झाला, तरी आपल्याला त्याज्य आहे. कारण तो लाभ नाहीं, पण हानि आहे.

—सेवाग्राम, १०–६–४०.

## अहिंसेचें आचरण.

जो कोणी मनुष्य अहिंसक असल्याचा आग्रह धरतो, त्याच्याविषयीं अशी आशा वाटते कीं, तो, त्याला जखम करणाऱ्यावरही क्रोधाविष्ट होणार नाहीं. तो त्याच्याविषयीं वाईट अगर हानि इच्छिणार नाहीं. तो त्याचें चांगलें होण्याची कामना धरील. तो त्याला कोणत्याही प्रकारें जखम करणार नाहीं. तो हिंसकाकडून होणारी सर्व पीडा सहन करील. अशा प्रकारची अहिंसा पूर्ण निर्दोष होय. पूर्ण अहिंसा म्हणजे सर्व सजीवांच्या विषयीं प्रतिदुर्भावनेचा अभाव. यामुळें तो ( अहिंसक ) सर्व मानवेतर प्राणिमात्रांना—विषारी किडे आणि हिंसक जनावरें सुद्धां—आलिंगन देतो.........अहिंसा आपल्या सक्रियावस्थेंत संपूर्ण जीवनाची सद्भावना आहे. तेंच विशुद्ध प्रेम होय.

x x x

जेव्हां मनुष्य अंतःकरणात निर्दोष होतो तेव्हां तो काहीं देवता होत नाहीं. तेव्हां तो फक्त चागला मनुष्य बनतो. आपल्या हल्लींच्या स्थितींत आपण अंशरूपानें मनुष्य आणि अंशरूपानें पशु आहोंत. आणि मी असें सांगतों कीं, अज्ञान, मांद्य अथवा उद्धटपणानें, आपण रागाच्या प्रश्नाला रागानें उत्तर देतों आणि त्याकरितां आपल्या हृदयांत द्वेषभावना निर्माण करून कोणत्या योनींतले आहोंत हें सिद्ध करतों. आपण असें

मानतों कीं, प्रतिहिंसा अथवा बदला आपल्या जीवनाचा नियम आहे, कारण प्रत्येक शास्त्रांत आपण पहातों कीं, प्रतिहिंसा कांही अनिवार्य नाहीं पण क्षम्य मानली गेली आहे. संयम-नियंत्रण-खरोखरच अनिवार्य आहे....... संयम आपल्या अस्तित्वाचा मूलमंत्र आहे. सर्वोच्च पूर्णतेची प्राप्ति सर्वोच्च संयमाशिवाय संभवनीय नाहीं. हेंच कष्टसहन मानवजात ओळखण्याचें लक्षण आहे.

—यं. इं. ९ मार्च १९२२.

मी कांहीं स्वप्नद्रष्टा नाहीं. एक व्यावहारिक आदर्शवादी होण्याची माझी इच्छा आहे. अहिंसाधर्म केवळ ऋषि आणि संतांकरितां नाहीं. तो सामान्य माणसाकरितांही आहे. ज्याप्रमाणें हिंसा पशूंचा धर्म आहे, त्याप्रमाणें अहिंसा मानव जातीचा धर्म आहे. पशूंत ( किंवा नरपशूंत ) आत्म-शक्ति सुप्त असते आणि तो शरीरबलाखेरीज कोणता नियम जाणत नाहीं. मनुष्याचा आत्मसन्मान अधिक उच्चतर करण्याचा नियम आत्मशक्तीचें अनुसरण करावयाला सांगतो.

x x x

म्हणून मी भारताच्या समोर आत्मबलिदानाचें सनातन तत्त्व ठेवण्याची हिंमत धरली आहे. सत्याग्रह आणि त्यातून निघालेला असहयोग किंवा सविनय प्रतिरोध म्हणजे दुसरें कांहीं नाहीं, तर कष्ट सहन करण्याच्या नियमाचें नवें नांव आहे. ज्या ऋषींनीं हिंसेंत अहिंसाधर्माचा शोध लावला ते न्यूटनपेक्षां अधिक प्रतिभाशाली होते. ते वेलिंग्टनपेक्षां अधिक शूर होते. शास्त्राचा प्रयोग केल्यावर त्यांनीं [ ऋषींनीं ] हिंसेचा सार-हीनतेचा अनुभव घेतला आणि श्रांत झालेल्या जगाला शिकविलें कीं, जगाची मुक्ति हिंसेच्या मार्गानें नाहीं—तर अहिंसेच्या मार्गानें आहे.

—यं. इं. ११–८–२०

भारत दुर्बल आहे, या कारणाकरितां मी भारताला अहिंसापालन सांगत नाहीं. मी असें इच्छितों कीं, भारतानें, आपली शक्ति जाणून अहिंसेचें पालन करावें. आपली शक्ति जाणण्याकरितां, त्याला ( भारताला ) शस्त्र-ज्ञानाची आवश्यकता नाहीं. आपल्याला त्याच्या ( शस्त्रज्ञानाची ) आवश्यकतेची जाणीव एवढ्याच करिता कीं, आपण, आपल्याला फक्त मांसाचा गोळा—फक्त देहधारी—समजून बसलों आहोंत. मी इच्छा

करतों, भारतानें या गोष्टीचा अनुभव घ्यावा कीं, त्याला त्याचा एक आत्मा आहे आणि तो नष्ट होऊं शकत नाही, आणि तो सकल जगातील भौतिक शक्तीची अवज्ञा करूं शकतो...एक मानवी प्राणी राम, दहा तोंडें असलेल्या आणि गर्जना करणाऱ्या समुद्रात आपली लंका सुरक्षित आहे असें समजणाऱ्या रावणाच्या उद्धत शक्तीबरोबर लढाई करतो. हें काय दाखवितें ?—काय याचा अर्थ ? आध्यात्मिक शक्तीने शरीरबलाचा पराजय होऊं शकत नाही ?

—यं. इं. ११-८-१९२०.

मी भारताच्या समोर अहिंसेचें आत्यंतिक स्वरूप ठेवलें नाही तें याच कारणाकरिता कीं, मी तो प्राचीन संदेश देण्याच्या योग्यतेचा झालों नाही. जरी माझ्या बुद्धीनें ती पूर्णपणें समजून घेतली आहे आणि ग्रहण केली आहे तरी पण ती अद्याप माझ्या समग्र जीवनाचें—संपूर्ण अस्तित्वाचें अंग झाली नाही. मी जनतेला अशी गोष्ट करावयाला सांगत नाहीं की, जी मी माझ्या जीवनात वारंवार अजमावून पाहिली नाहीं. माझी शक्ति याच गोष्टींत आहे.

—यं. इं. २९ मे २४.

x x x

.........अधिक बलाचा व्यर्थ प्रयोग करणें म्हणजे भ्याडपणाचें आणि वेडेपणाचें लक्षण आहे. एक शूर मनुष्य चाराला मारत नाहीं, उलट पोलिसाच्या हवालीं करतो. त्याच्याहीपेक्षां अधिक शूर मनुष्य त्याला हांकून देण्यांत आपल्या शक्तीचा उपयोग करतो आणि पुनः त्या बाबतींत कांहीं विचार करीत नाहीं. आणि जो सर्वश्रेष्ठ वीर आहे तो असा विचार करतो की, चोर चोरीपेक्षां चांगली गोष्ट जाणूं शकत नाहीं. तो त्याला समजावण्याचा प्रयत्न करतो आणि मार खाण्याचें नि मरण्याचेंही संकट स्वतःवर ओढवून घेतो पण उलट आक्रमण करीत नाहीं. आपण कसेंही असलो तरी भ्याडपणा आणि पौरुषहीनता सोडली पाहिजे.

—यं. इं. १५-१२-२०.

"जेथें फक्त भ्याडपणा आणि हिंसा यांमध्यें कोणत्या तरी एकाची निवड करावयाची असेल तेथें मी हिंसेच्या पक्षाला मत देईन"

—यं. इं. ११-८-२०.

माझा विश्वास आहे कीं, अहिंसा हिंसेपेक्षां अनंतपटीनें श्रेष्ठ अशी वस्तु आहे. क्षमा दण्डापेक्षां अधिक पुरुषोचित आहे—"**क्षमा वीरस्य भूषणम्** ........."

x x x

"......शक्ति शारीरिक बलानें उत्पन्न होत नाहीं तर ती **अजेय** संकल्पानें ( अथवा इच्छेनें ) उत्पन्न होते......

—यं. इं. ११-८-२०

x x x

......अहिंसेचा अर्थ ईश्वरावर विश्वास ठेवणें होय......

—यं. इं. १२-१-२१.

x x x

" आणि भारत तलवारीच्या सिद्धांतावर विश्वास ठेवील तर त्याला क्षणिक विजय प्राप्त होऊं शकेल. पण तेव्हा मग भारत माझ्या हृदय-गौरवाचा विषय रहाणार नाहीं. भारताच्या ठिकाणी माझी भक्ति यामुळेंच आहे कीं, माझ्यापाशी जें काहीं आहे तें सारें मी त्याच्यापासून मिळविलें आहे. माझा पक्का विश्वास आहे कीं, त्याला ( भारताला ) जगाला एक संदेश द्यावयाचा आहे. त्यानें अंध बनून युरोपची नक्कल करावयाची नाही. ज्या दिवशीं भारत तलवारीचा सिद्धांत ग्रहण करील तो माझा परीक्षेचा दिवस होईल, आणि मला आशा आहे कीं, मी माझ्या कर्तव्यांत कसूर करणार नाहीं. माझा धर्म भौगोलिक सीमांनीं मर्यादित नाहीं आणि माझी त्यावर खरी श्रद्धा असेल तर ती माझ्या भारतप्रेमालाही उल्लंघून जाईल. मी जिला हिंदुधर्माचें मूळ मानतों त्या अहिंसेच्या द्वारा, भारताच्या सेवेकरितां आपलें जीवन अर्पण केलें आहे.

—यं. इं. ११-८-२०.

## ( २ ) अहिंसा.

**"........अहिंसा माझ्या प्रत्येक प्रवृत्तीचें मूळ आहे.........."**

## पांच उपसिद्धान्त.

**( १ ) जेथपर्यंत मानवी दृष्ट्या संभवनीय आहे तेथपर्यंत पूर्ण आत्मशुद्धि अहिंसेमध्यें निहित आहे.**

( २ ) माणसामाणसांत जर सामना केला तर आढळून येईल कीं, अहिंसक माणसांत हिंसा करण्याची जितकी शक्ति असेल तितक्याच प्रमाणांत त्यांच्यात अहिंसा असेल. ( येथें हिंसा करण्याची शक्ति म्हणजे हिंसा करण्याची इच्छा असें समजण्याची चूक करूं नये. अहिंसकांत हिंसेची इच्छा कधींहि असूं शकत नाहीं. )

( ३ ) निरपवाद अहिंसा हिंसेपेक्षां श्रेष्ठ शक्ति आहे. अहिंसक व्यक्तीमध्यें तिच्या हिंसक दशेंत जी शक्ति असते तिच्याहिपेक्षां जास्त तिच्या अहिंसकदशेंत शक्ति असते.

( ४ ) अहिंसेंत पराभव असा कांहीं नाहींच. हिंसेच्या शेवटीं निश्चित पराभव आहे

( ५ ) आणि अहिंसेच्या बाबतींत पराजय हा शब्दप्रयोग केला गेला तर अहिंसेचा अंतिम परिणाम निश्चित विजय आहे. पण खरें पाहिलें तर जेथें पराजयाला किंमत नाहीं तेथें विजयाचीहि कांहीं किंमत होऊं शकत नाही.

" ......अहिंसा श्रद्धा आणि अनुभवाची गोष्ट आहे. "

काहीं मर्यादेच्या पुढें ती तर्काचा विषय होऊं शकत नाहीं.

—'हरिजन' १२–१०–३५.

x x x

## सफल अहिंसेच्या कांहीं अटी.

( १ ) अहिंसा परम श्रेष्ठ मानवधर्म आहे. पशुबलापेक्षा तो अनंत पटींनीं महान् आणि उच्च आहे.

( २ ) ज्याची या प्रेमरूपी परमेश्वरावर सजीव श्रद्धा नाहीं त्या लोकांना शेवटीं यापासून फायदा होणार नाहीं.

( ३ ) मनुष्याचा स्वाभिमान आणि सन्मानभावनाची ती सर्वांत मोठी रक्षक आहे. होय, ती मनुष्याच्या चल अचल संपत्तीचें नेहमीं रक्षण करण्याचें आश्वासन देत नाहीं—जर मनुष्यानें तिचा व्यवस्थित अभ्यास केला तर तो शस्त्रधारी सेनेपेक्षा अधिक चांगल्या तऱ्हेनें रक्षण करूं शकतो.

हें तर स्पष्ट आहे कीं, ती अन्यायानें मिळविलेली संपत्ति आणि दुराचारांचें रक्षण करण्याला जराहि सहाय्य करूं शकत नाहीं.

( ४ ) जी व्यक्ति आणि राष्ट्र अहिंसेचें अवलंबन करूं इच्छितें, त्यांनीं आत्म-गौरवाशिवाय आपलें सर्वस्व ( राष्ट्राच्या बाबतींत एकेक माणूस ) देण्यास तयार राहिलें पाहिजे. आणि म्हणूनच परकीय देश गिळंकृत करणें अर्थात् करण्यास आपल्या संरक्षणासाठीं पाशवी शक्तीवर ज्याला अवलंबून रहावें लागतें असा आधुनिक साम्राज्यवादाशीं अहिंसेचा बिलकुल मेळ बसत नाहीं.

( ५ ) अहिंसा एक अशी शक्ति आहे कीं, जिचा आश्रय बालक, तरुण, वृद्ध, स्त्री–पुरुष सगळे घेऊं शकतात, मात्र त्याची त्या करुणामय अहिंसेच्या ठिकाणीं तसेंच मनुष्यमात्रांत सजीव श्रद्धा पाहिजे. जर आपण अहिंसा हाच आपल्या जीवनाचा सिद्धांत ठरविला तर तो आपल्या सर्व जीवनमय झाला पाहिजे. ती कधीं कधीं आचरणांत आणून आणि सोडून लाभ होऊं शकत नाहीं.

( ६ ) अहिंसा फक्त व्यक्तीलाच लाभदायक आहे आणि जनसमूहाला नाही असें समजणें जबरदस्त चूक आहे. जशी ती व्यक्तीला धर्मस्थानीं आहे, तशीच ती राष्ट्रालाही धर्मस्थानीं आहे.

—ह. से. ५–९–३६. पृष्ठ २२८–२२९.

## अहंकार आणि हिंसा.

“ ......जिथें अहंकार आहे तिथें हिंसा अवश्य आहे. प्रत्येक कार्य करण्याच्या वेळेस मनाला एक प्रश्न केला पाहिजे कीं, येथें ‘ मी ’ [ अहंकार ] आहे कीं नाहीं. ? जेथें ‘ मी ’ ( अहंकार ) नाहीं तेथें हिंसा नाहीं. ”

—नवजीवन हिं. न. जी. १०।६।२६ पृ. ३३९.

## उदारता आणि अहिंसा.

“ ........उदारता अहिंसेचा अवयव आहे. तिच्या शिवाय अहिंसा ही पंगू असल्यानें ती चालूंच शकत नाहीं. ”

—ह. से. २७–७–४०. पृ. १९६.

## अहिंसा.

"........जेथें अहिंसा आहे तेथें कवडी [ पैसा ] ही राहूं शकत नाहीं."

—गांधी, सेवासंघ संमेलन, सावली ३ मार्च ३६.

x x x

"......सत्य आणि आहिंसेचा मार्ग तलवारीच्या धारेप्रमाणें आहे. खुराक व्यवस्थित घेतला तर तो शरिराला पोषक ठरतो. त्याचप्रमाणें अहिंसेचें पालन व्यवस्थित तऱ्हेनें केलें गेलें तर ती आत्म्याला पोषण देते."

—हॅं. से. ९-४-१९३८ पृष्ठ ५८. गांधीसेवासंघाच्या डेलांग अधिवेशनांत २५-३-३८ ला दिलेल्या प्रवचनांतुन.

## खरी अहिंसा.

अहिंसा, प्रेम आणि तितिक्षा (क्षमासहनशीलता) यांचें प्रमाण वाढवून सत्य शिकविते. प्रेम सौद्याची आणि पैजेची गोष्ट नाहीं. जो अहिंसकाच्या बरोबर अहिंसक रहातो त्याला अहिंसक कोण म्हणेल ? या बाबतीत मनुष्य आपल्या स्वभावाप्रमाणें वागला. जेव्हां मी खुनी माणसाशीं एक होऊन मरून जाईन तेव्हां मला दुनिया बहादूर म्हणेल........."

—गांधी सेवासंघसंमेलन. डेलांग २५-३-३८.

## अहिंसेचा स्वभाव.

" ......अहिंसेचा स्वभावच असा आहे कीं, ती दौडत दौडत हिंसेच्या मुखांत पडते आणि हिंसेचा स्वभाव असा आहे कीं, ती ज्याला मिळते त्याला खाऊन टाकते."

—गांधी-सेवासंघसंमेलन, वृंदावन ३-५-३९. ( प्रास्ताविक भाषणांतून )

## अहिंसेचा राजमार्ग.

" परस्पर विश्वास आणि सरळ मनानें दुसऱ्याची बाजू समजून घेण्याची तयारी हाच अहिंसेचा राजमार्ग होय."

—गांधी से. संघसंमेलन, वृंदावन ( बिहार ) ५-५-३९.

## अहिंसा.

" ......अहिंसेमध्यें हिंसकाची हिंसा शांत करण्याची शक्ति असली पाहिजे. "

x x x

" ......अहिंसेचें लक्षण म्हणजे सरळ हिंसेच्या तोंडांत दौडत जाणें होय. "

x x x

"......अहिंसा भेकडाचें शस्त्र नाहीं. ती म्हणजे परम पुरुषार्थ आहे. वीराचा धर्म आहे. सत्याग्रही बनावयाचें असेल तर आपलें अज्ञान, आळस सर्व कांहीं दूर झालीं पाहिजेत. आपल्या लोकांत सतत जागृति झाली पाहिजे. गुंगी अशी गोष्टच रहाता कामा नये. त्याचवेळीं अहिंसा चालूं शकते. खरी अहिंसा बाणल्यावर आपल्या वाणींतून, आचारांतून, व्यवहारांतून अमृत वाहूं लागेल...... "

x x x

"......संपूर्ण आत्मशुद्धीच्या प्रयत्नात मरणास तयार होणें ही अहिंसेची अट आहे. "

—ह. से. २०-५-३९.

# (४) अहिंसा वीरधर्म आहे.

## भ्याडपणा आणि अहिंसा.

"......माझ्या अहिंसाधर्मात संकटाच्या वेळीं आपल्या आश्रितांना संकटात पळून जाण्याला स्थान नाहीं. मारणें किंवा नामर्दपणें पळून जाणें या दोहोंपैकीं कोणती तरी एक गोष्ट मला पसंत करावी लागली तर माझा सिद्धांत सांगतो कीं, मारण्याचा—हिंसेचा रस्ता पसंत कर. "

—यं. इं., हिं. न. जी. १-६-२४. पृ. ३३६.

x x x

" ......भिऊन पळून जाणें, मंदीर सोडणें अथवा वाद्य वाजविणें बंद करणें, अथवा आपलें रक्षण न करणें, ही मनुष्यता नाहीं. ती

नामर्दी आहे. अहिंसा वीरतेचें लक्षण आहे. अहिंसा ही काय चीज आहे हें सुद्धां भित्रा—भ्याड मनुष्य जाणूं शकत नाहीं.

नवजीवन. हि. न. जी. १४-९-२४. पृ. ३४।३५.

## अहिंसा वीराचें लक्षण आहे.

"......मी तर ओरडून सांगत आहें कीं, अहिंसा-क्षमा-हें वीराचें लक्षण आहे. ज्याच्यात मरण्याची शक्ति आहे, तोच मारण्यापासून स्वतःला परावृत्त करूं शकतो. माझ्या लेखामुळें तुम्ही भीरुतेला अहिंसा मानली, स्वजनांचें रक्षण करण्याच्या धर्माला गमावून बसलेत तर माझी अधोगति झाल्याशिवाय राहाणार नाहीं. मी कितीतरी वेळां लिहिलें आहे कीं, भ्याडपणा हा कधी धर्मच होऊं शकत नाहीं. जगात तलवारीला स्थान तर जरूर आहे. भ्याडाचा तर क्षयच होऊं शकतो. नि त्याचा क्षय होणेंहि योग्य आहे. परंतु मी हें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे कीं, तलवार चालविणाऱ्याचाहि क्षयच होईल. तलवारीनें मनुष्य कोणाचा बचाव करणार आणि कोणाला मारणार ? **आत्मबलाच्या समोर तलवारीचें बल तृणवत् आहे.** अहिंसा आत्म्याचें बल आहे. तलवारीच्या उपयोगानें आत्मा शरीरवत् बनतो. अहिंसेचा उपयोग करून आत्मा आत्मवत् बनतो.

—नवजीवन हि. न. जी. २८-९-२४. पृ. ५२.

## भ्याडपणाच हिंसा होय.

" ......खरी गोष्ट अशी आहे कीं, भ्याडपणा हीच स्वतः एक सूक्ष्म प्रकारची भीषण हिंसा आहे. आणि म्हणूनच शारीरिक हिंसेपेक्षां तिला निर्मूल करणें फारच कठीण आहे.

—यं. इं. हिं. न. जी. ८-१-२५. पृ. १७७.

## मारणें केव्हां योग्य आहे ?

"......माझा धर्म मला शिकवीत आहे कीं, स्त्रियाच्या रक्षणाकरितां आपला प्राण दे. दुसऱ्याला मारण्याकरितां हातसुद्धां उचलूं नको. पण माझा धर्म मला हेंहि सांगण्याची मोकळीक देतो कीं ,जर असा प्रसंग आला कीं,

आपल्या आश्रयाला आलेल्या लोकांना सोडून पळून जाणें किंवा जबाबदारीचें काम सोडून पळून जाणें अगर हल्ला करणाऱ्याला मारणें, यापैकीं एक गोष्ट पसंत करावयाची असली तर प्रत्येक व्यक्तीचें कर्तव्य आहे कीं,त्यानें मारतां मारतां तेथेंच मरून जावें पण केव्हांहि आपली जागा सोडून पळूं नये. मला अशा धट्ट्याकट्ट्या लोकांना भेटण्याचें दुर्भाग्य वांट्यास आलें की, त्यांनीं अगदी सरळपणानें येऊन मला सांगितलें–आणि जें मीं मोठ्या शरमेनें ऐकलें–कीं,मुसलमान बदमाषानीं हिंदू अबलांवर बलात्कार करताना त्यांनीं आपल्या डोळ्यांनीं पाहिला. ज्या समाजांत जवानमर्द लोक राहातात तेथें डोळ्या-देखत घडलेल्या बलात्काराच्या साक्षी देणें असंभवनीय झालें पाहिजे. असल्या जुलमाची खबर देण्याकरितां एकहि व्यक्ति जिवंत राहतां कामा नये. एक भोळसट पुजारी, की ज्यानें अहिंसेचा हेतु ओळखला नाही, तो माझ्याशीं खुषींत येऊन सांगूं लागला कीं, ‘जेव्हां हुल्लडबाज मंदिरांत मूर्ति फोडण्याकरितां घुसले, तेव्हां मी मोठ्या हुशारीनें लपून राहिलों !’ माझें मत असें आहे कीं, अशा तऱ्हेचे लोक पुजारी होण्याला लायक नाहींत. त्यानें तेथेंच मरून जावयाला पाहिजे होतें.त्या वेळीं त्यानें आपल्या रक्तानें मूर्ति पवित्र करावयाला हवी होती. आणि जर त्याला, आपल्या जागेवरून हात न उगारतां ‘ईश्वरा या खुनीवर दया कर’ असें म्हणण्याची हिंमत नव्हती तर, मरण्याचीच पाळी आली तर अशा स्थितीत मूर्ति फोडणाऱ्याचा संहार करणेंहि त्याला योग्य होतें. पण आपल्या या नश्वर देहाला बचावण्याकरितां लपणें हें मनुष्योचित नव्हतें.

—य. इं हिं. न. जी. ८-१-१९२५.

## हिंसक आणि अहिंसा.

“.. ...घाबरून जो हिंसा करीत नाहीं तो हिंसाच करतो. उंदीर मांजराचे बाबतींत अहिंसक नाहीं. त्याचें मन नेहमीं मांजरीची हिंसा करीत असतें. दुर्बल असल्यामुळें तो मांजरीला मारूं शकत नाहीं. हिंसा करण्याचें सामर्थ्य असून सुद्धां जो हिंसा करीत नाहीं, तोच अहिंसाधर्माचें पालन करण्याला समर्थ होतो. जो मनुष्य स्वेच्छेनें आणि प्रेमानें कोणाचीहि हिंसा करीत नाहीं, तोच अहिंसाधर्माचें पालन करतो. अहिंसेचा अर्थ प्रेम,

दया, क्षमा असा आहे. शास्त्रें त्यांचें वर्णन वीरगुणामध्यें करतात. ही वीरता शरीराची नाहीं तर हृदयाची आहे. "

—नवजीवन. हिं. न. जी. २०-८-२५. पृ. ३.

## भ्याडपणा हिंसेचा प्रकार आहे.

...घाबरून पळून जाणें हा भ्याडपणा आहे आणि भ्याडपणानें तडजोडही होऊं शकत नाहीं किंवा अहिंसेला कांहीं मदत होत नाहीं. भ्याडपणा हा हिंसेचा एक प्रकार आहे आणि तो जिंकणें फार अवघड आहे. हिंसेनें प्रेरित झालेल्या माणसाला हिंसा सोडून देऊन अहिंसेची उत्तम शक्ति ग्रहण करण्याकरितां समजावण्यात सफल होण्याची आशा करणें शक्य आहे. पण भ्याडपणा हा सर्व प्रकारच्या शक्तीचा अभाव होय. "

" जो मरण्याचें जाणतो त्याला मी आपली अहिंसा सफलतापूर्वक शिकवूं शकतों. जो मरणाला घाबरतो त्याला मी अहिंसा शिकवूं शकत नाहीं. "

—यं. इं. हिं. न. जी. १५-१०-२५. बिहारच्या दौऱ्यांत, भागलपूरच्या सभेंत हिंदु-मुस्लिम प्रश्नावर बोलतांना.

## अहिंसा आणि अभय.

" ......अहिंसा क्षत्रियाचा धर्म आहे. महावीर क्षत्रिय होते, बुद्ध क्षत्रिय होते. रामकृष्णादि क्षत्रिय होते. ते सर्व थोडेबहुत अहिंसेचे उपासक होते. आपण त्यांच्या नांवावर अहिंसेचें प्रवर्तन करूं इच्छितों. या वेळीं अहिंसेपण भित्र्या वैश्यवर्गानें घेतल्यामुळें तो धर्म निस्तेज झाला आहे. अहिंसेचें दुसरें नांव क्षमेची परिसीमा ! पण क्षमा तर वीरपुरुषाचें भूषण आहे. अभया ( शूरपणा ) शिवाय अहिंसा असूं शकत नाहीं......"

—नवजीवन. हि. न. जी. २८-१०-२६, पृ, ८५.

## हिंसा विरुद्ध भ्याडपणा.

" ......माझा अहिंसाधर्म एक महान् शक्ति आहे. त्यांत भ्याडपणा किंवा कमजोरी यांना बिलकुल स्थान नाहीं. हिंसेचा उपासक

अहिंसेचा भक्त बनूं शकता. पण भ्याडाचा अहिंसक बनण्याची कधींच आशा असूं शकत नाहीं. याकरितां मीं कित्येक वेळीं लिहिलें आहे कीं, कष्ट सहन करूं शकत नसलों अर्थात् अहिंसा द्वारा आपल्या स्त्रियाचें आणि पूजा-स्थानांचें आपण रक्षण करूं शकत नसलों तर, आपण मर्द आहों तर निदान सशस्त्र प्रतिकार करूनही जरूर त्यांचें रक्षण केलें पाहिजे.

—यं. इं. हिं. न. जी. १६-६-२७, पृ. ३४९.

## अहिंसा वीर-धर्म आहे.

" ......अहिंसा हा काही भ्याडाचा किंवा निर्बलाचा धर्म नाहीं. तर तो बहादुर आणि मृत्यूशीं खेळणाऱ्याचा धर्म आहे. तलवारीने लढत असता जो मरतो तो तर शूर आहेच. पण जो मारल्याशिवाय समोर छाती-ठोकपणें उभा राहून मरतो तो अधिक शूर होय.........माराला घाबरून जो आपल्या स्त्रियाचा अपमान सहन करतो तो मर्द(पुरुष)न रहातां नामर्द ठरतो. तो पति व्हावयाला लायक नसतो, नि पिता किंवा भाऊही व्हावयालाहि लायक नसतो. जेथें नामर्द राहातात तेथें बदमाष असणारच......."

—नवजीवन. हिं. न. जी. ११-१०-२८, पृ. ६२.

## अहिंसा विरुद्ध भ्याडपणा.

" ......अहिंसा आणि भ्याडपणा परस्पर विरोधी शब्द आहेत. अहिंसा सर्वश्रेष्ठ सद्गुण आहे. भ्याडपणा वाईटांतला वाईट आहे. अहिंसेचें मूळ प्रेमांत आहे. भ्याडपणाचें मूळ तिरस्कारांत आहे. अहिंसक सदा कष्ट-सहिष्णु असतो, तर भ्याड नेहमीं जाचक असतो. संपूर्ण अहिंसा उच्चतम वीरता आहे."

—यं. इं. हिं. न. जी. ३१-१०-२९, पृ. ८५.

## भ्याडपणा विरुद्ध शरीरबल.

" ......भीरुतेपेक्षां शूरतेनें शरीरबलाचा उपयोग करणें अधिकें श्रेयस्कर आहे. "

—गां. से. सं. डेलांग २५-३-३८.

x x x

" ......वाटेल तें होवो, भ्याडपणाला सोडलेंच पाहिजे. अहिंसा ही लाचार आणि भित्र्याकरितां नाहीं."

—गां. से. सं. स. डेलांग; २६-३-३८.

x x x

लढाईला घाबरतो, रक्ताला घाबरतो, हत्याराच्या आवाजानें ज्याचें हृदय कांपतें अशा भ्याडाची आपली अहिंसा नाहीं हेंच सांगण्याचा माझा हेतु आहे. आपली अहिंसा पठाणाची अहिंसा झाली पाहिजे.

—गांधीसेवासंघ संमेलन, डेलांग २७-३-३८.

## भ्याडपणा विरुद्ध अहिंसा.

" ......भ्याडपणापेक्षां शूरतेनें शारीरिक बलाचा उपयोग करणें हजारपटीनें चांगलें आहे. भ्याडपणापेक्षां लढतां लढता मरून जाणें हजारपटीनें उत्तम आहे. आपण सर्व मूलतः पशुहि असूं आणि मी हें मानावयाला तयार आहे कीं, आपण हळू हळू उत्क्रांतीच्या क्रमानुसार पशूचे मनुष्य झालों आहोंत. प्रथम आपण पशुबल घेऊन अवतीर्ण झालों होतों, पण आपला मानव अवतार याकरतांच झाला आहे कीं, आपल्या हृदयांत जो ईश्वर आहे, त्याचा आपण साक्षात्कार करूं शकूं. हा मनुष्याचा विशेषाधिकार आहे. आणि हेंच मनुष्य आणि पशुसृष्टींतलें अंतर होय."

—ह. से. ९-४-३८, पृष्ठ ५९, गांधी सेवा संघ २५-३-३८.

## भ्याडपणा आणि हिंसा.

" काय, तुम्ही इतक्या दूर माझ्याबरोबर येण्यास तयार आहांत? काय, मी जें कांहीं सांगत आहें, तें आपल्या बुद्धीला पटत आहे? तर मग, आपल्याला अंतर्भागाच्या अगदीं आंत असलेल्या विचारांतूनहि हिंसा काढून टाकली पाहिजे. जर आपण माझ्याबरोबर येऊं शकत नसलांत तर आपल्या मार्गानें खुषीनें जा. अगर आपण दुसऱ्या कोणत्या रस्त्यानीं आपल्या मुक्कामावर पोचूं शकत असलांत तर बेशक जा. आपण माझ्या अभिनंदनाला पात्र व्हाल. **कारण मी भ्याडपणा कोणत्याहि परिस्थितींत सहन करणार नाहीं.** मी मेल्यावर कोणी असें सांगतां कामा नये कीं, गांधींनीं लोकांना

नामर्द बनावयाला शिकविलें. आणि जर आपल्याला **असें वाटलें असेल कीं, माझी** अहिंसा भ्याडपणासारखी आहे, तिने भ्याडपणाच निर्माण होईल तर ती सोडून द्यावयाला जराहि कचरूं नका. **निव्वळ भ्याडपणानें मरण्यापेक्षां** आपण **शौर्यानें प्रहार करतांना अगर प्रहार सहन करतांना मरणें** कितीतरी **श्रेष्ठ समजेन**. माझ्या स्वप्नातली अहिंसा संभवनीय **झाली** नाहीं तर अहिंसेचें सोंग करण्यापेक्षा त्या सिद्धांताचा त्याग **करणेंच इष्ट होईल**.

—१७–६–३९ हरिजन.

## वीराची अहिंसा.

"......फक्त मरून जाऊन आपण परीक्षेंत उत्तीर्ण होणार नाहीं. आपल्या हृदयांत मारणाऱ्याबद्दल दया पाहिजे.......तो अज्ञान आहे याकरितां ईश्वराजवळ प्रार्थना करीन कीं, त्याला ज्ञान दे. मी क्षमेनें त्याचे आघात सहन करीन. माझ्या हृदयातून दयेचे उद्गार निघतील. केवळ लोकाना ऐकविण्याकरिता नव्हे तर, निव्वळ खऱ्या अंतःकरणांतून मी त्याच्यावर दया करीन. कोणी हल्ला केला तर माझा त्याच्यावर राग होणार नाहीं. तो मारीत राहील, मी सहन करीत राहीन. मारता मारताहि माझ्या मुखावर दुखावल्याचा भाव दिसणार नाहीं. पण हास्य राहील. माझ्या हृदयांत रोषाच्या ऐवजीं दया असेल तर मी सांगेन कीं, मी वीर पुरुषाची अहिंसा सिद्ध करून दाखविली. अहिंसेंत इतकी ताकद आहे कीं, ती विरोधकाला मित्र बनविते आणि त्याचें प्रेम मिळविते."

## अहिंसा भ्याडपणाचा नाश करते.

"........अहिंसा कांहीं मर्यादेपर्यंत अशक्ताचें शस्त्र होऊं शकते, पण कांहीं मर्यादेपर्यंतच. परंतु ती भेकडाची–भ्याडाचें शस्त्र कधींच होऊं शकत नाहीं. आणि जर कोणी भेकड असूनही अहिंसा धारण करील तर त्याचा अहिंसा नाश करील."

—गां. से. सं, सम्मेलन, मालिकंदा २१ २–४०.

## जीवन मृत्यूची शय्या आहे.

"......हिंदुस्थानांतील लढवय्यांच्या मी अग्रभागीं राहीन. जीवनाला मृत्यूची शय्या समजून चालेन. त्याच्या संकटकाळीं बिछान्यावर एकटा झोपणार नाहीं. नेहमीं यमदूताला जवळ घेऊन झोंपेन. मृत्यूला (देवता) सांगेन कीं, तूं मला नेऊं इच्छितोस तर घेऊन जा; मी तर तुझ्या तोंडांत नाच करीत आहे. जोंपर्यंत नाचूं देतोस तोंपर्यंत नाचेन, नाहीतर तुझ्या कुशींत झोपून जाईन आणि आपण अशा तऱ्हेनें मृत्यूच्या भयावर विजय मिळविला, तर हा संघ अमर होईल. आणि आपण जर अशा तऱ्हेचे असाल तर कोणत्याहि संघाची काय जरूर आहे ? तर मग तुम्ही स्वतःच एक संघ आहात."

— मालिकांदा (बंगाल) २२-२-४० गां. से. संघाच्या सदस्यांना संघ विसर्जन करण्याचा सल्ला देतांना.

## लाचारी.

"...... हिंसेशी टक्कर देताना लाचारी करणें अहिंसा नाही तर भ्याडपणा आहे. अहिंसा भ्याडपणाच्या बरोबर मिळूं देता कामा नये."

— ह. से. २३-३-४० पृष्ठ ४८, शांतिनिकेतन.

## मृत्यूचें भय.

"......मृत्यूच्या भयापासून मुक्त असलेल्या प्रत्येक पुरुष अथवा स्त्रीने स्वतः मरून आपले किंवा आप्तेष्टाचें रक्षण करावें. मरण आम्हाला पसंत नसतें हें खरें आहे आणि म्हणून आम्ही शरण जातों. कोणी मरण्याच्या बदल्यात सलाम करणें पसंत करतात, कोणी धन देऊन जान बचावतात, कोणी दांतां तृण धरतात आणि कोणी मुंगीप्रमाणें घुटमळत राहाणे पसंत करतात. अशा तऱ्हेनें कोणी स्त्री विवश होऊन प्रतिकार सोडून, पुरुषाच्या पशुतेला बळी पडते .......सलामीपासून सतीत्वभंगाच्या सर्व क्रिया एकाच गोष्टीच्या (भीरुतेच्या) सूचक आहेत. जीवनाचा लोभ काय काय करावयाला लावणार नाहीं ? एवढ्याच करिता जो जीवनाचा लोभ सोडून जिवंत आहे तोच खरा जिवंत होय! "**तेन त्यक्तेन भुञ्जीथाः**" प्रत्येक अभ्यासकानें हा अनुपम श्लोक पाठ केला पाहिजे.

रण यासाठीं केवळ मौखिक कर्तव्यपालनाच्या गप्पानीं काम होणार नाही. तो आपल्या हृदयाच्या आत उतरला पाहिजे. जीवनाचा स्वाद घेण्याकरितां आपण जीवनाच्या लोभाचा त्याग केला पाहिजे."

—सेवाग्राम २३-२-४२ हरिजन १-३-४२.

## अहिंसा आणि स्त्रियांवरील अत्याचार.

"एखाद्या स्त्रीवर जर अत्याचार झाला तर तिनें हिंसे-अहिंसेचा विचार करीत बसण्याचें कारण नाही. आत्मसंरक्षण हें तिचें प्रधान कर्तव्य होय. आपल्या अब्रूच्या रक्षणार्थ तिच्या मनात येईल त्या पद्धतीचा व साधनाचा उपयोग करण्याची तिला मुभा आहे. देवानें तिला नखें व दांत दिले आहेत. सर्व शक्ति एकवटून तिनें त्यांचा उपयोग केला पाहिजे व या प्रयत्नांत प्राणहि अर्पावा. मरणाचें भय ज्या पुरुषानें वा स्त्रीनें अजिबात टाकलें आहे तो स्वतःचाच केवळ नव्हे, तर इतरांचाहि बचाव आपल्या प्राणदानानें करूं शकेल."

—हरिजन, १-३-१९४२.

## अहिंसक बळ आणि शस्त्रें.

"हिंदुस्थानाला एकाएकीं सशस्त्र राष्ट्र बनविणें व्यवहारतः अशक्य आहे. आमच्या लोकाना बलवान् करण्याचे दोन मार्ग आहेत—एक त्याच्या हातांत शस्त्रें देणें किंवा दुसरा त्याना अहिंसक बळाचें शिक्षण देणें. माझा अगदीं विश्वास आहे कीं, माझा मार्गच अधिक अचूक, अधिक खात्रीचा व अंतीं अधिक यशस्वी ठरणारा आहे. जपानच्या किंवा जर्मनीच्या सैन्याचा शस्त्रबळानें पाडाव करणें झाल्यास तुम्हाला त्याच्यापेक्षां अधिक बलवान् म्हणजेच अधिक वाईट व अधिक निर्दय बनावें लागेल. मग तुम्हीं काय मिळवलेंसें झालें ? काहीं नाहीं."

—हरिजन १९-४-१९४२.

## अन्याय आणि अहिंसात्मक प्रतिकार.

"लोकांना आगाऊ नोटीस न देतां (लष्करी कामासाठीं) आपापल्या जागा खालीं करून देण्याचे हुकूम अधिकारी, लोकांना करीत

आहेत, अशा मुबलक हकिगतींची सर्व दिशाकडून मजवर वृष्टि होत आहे. ( अशा लोकांत जमीनदार, मध्यम वर्गाचे लोक, तसेच खेडुत व मजुरहि पुष्कळसे आहेत )...... या लोकांची स्थिति दयाजनक आहे......त्यांना मला एवढेच सांगावयाचें आहे कीं, ' हलूं नका, जें होईल तें भोगा. ' त्यांना जबरदस्तीने हुसकून लावता येणार नाहीं, आणि जर त्यांना हुसकून दिलेंच तर त्यांच्या ओरडीचा जितका उपयोग होईल तितका वृत्तपत्रांतील मजकुराचा होणार नाहीं. "

—हरिजन १४-६-१९४२.

## शूराची अहिंसा.

" परकीय सैन्याला, स्वतंत्र हिंदुस्थानांत राहू देण्याची माझी प्रवृत्ति ही, हिंदुस्थानच्या कमकुवतपणाची कबुलीच आहे. हिंदुस्थान हा सबंध अहिंसावादी कधीच नव्हता व तो तसा आहे असें कोणीं म्हटलेंहि नाहीं... एवढें निश्चित आहे कीं, हिंदुस्थानवर आक्रमण करणाऱ्या बलवान् सैन्याला सामना देऊं शकेल अशी शूराची अहिंसा आपल्यामध्यें आहे असें अद्याप-पावेतो हिंदुस्थानने शाबीत केलेलें नाहीं. अशी शक्ति जर आपण संपादिली असली तर आपण यापूर्वीच स्वातंत्र्य मिळविलेंहि असतें व परकीय सैन्य देशात ठेवावें कीं न ठेवावें हा प्रश्नहि उपस्थित झाला नसता. "

हरिजन, १९-७-१९४२.

× × ×

" त्या त्या असहकार-वाद्यानें गोळीबाराचें स्वागतच केलें पाहिजे काही झालें तरी जपान किंवा दुसरी कोणतीहि सत्ता यांच्यापुढें नमण्यापेक्षा गोळीबारात ठार होणेंच मी अधिक पसंत करीन. "

—हरिजन २६–७–१९४२.

## अहिंसेचें सामर्थ्य आणि करावें किंवा मरावें.

' मला हें माहीत आहे कीं, देशांत काय किंवा काँग्रेसमध्यें काय, मजप्रमाणे अहिंसा हें ब्रीद मानणारे फारच थोडे लोक आहेत; पण माझ्या पुरता माझा मार्ग स्पष्ट आहे. माझ्या अहिंसेची परीक्षा होत आहे. या दिव्यांतून मी शीरसलामत बाहेर पडेन अशी मला आशा आहे. अहिं-

सेच्या सामर्थ्याबाबतची माझी श्रद्धा अचल आहे. शत्रुपक्षासह सर्व जगाला जर मी अहिंसेच्या मार्गाला लावूं शकलों तर ते मला हवेंच आहे. पण एवढें प्रचंड कार्य मानवी शक्तीनें होणें शक्य नाहीं. हें परमेश्वराच्या हातीं आहे. माझ्यापुरतें मी इतकेंच म्हणतो कीं 'करावें किंवा मरावें.'

हरिजन ९-८-१९४२.

## अहिंसा व स्त्रियांचा शीलभंग

भगिनींच्या अब्रूचा बळी देऊन मला स्वराज्य नको. अहिंसेच्या नावानें वावरणारी चीज, भगिनींच्या अब्रूचे रक्षण करण्याची ताकद तुम्हाला देत नसेल अगर स्वतःची अब्रु रक्षण करण्यास भगिनींना बळ देत नसेल तर ती अहिंसा नव्हे, दुसरी कोणती तरी चीज आहे तो. रावणापासून सीतेचें रक्षण कोणी केलें ? कवि आपणांस सांगतो कीं, सीतेची पवित्रता एवढी मोठी होती कीं, तिच्या संमतीवांचून आपली वासना पार पाडण्याची हिंमत रावणाला झाली नाहीं. 'आम्हीं अहिंसेची प्रतिज्ञा घेतल्यामुळें आमच्या भगिनींची अब्रु आम्ही राखूं शकलों नाहीं.' असें म्हणत तुम्ही माझे समोर याल तर मी तुम्हांला समोर देखील उभें करणार नाहीं ! भ्याडपणाची ढाल म्हणून अहिंसेचा कधींही उपयोग करतां कामा नये. अहिंसा हे वीराचें शस्त्र आहे. अशा अत्याचारांचे असहाय्य साक्षी बनून राहण्यापेक्षां हिंसक रीतीनें लढतां लढतां तुम्ही मरून जाणं मला आवडेल. खरा अहिंसक पुरुष अशा अत्याचारांची कहाणी सांगण्यास कधीं जिवंत रहाणार नाहीं. अहिंसकानें प्रतिकार करतां करतां आपले प्राण खर्ची टाकलेले असतील."

## बदमाष आणि अहिंसा.

[ सरहद्द प्रांताच्या प्रवासांत खुदाई खिदमतगारांनीं गांधीजींना प्रश्न विचारला कीं, "बदमाषानें आपणास ठार न करता करकचून बांधून टाकलें व अशा रीतीनें स्वतःच्या दुष्कृत्याचे मूक प्रेक्षक बनण्यास भाग पाडलें तर काय करावयाचें ?" ]

गांधीजी उत्तरले, "मी असा झगडेन कीं, एक तर माझी सारी बंधनें तुटून पडतील, नाहींतर तीं तोडण्याच्या प्रयत्नात मीच मोडून पडेन!

'कोणत्याहि परिस्थितीत मी दुराचाराचा लाचार प्रेक्षक बनून राहणार नाहीं' अशी तीव्र भावना जेथें असेल तेथें परमेश्वर मदतीला धावून येईल आणि अशा दुराचाराच्या जिवंत प्रेक्षक बनण्याच्या वेदनातून कोणत्या ना कोणत्या प्रकारें सुटका करील."

— हरिजन १०-२-४६.

## ऑगस्ट-आंदोलन आणि अहिंसक शौर्य.

"ऐतिहासिक प्रतिक्रियेच्या दृष्टीनें पाहिलें तर प्रत्येक लढ्यातून-ऑगस्ट आंदोलनातूनहि--देश स्वातंत्र्याकडेच पुढें सरकला आहे असें आढळून येईल. मीं म्हटलें ते एवढेंच कीं, मला हवें असलेलें अहिंसक शौर्य दाखविलें असतें तर ही प्रगति झपाट्याने झाली असती. या अर्थानें मोडतोडीच्या प्रवृत्तींनीं देशाच्या स्वातंत्र्याची प्रगति मागें पडली आहे. जयप्रकाश नारायणसारख्या लोकांची हिंमत, देशभक्ति आणि त्यागभावना यांच्याबद्दल माझ्या मनात फार आदर आहे. पण जयप्रकाश माझे आदर्श नेते नाहींत. बहादुरीबद्दल पदकच द्यावयाचें झालें तर मी तें जयप्रकाशना देणार नाहीं. त्यांची पत्नी प्रभावती हिला देईन. कारण ती साधीसुधी, सरळ व राजकारणात अनभिज्ञ असून देखील स्वतःच्या व्यक्तित्वांत सत्याग्रहाचें युद्धसामर्थ्य तिने मूर्तिमंत उभें केले आहे व त्या सामर्थ्यासमोर खुद्द जयप्रकाशनांहि नमावें लागलें. ऑगस्ट आंदोलनाविषयीं मीं जें काहीं म्हटलें तें भूतकालांतील घटनावर तराजू घेऊन न्यायनिवाडा करण्याच्या दृष्टीनें नव्हे. या आंदोलनाचा धिक्कार करण्याचें मीं नेहमींच नाकारलें आहे. मीं जें सांगितलें तें भविष्य-कालीन मार्गदर्शनाकरिता."

—हरिजन १०-२-४६.

# (५) अहिंसा : विविध दृष्टिकोन.

## अहिंसा असहयोगाहून अधिक महत्त्वाची आहे.

"......जर आपण ही गोष्ट लक्षांत ठेवली कीं, असहयोगापेक्षां अहिंसा अधिक महत्त्वपूर्ण आहे आणि अहिंसेशिवाय असहयोग पाप आहे.

तर आजकाल मी जे विचार या पानांवर ग्रथित करीत आहें ते सूर्य-प्रकाशाप्रमाणें स्पष्ट होतील. "

—यं. इं. हि. न. जी. १४-९-२४ पृष्ठ ३६.

## अहिंसावादी उपयोगितावादी नाहीं.

"......गोष्ट अशी आहे कीं, अहिंसावादी उपयोगितावादाचें समर्थन करूं शकत नाहीं. तो तर 'सर्वभूतहिताय' म्हण जे सर्वांकरितां—अधिकतम हिताकरिता—प्रयत्न करील आणि याच आदर्शप्राप्तीकरिता मरून जाईल. या प्रकारानें एवढ्याचकरिता मरण्याचें इच्छील कीं, ज्यामुळें दुसरे विजयी होतील. दुसऱ्याच्या सेवेबरोबरच आपली मुद्धां सेवा स्वत:चें बलिदान करूनहि करील. सर्वांच्या अधिकतम सुखामध्यें अधिकांशाचें अधिकतम सुख भरलेलें आहे."

—यं. इं. हिं. न. जी. ९-१२-२६

## रुढिग्रस्त अहिंसा.

"....रुढी किंवा आवश्यकतेमुळें पाळल्या जाणाऱ्या अहिंसेंत भौतिक परिणाम आले तरी प्रत्यक्ष अहिंसा एक उच्च प्रकारची भावना आहे. तिचें आरोपण त्याच व्यक्तीवर केलें जातें कीं, ज्याचें मन अहिंसक आहे आणि ज्याचें मन प्राणिमात्राबद्दल करुणेनें आणि प्रेमानें उचंबळून येतें. आपोआपच कांहीं दिवस मांसाहार केला नाहीं, यामुळें आजहि करीत नाहीं, पण क्षणाक्षणाला क्रोधाविष्ट होतो, दुसऱ्याला लुबाडतो, लुबाडतांना नीति-अनीतीची पर्वा करीत नाहीं, त्यांच्या सुखदु:खाची फिकीर करीत नाहीं, तो मनुष्य कोणत्याहि तऱ्हेनें अहिंसक मानला जावयाला योग्य नाहीं. पण असंच म्हटलं पाहिजे कीं, तो घोर हिंसा करणारा आहे. त्याच्या उलट मांसाहार करणारा जो मनुष्य प्रेमानें ओतप्रोत भरतो, रागद्वेषादिकांपासून मुक्त आहे, सर्वांच्या जवळ समतेनें वागतो, तोच अहिंसक होय, तोच आदराला योग्य होय. अहिंसेचे विचार करीत असतांनांच आपण नेहमीं खाण्यापिण्याचा विचार करतों. याला अहिंसा म्हटली जाणार नाहीं, ती तर मूर्च्छा आहे. जी मोक्षदायी आहे, जी परमधर्म आहे, जिच्या निकटतेनें हिंसक प्राणी आपली हिंसा सोडून देतात, दुश्मन वैरभावाचा त्याग करितात, कठोर हृदय पाझरतें, ती अहिंसा कांहीं अलौकिकच शक्ति आहे आणि ती पुष्कळ प्रयत्नांनंतर, पुष्कळ तपश्चर्येनंतर एकाद्यालाच प्राप्त होते."

—नवजीवन; हिं. न. जी. पृ. १९-७-२८.

## हिंसा आत्मघाती आहे.

"...हिंसा आत्मघाती आहे आणि तिच्यासमोर जर प्रतिहिंसा आली नाहीं तर ती जिवंत राहूं शकत नाही......."

—यं. इं. हिं. न. जी. १७–११–२७

## फसवी हिंसा.

"...लालूच आणि कपट हिंसेची संतानेंहि आहेत आणि जनक सुद्धां आहेत ! ज्याप्रमाणें मास, रक्त आणि कोमल त्वचा याच्याशिवाय असलेला नर कंगाल, घाणेरडा वाटतो, त्याप्रमाणें हिंसा तिच्या नग्न स्वरूपांत लोकांना घाणेरडी वाटते. अशी हिंसा अधिक काल टिकूं शकत नाहीं. पण जेव्हां ती शांति आणि प्रगतीचें सोंग धारण करते तेव्हां ती पुष्कळ काल टिकून राहते."

—यं. इं. हि. न. जी. ६–२–३०.

## अहिंसा आणि दया.

"... जेथें दया नाहीं तेथें अहिंसा नाहीं. एवढेंच सांगूं शकतों कीं, ज्याच्यांत जितकी दया आहे, तितकीच त्याच्यात अहिंसा आहे......जो जगण्याकरितां खातो, सेवा करण्याकरितां जिवंत आहे, फक्त पोट भरण्याकरिता कमवीत आहे, तो काम करीत असूनसुद्धां अक्रिय होय. तो हिंसा करून सुद्धां अहिंसक आहे. क्रियाहीन अहिंसा आकाशांतील फुलाप्रमाणें आहे. क्रिया हातापायानेंच होते असें नाहीं. मन हातापायापेक्षां पुष्कळ जास्त काम करतें. विचार क्रिया आहे. विचार-रहित अहिंसा होऊंच शकत नाहीं...."

—नवजीवन. हिं. न. जी. ४–४–२९.

## अहिंसा आणि मांसाहार.

"......मांसाहारी सत्याग्रहीहि होऊं शकतो."

× × ×

" मीं मांसाहारी अहिंसक आणि निरामिष भोजक ( मांस न खाणारे ) हिंसकहि पाहिले आहेत.........निरामिषाहारींनीं अभिमान धरूं नये.

अहिंसा एक विलक्षण ( सुंदर ) गोष्ट आहे. ती भावनेचा विषय आहे. फक्त बाह्य आचाराचा नाहीं."

— गांधीसेवासंघ संमेलन, सावली ४–३–३६.

## हिंसक आणि अहिंसक प्रवृत्ति.

" हिंसक आणि अहिंसक प्रवृत्ति एकाच वेळीं चालू आहेत. ईश्वर त्याचा द्रष्टा आहे. जनता परिणाम पहात आहे. आपण हेतु पाहूं. अहिंसा ज्या तऱ्हेनें मी अमलात आणीत आहें ती नवीन गोष्ट वाटत आहे. जैनानीं आणि बुद्धांनींहि अहिंसेचे प्रयोग केले. पण ती आहारापुरती मर्यादित झाली. राजनीति आणि सामाजिक कार्यांत हिंसक आणि अहिंसक दोन्ही शक्ति प्रेरक होतात. बाह्यत: त्याच्या स्वरूपांत फरक दिसून येत नाहीं. हेतूमध्यें ( फरक ) असतो. प्रत्येक बाबतींत ही गोष्ट लक्षांत ठेवली तर हानि होणार नाहीं, आणि कठीणहि पडणार नाहीं."

—गांधी-सेवासंघ संमेलन, सावली ६–३–३६.

## संकटग्रस्त शत्रूंबरोबर आचरण.

"..... अहिंसक माणसाला कोणी शत्रु असत नाही आणि आपल्याला जो शत्रु म्हणतो, तो जेव्हां दुर्बल होतो तेव्हां अहिंसक त्याच्यावर दया करतो. तो त्याच्या संकटकाळीं त्याच्यावर स्वारी करूं इच्छित नाहीं. तो जेव्हां संकटांतून मुक्त होतो तेव्हां तो आपली लढाई सुरू करतो. ........."

— गां. से. मं. सं. डेलांग २५–३–३८.

## हिंदु-मुस्लिम प्रश्न आणि अहिंसा.

" जर आपण खरोखरच शक्तिशाली अहिंसेचा प्रयोग करत आहोत तर हिंदु-मुसलमानांमध्यें मैत्री करण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. आतापर्यंत दोस्ती नव्हती. फक्त खुशामतीनें त्यांना जिंकण्याचा प्रयत्न झाला. त्या सर्व गोष्टींत पॉलिसी होती........."

—गां. से. सं. सं. डेलांग २८–३–३८

## अहिंसा.

" मी हें मागण्याचें धाडस करतों कीं, जर माझी अहिंसा जशी असावयाला पाहिजे तशी नसली तर राष्ट्राचें मोठें नुकसान होईल. कारण शेवटीं मी शूराचे ऐवजीं भ्याड म्हणून शाबीत होईन. आणि स्वातंत्र्याकरितां लढणाऱ्यांना भ्याडपणाशिवाय दुसरी कोणती बेइज्जती न व्हो. "

× × ×

आणि जर आपल्याला पटलें कीं, हिंसेच्या लढाईशिवाय ब्रिटिश सत्ता आपण घालवून देऊं शकत नाहीं तर आपण अर्थात् काँग्रेसनें राष्ट्राला साफ साफ तसें सांगितलें पाहिजे आणि त्याकरितां तयार केलें पाहिजे. आणि त्यानंतर जें साऱ्या जगांत होत आहे तें आपणहि करूं आणि जरूर आहे तोंपर्यंत शांत राहावयाचें आणि संधि आली कीं प्रहार करावयाचा.

—ह. से. ९–४–३८.

## युरोपीय युद्ध आणि अहिंसा.

"......युरोपनें चार दिवसाच्या दुनियेंतल्या जिंदगीकरतां आपला आत्मा विकला आहे. म्यूनिचमध्यें युरोपला जी शांति प्राप्त झाली आहे, तो हिंसेचा विजय आहे. त्याजबरोबर तिचा पराभवहि आहे.........मी तर सांगत आहें कीं, आपल्या विरोधकांशीं लढतांनां मरण येणें जर शूरता आहे, जसें वस्तुतः आहे, तर आपल्या विरोधकांशीं न लढतां, त्याच्या पुढें न वाकणें अधिक शौर्यपूर्ण आहे. जर दोन्ही अवस्थेंत मृत्यु निश्चित आहे तर शत्रूसमोर आपल्या कांहीं द्वेषभावना न ठेवतां निधड्या छातीनें मरणें अधिक श्रेष्ठ नाहीं काय ? "

—ह. से. ८–१०–३८ पृष्ठ २६८.

## अहिंसात्मक प्रतिकार.

अहिंसेचा हा हेतु नाहीं कीं, आपण दुष्टतेच्या विरुद्ध खरी लढाई देण्याचें सोडून स्वस्थ बसावें. उलट माझ्या कल्पनेप्रमाणें अहिंसेंत जितका अधिक सक्रिय आणि वास्तविक प्रतिकार आहे तितका प्रतिघातात नाहीं. कारण प्रतिघात स्वभावतःच असा आहे कीं, त्यानें दुष्टता वृद्धि पावते. माझा उद्देश दुष्टतेचा मानसिक आणि त्याकरितां नैतिक प्रतिकार

करणें होय. अत्याचारी तलवारीच्या विरुद्ध तिच्यापेक्षा अधिक तीक्ष्ण धारवाल्या तलवारीचा प्रयोग करून त्या तलवारीची धार बोथट करण्याचा माझा इरादा नाहीं. मी शारीरिक प्रतिकार करीन, या त्याच्या इच्छेला तर मी हें खोटें आहे हें सिद्ध करून त्याची तलवार बोथट करूं इच्छितो. जो मी आत्मिक प्रतिकार करीन त्याच्या तो पलीकडे जाऊं शकणार नाहीं. प्रथम तर तो दिपून जाईल आणि शेवटीं तर त्याच्या त्या प्रतिकाराला हार खावी लागेल, पण असें करताना त्याच्या मानहानीऐवजी त्याचा उद्धार होईल. कोणी म्हणतील कीं, ही तर आदर्श अवस्था आहे. हो, आहे तर खरी!

—सर्वोदय, आवरण पृष्ठ आक्टोबर ३८.

## खरें बंधुत्व.

बंधुत्वाचा हा हेतु नाहीं कीं, जो तुमचा बधु बनेल आणि तुमच्यावर प्रेम करील त्याचे तुम्ही बंधु बना आणि प्रेम करा. हा तर सौदा झाला. बंधुत्वामध्यें व्यापार होत नाही. आणि माझा धर्म तर मला हे शिकवितो कीं, बंधुत्व केवळ मनुष्यमात्राबाबत नाहीं, तर सर्व प्राणिमात्राबरोबरहि झालें पाहिजे. आपण जर आपल्या शत्रूवरहि प्रेम करावयाला तयार झालों नाहीं तर आपलें बंधुत्व म्हणजे केवळ ढोंग आहे. दुसऱ्या शब्दात सागावयाचें म्हणजे ज्यानें बंधुत्वाची भावना हृदयस्थ केली आहे, तो हें मागणार नाहीं कीं, त्याचा कोणी शत्रु आहे.

— सर्वोदय, एप्रिल ३९ पृ. ३३.

## हिंसा विरुद्ध अहिंसा.

हिंदुस्थानमध्यें आज जागोजागीं हिंसा-अहिंसेच्या पद्धतींत द्वंद्व-युद्ध चालू आहे. हिंसा तर पाण्याच्या प्रवाहाप्रमाणें आहे. पाण्याला वाहण्याचा रस्ता मिळताच, त्यातील त्याचा प्रवाह भयानक जोराने वाहूं लागतो. अहिंसा वेडेपणाचें काम करूं शकत नाहीं. ती अनुशासनाचें सारतत्त्व आहे. कारण जेव्हा ती सक्रिय बनते तेव्हा हिंसेची कोणतीहि शक्ति तिला पराजित करूं शकत नाहीं. ज्याच्या ठिकाणीं शुद्धता आणि अभंग श्रद्धा असते तेथें अहिंसा सोळाहि कलांनीं उदित होते.

## लोकशाही आणि अहिंसा.

" . ...जोंपर्यंत लोकशाहीचा आधार 'हिंसा' आहे तोंपर्यंत ती दोन-दुर्बलाचें रक्षण करूं शकत नाहीं. दुर्बलांना अशा राज्यपद्धतींत कांहींहि स्थान नसतें. मी लोकशाहीचा अर्थ हाच समजतों कीं, त्या पद्धतीत अगदीं कनिष्ठांतल्या कनिष्ठ आणि श्रेष्ठांतल्या श्रेष्ठ व्यक्तीस आपली प्रगति करण्यास सारखाच अवसर मिळणें. पण अहिंसेशिवाय असें कधींहि होऊं शकत नाहीं "

—ह. से. १८–५–४०.

## हिंसा विरुद्ध अहिंसा.

"ज्याप्रमाणें हिंसेच्या पाठांत मारावयाला शिकणें जरूर असतें त्याप्रमाणें अहिंसेच्या पाठांत मरावयाला शिकावें लागतें. हिंसेमध्यें भयानें मुक्ति मिळत नाहीं पण भयापासून वांचण्याचा उपाय शोधण्याचा प्रयत्न असतो. अहिंसेंत भयाला कांहींहि स्थान नाहीं. भयमुक्त होण्याकरितां अहिंसेच्या उपासकाला उच्च कोटीची त्यागवृत्ति विकसित करावी लागते. जमीन गेली, धन गेलें, शरीरहि गेलें तरी त्याची पर्वा करतां नये. ज्यानें सर्व प्रकारच्या भयांवर विजय मिळविला नाहीं तो पूर्ण अहिंसेचें पालन करूं शकत नाहीं. म्हणून अहिंसेच्या उपासकानें फक्त एका ईश्वरालाच भ्यावें आणि इतर सर्व भयांना जिंकावें. ईश्वराचा आश्रय शोधणाऱ्याला आत्मा शरिराहून भिन्न आहे याची जाणीव असली पाहिजे. आणि आत्मज्ञान होतांच क्षणभंगुर शरीराचा मोह उतरून जातो. अशा प्रकारें हिंसा-अहिंसेचे पाठ परस्पर विरुद्ध आहेत. बाह्य रक्षणाकरितां हिंसेची जरूर पडते. आत्म्याच्या, स्वमानाच्या रक्षणाकरितां अहिंसेची आवश्यकता आहे."

—सेवाग्राम २५–८–४०. ह. से. ३१–८–४०. (पृ. २४२)

## अहिंसेचा अभिनव प्रयोग.

"येशूख्रिस्त किंवा गौतमबुद्ध यांनीं राजकीय क्षेत्रांत अहिंसेचा उपयोग केला नाहीं किंवा त्यांच्या काळची राजकीय परिस्थिति आजच्या सारखी नव्हती असें म्हटल्यास तें अधिक रास्त होईल. या दृष्टीनें विचार

करता काँग्रेसमार्फत केला जाणारा अहिंसेचा प्रयोग हा अभिनवच म्हटला पाहिजे."

—हरिजन १-२-४२.

x x x

मला असें स्पष्ट भविष्य दिसत आहे कीं, या युद्धाचा अंत म्हणजे भांडवलशाहीचा अंत होय. गरिबांच्या राज्याचा दिवस उगवत आहे असें मला दिसत आहे. मग तें राज्य शस्त्रबलानें येईल किंवा आत्मबलानें येईल. जसें शरीर क्षणभंगुर तसें शस्त्रबलही क्षणभंगुर व जसा आत्मा अमर तसें आत्मिक बलहि अमर होय, हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

—हरिजन १-२-४२.

## अहिंसक प्रतिकार करणारांची भूमिका.

" देशांत चार पक्ष आहेत : ( १ ) ब्रिटिश लोक व त्यांनीं उभारलेलें सैन्य, ( २ ) हिंदुस्थानवर आमचा डोळा नाहीं, आमचें भांडण फक्त ब्रिटिशांशीं आहे, अशी घोषणा करणाऱ्या जपानवर विश्वास ठेवणारे जपानमधील हिंदी लोक व त्याचप्रमाणें ब्रिटिश जुलमी राजवटीस कंटाळल्यामुळें जपानच्या मध्यस्थीनें तें झुगारण्यास तयार झालेले व प्रसंगीं जपानी राजवटीचें जूंहि शिरावर घेण्यास तयार झालेले हिंदी लोक, ( ३ ) तटस्थ लोक, ( ४ ) अहिंसक प्रतिकार करणारे लोक. चौथ्या पक्षाचे लोक कोणत्याहि आक्रमणापुढें मान वाकवणार नाहींत. ते कोणच्याहि भुलथापानां फसणार नाहींत. तिसऱ्याच्या मध्यस्थीनें आपली ब्रिटिश जोखडापासून मुक्तता करून घेण्याची त्याची वृत्ति नाहीं. त्यांना ब्रिटिश लोकांबद्दल द्वेषहि नाहीं व जपान्यांबद्दल प्रेमहि नाहीं. ते त्यांचें व सर्वांचेंच स्वतःच्या मार्गानें भलें करण्याची आकांक्षा बाळगतात. "

—हरिजन १२-४-१९४२.

## अहिंसात्मक असहकार.

" सबंध हिंदुस्थाननें जर माझ्या सांगण्याप्रमाणें निर्भेळ अहिंसात्मक असहकारितेचा स्वीकार केला तर मी हें दाखवूं शकेन कीं, जपानचेंच काय, पण कोणतींहि सैन्यें हिंदुस्थानवर एकजुटीनें चाल करून आलीं

तरीहि तीं थंडगारच पडतील......लक्षावधि माणसांची मरणाची तयारी मात्र पाहिजे. एवढी किंमत देण्याची हिंदुस्थानची तयारी कदाचित् होणार नाहीं, पण स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं अशी कांहीं किंमत तर द्यावीच लागेल...रशिया व चीन यांचा त्याग प्रचंड आहे व अद्यापहि ते सर्वस्व धोक्यांत टाकण्याची तयारी करीत आहेत. तर मग अहिंसात्मक लढ्यासाठीं हिंदुस्थाननें जो धोका पत्करावा असें मी सांगत आहें व जो हिंसात्मक प्रतिकार करणें झालें तरीहि पत्करावा लागेल, तो इतर देशाच्या मानानें अधिक नाहीं. ”

—हरिजन २४-५-१९४२.

## माझी अहिंसा लेचीपेची नाहीं.

“......अशा संग्रामांत दंगेधोपे माजण्याचा धोका असतो. हाच विचार गेल्या २२ वर्षांपासून मला दाबीत आहे. परकीय सत्तेचें जूं झुगारून देण्यास आवश्यक ती अहिंसक शक्ति राष्ट्रांत निर्माण होईपर्यंत वाट पहावी म्हणून मी आजवर ती वाट पहातच राहिलों आहें. पण आतां माझ्या वृत्तींत जरा पालट झाला आहे. मला असें भासूं लागलें आहे कीं, अशीच वाट पहात राहाणें मला परवडणार नाहीं. मी अशीच वाट पहात राहिलों तर दुनियेच्या अंतापर्यंत मला वाटच पहावी लागणार. ज्या तयारीसाठीं मी खटपट करीत आहें व प्रार्थना करीत आहें, ती तयारी कदाचित् पुरी कधींच होणार नाहीं व दरम्यान आम्हा सर्वांनाच ग्रासून टाकणाऱ्या ज्वाळात मीच गुरफटून जाईन व भस्मसात् होऊन जाईन आणि म्हणूनच मीं असें ठरविलें आहे कीं, अगदीं उघड उघड दिसणारे काहीं धोके पत्करूनहि या गुलामगिरीचा प्रतिकार करण्यास मला लोकांना आवाहन केलेंच पाहिजे....लोकांच्यांत माझी अहिंसा नाहीं, पण माझ्या अहिंसेची त्यांना मदत होईल. माझ्या सभोंवार पद्धतशीर अंदाधुंदी चालूच आहे. माझी खात्री आहे कीं, ब्रिटिश सत्ता येथून निघून गेल्यामुळें किंवा आमचें सांगणें नाकारल्यास त्यांची सत्ता आम्हीं धुडकावून लावण्याचा निर्णय केल्यामुळें जी अंदाधुंदी माजेल ती सध्यांच्या अंदाधुंदीपेक्षां खास अधिक वाईट असणार नाहीं. उघडच आहे कीं, ज्यांच्या हातांत शस्त्रें नाहींत ते भीषण स्वरूपाचे अत्याचार

किंवा अंदाधुंदी करूं शकणार नाहींत. आणि मला असा विश्वास आहे कीं, ह्या अंदाधुंदींतूनच निर्मळ अहिंसा उदयास येईल. पण सध्या जे भीषण अत्याचार चालले आहेत, व संभाव्य परचक्राच्या आक्रमणाच्या नांवाखालीं जी भयंकर अंदाधुंदी चालली आहे, तिचे निष्क्रिय प्रेक्षक होऊन राहणें, ही गोष्ट मला सहन होणें शक्य नाहीं. माझ्या अहिंसेची मला लाज वाटेल अशी ती गोष्ट आहे. माझी अहिंसा अशी लेचीपेची नाहीं."

—हरिजन ७-६-१९४२.

## युद्धांत यश मिळण्याची लायकी.

"जिवात जीव असेपर्यंत मी ती आशा बाळगणार (कारण, 'अहिंसेच्या शक्तीवर माझा जो विश्वास आहे, त्यामुळें मानवी स्वभावांत कधींच लवचिकपणा येणार नाहीं.' हा सिद्धांत मला अमान्य आहे. ता. ७-६-१९४२) आणि मला जर दीर्घायुष्य लाभलें तर ती आशा सफल झालेली मी पाहीनहि. माझ्या सूचनेंत अव्यवहार्य असेंहि कांहींच नाहीं, किंवा त्या सूचनेची अम्मलबजावणी करण्याच्या मार्गांत उल्लंघन करतां येणार नाहीं, अशा कांहीं अडचणीही नाहींत. मला हें सांगितलें पाहिजे कीं, जर ब्रिटन ही गोष्ट खुषीनें व अंत:करणपूर्वक करणार नाहीं तर या युद्धात जय मिळविण्याची त्यांची लायकी नाहीं."

—हरिजन १४-६-१९४२.

## अहिंसेचें ब्रीद संहार नव्हे, शुद्धीकरण.

"लोकसेवेच्या बळावर जे विशिष्ट हक्क लाभतील ते नेहमींच टिकतील, परंतु बडेजाव, थाटमाट व अवडंबर हें सर्व बरेंचसें जाणार हें निश्चित होय. स्वतंत्र हिंदुस्थानांत संस्थानिकांना स्थान राहाणार नाहीं, अशी घोषणा करणें अहिंसेच्या तत्त्वाविरुद्ध आहे. कारण नाश करणें हें अहिंसेचें ध्येय नसून शुद्धि करणें हें ध्येय आहे. जसें संपूर्णपणें रोगग्रस्त शरीर मृत होतें, तसेंच जी गोष्ट शुद्ध होणें अशक्य असेल ती बाह्य प्रयत्नांशिवायही नष्ट होऊन जाईल...... ......(ब्रिटिशांची सत्ता येथून जाण्याच्या सुमारास) मी जी अपेक्षा करीत आहें व ज्यासाठीं खटपट

करीत आहें तें हें कीं, बहुजनसमाजांत प्रतिकाराची जबरदस्त लाट उसळेल व लोकांच्या मागणीला सर्व विशिष्ट हक्कदार लोकांकडून बुद्धिपूर्वक दुजोरा मिळेल."

—हरिजन १४-६-१९४२.

## अहिंसक प्रतिकार.

[ ' जपानी लोक येथें आलेच तर अहिंसक रीतीनें त्यांचा प्रतिकार कसा करावयाचा ? ' या प्रश्नास उत्तर देतांना गांधीजी म्हणाले : ]

" त्यांना अन्नपाणी किंवा आश्रयहि द्यावयाचा नाहीं, त्यांच्याशीं कोणत्याही प्रकारचा संबंध ठेवायचा नाहीं. ते आम्हांस नको आहेत असें त्यांना जाणवलें पाहिजे......जर त्यांनीं कांहीं लोकांना पकडलेंच व त्याच्याकडून जबरदस्तीनें सांगण्यांत आलेलें काम करण्याचें लोकांनीं नाकारलेंच तर लोकांना ठारहि मारण्यांत येईल असा संभव आहे. पकडले गेलेले लोक जर आनंदानें मृत्यु पत्करतील तर त्यांचें कर्तव्य संपलेंच. त्यांनीं आपला व देशाचा मान राखला असेंच म्हणावें लागेल.......पण ठार न मारतां जर जपान्यांनीं त्यांचा अनन्वित छळच आरंभिला तर मला वाटतें त्यांना छळ सोसण्यापेक्षां मरणच बरें वाटेल व मरणाच्या एखाद्या सन्माननीय मार्गाचें ते अवलंबन करतील. "

—हरिजन १४-६-१९४२.

## अहिंसा व राष्ट्रीय सरकार.

[ " स्वातंत्र्यप्राप्तीनंतर तुमच्या अहिंसेचें काय होणार ? " अशा प्रश्नाला उत्तर देतांना गांधीजी म्हणाले :- ]

" अहिंसेबाबत बोलतांना त्रोटकपणासाठीं मी जरी मजसंबंधीं प्रथमपुरुषवाचक सर्वनामाचा उपयोग करीत असलों, तरी माझ्या समजुतीप्रमाणें हिंदुस्थानचा जो आत्मा आहे त्याचा प्रतिनिधि म्हणून बोलण्याचा माझा प्रयत्न असतो. हिंदुस्थानचा आत्मा संमिश्र आहे. राष्ट्रीय सरकार कोणतें धोरण स्वीकारील तें मला सांगतां येत नाहीं. माझी खूप इच्छा असली तरीहि तें पाहाण्यास मी कदाचित् जगणारहि नाहीं. मी जगलोंच तर शक्य तों अहिंसेचा स्वीकार करण्याचा मी सल्ला देईन, कारण जागतिक

शांतता व नवीन समाजव्यवस्था प्रस्थापित करण्याच्या बाबतींत हिंदुस्थानची ती जगाला मोठ्यांतली मोठी देणगी आहे. हिंदुस्थानांतल्या सर्व लढाऊ जमातींना राष्ट्रीय सरकारांत स्थान असल्यामुळे माझी अशी अटकळ आहे कीं, राष्ट्रीय धोरणाचा कल मर्यादित लष्करी वृत्तीकडे राहील. तथापि मी अशी अवश्य आशा बाळगीन कीं, राजकारणातील एक शक्ति या नात्यानें अहिंसेनें जो प्रभाव गेलीं २२ वर्षें दाखविला तो सर्वच वायां जाणार नाहीं व खऱ्या अहिंसेचा प्रतिनिधि म्हणून एक जोरदार पक्ष देशात राहील. "

—हरिजन २१-६-१९४२.

## हिंसेचें दिवाळें.

" अहिंसेचा स्वीकार केल्याशिवाय मानवजातीला तरणोपाय नाहीं असें मला वाटतें. जिवांत जीव असेपर्यंत मी त्याच ध्येयासाठी खटपट करीत राहिलेला दिसेन अशी मी आशा बाळगतों. दिवसानुदिवस हिंसेचें दिवाळें निघालेलें आपण पाहात आहों. सांप्रतचा परस्परांतील भीषण संहार असाच चालू राहिला तर मानवजातीची धडगत नाहीं. "

—हरिजन २१-६-१९४२.

## २२ वर्षांचा अहिंसेचा प्रयत्न.

" ' बावीस वर्षें हिंदुस्थानांत खटपट करूनहि बाह्य व अंतस्थ बंडाळीला तोंड देण्याइतके सत्याग्रही तुम्ही कसे निर्माण करूं शकलां नाहीं ?' असा प्रश्न जर मला कोणीं विचारला तर त्याला माझें उत्तर असें आहे कीं, अहिंसक शक्तीचा विकास करण्याचें शिक्षण राष्ट्रास देण्याच्या कामीं २२ वर्षें म्हणजे कांहींच नव्हत. योग्य प्रसंग येईल तेव्हां अशी शक्ति दाखवणारे पुष्कळ लोक मिळणार नाहींत असा याचा अर्थ नव्हे, ( अर्थात् मिळतीलहि ) असा प्रसंग आतां येत असलेला दिसत आहे."

—हरिजन २८-६-१९४२.

## हिंसा अहिंसा.

" ......आधींच सरकारी यंत्र मंद गतीनें चालतें आणि त्यांतून आतां तर लष्करी कामांतच सर्व यंत्र गुंतलेलें आहे. गैर वर्तन करणाऱ्या

कोणत्याहि माणसापासून प्रत्येक ठिकाणीं आत्मरक्षण करण्यास लोकांनीं शिकलेंच पाहिजे. हिंसे-अहिंसेचा प्रश्न येथें उद्भवतच नाहीं. अहिंसेचा मार्ग उत्कृष्ट तर खराच, पण जेथें तो स्वाभाविकपणें आचरिला जात नाहीं, तेथें हिंसाच आवश्यक व सन्मान्य मार्ग होय. या बाबत निष्क्रियता म्हणजे निंद्य भेकडपणा व क्लैब्य होय. काय वाटेल तें झालें तरी तें टाकलें पाहिजे......शक्य तेथें मीठ तयार करण्याची परवानगी सरकार लोकाना देईल अशी मी आशा बाळगतो आणि अटक होण्याचा धोका पत्करूनहि लोकानीं मीठ तयार करावें असेंहि मी लोकाना सांगूं इच्छितों. गरज कायदा जाणत नाहीं. उपाशी मनुष्य मिळेल तेथलें अन्न खाईल... ......पण व्यापाऱ्यांनीं एकजूट केली पाहिजे व गरिबांनां ठराविक किंमतीत धान्याचा पुरवठा करण्याच्या बाबतींत योग्य ते नियम सरकारला सुचवून ते अंमलांत आणण्यास सरकारला भाग पाडलें पाहिजे. हें जर केलें गेलें नाहीं तर दुकानें लुटलीं जाणें हा एक नित्याचाच प्रकार होईल. चौथ्या बाबीबद्दल असें सांगावयाचें कीं, जेथें सरकार दुसऱ्या जागा व इमारती देऊं शकणार नाहीं व जेथें वाहनें व चरितार्थाचीं साधनें पुरवूं शकणार नाहीं, तेथें लोकांना जागा सोडण्यास सरकारनें सांगूं नये असें माझें निश्चित मत आहे. दुसरीकडे हलविण्याची जर लोकाना कांहीं सोयच नसेल तर लोकांनीं हलण्याचें साफ नाकारावें व होतील ते परिणाम सहन करावे. ”

—हरिजन २८–६–१९४२.

## शीखधर्मीय व अहिंसा.

“या विषयावर लिहावें लागावें याबद्दल मला दुःख होत आहे. ...पण जेव्हां बुद्धीच्या ठिकाणीं संशयाचेंच राज्य सुरू होतें तेव्हां त्याचा निरास करणें अत्यंत कठीण होऊन बसतें......मला असें म्हणावें लागतें कीं, कृपाण किंवा तशीच एखादी वस्तु धर्माचें चिन्ह म्हणून वापरणें मला पसंत नाहीं. पण माझ्या आवडीनावडीचा शीखांच्या रूढीवर कांहींच परिणाम होणार नाहीं. मात्र कृपाण धारण करणें कायद्यानें बंद करावें असा मुद्दा जर कोणी उपस्थित करील तर तसें करण्यास माझा स्पष्ट नकार आहे. कारण कायद्यानें लोकाना अहिंसात्मक

करतां येईल असें मला वाटत नाहीं.........मीं कधींहि स्वतःला धर्मगुरु मानलेलें नाहीं. माझ्या अहिंसेचा किंवा शिकवणीचा स्वीकार करण्यासाठीं कोणीं आपला धर्म सोडावा असें मीं कधींच कोणाला सांगितलेलें नाहीं. हिंसा करण्याचें बंधन घालणारा एकहि धर्म आहे असें मला वाटत नाहीं. जेथें अहिंसा अशक्यच असेल तेथें हिंसेला अनुमति पुष्कळ धर्मांनीं दिलेली आहे इतकेंच. पण इतर धर्मांवर अभिप्राय प्रकट करण्याचा मला हक्क नाहीं. सर्व धर्मांबद्दल माझ्या हृदयांत समान आदर आहे. माझ्या धर्माबाबत लोकांनीं आदर बाळगावा अशी जर माझी अपेक्षा असेल तर मीं असेंच वागलें पाहिजे."

हरिजन ५-७-१९४२.

x x x

## अहिंसेमुळें युद्धाचें स्वरूप पालटेल.

(१) "ब्रिटनच्या सर्व आर्थिक बोजांतून हिंदुस्थान मुक्त होईल."

(२) ब्रिटनला दरसाल जाणारा द्रव्याचा लोंढा आपोआप थांबेल.

(३) नवें स्वतंत्र सरकार मंजूर करील किंवा राहूं देईल त्याखेरीज बाकी सर्व कर नष्ट होतील.

(४) मोठ्यांतल्या मोठ्या माणसांलाहि खालीं पाहावयास लावणारी जबरदस्त दडपशाही एकदम नष्ट होईल, व अहिंसेच्या या प्रभावामुळें युद्धाचें सध्याचें स्वरूप एकदम पालटून जाईल.........जगांत कोठेंही पाहावयास मिळाला नसेल अशा हिंदुस्थानांतील सुव्यवस्थित व यशस्वी अत्याचारामुळें ब्रिटनला जो लाभ होत आहे तो गमावण्यास ब्रिटन जेव्हां तयार होईल तेव्हांच हें सर्व घडून येईल. कदाचित् हें घडून येणार नाहीं. मला त्याची पर्वा नाहीं. परंतु राष्ट्रानें लढण्याला व सर्वस्व अर्पण करण्याला योग्य अशी ही गोष्ट आहे."

—हरिजन १५-७-१९४२.

x x x

## अहिंसक किंवा हिंसक शक्ति आमच्या अंगीं असली पाहिजे.

"आम्ही ब्रिटिशांचा प्रामाणिकपणा गृहीत धरूनच त्यांना राहण्यास परवानगी देणार. त्यांना पुढें येऊन हुसकावून लावण्याचा प्रश्न

नाहीं. ते शब्द पाळतात कीं नाहीं एवढाच प्रश्न राहील. ते जर शब्दाला जागले नाहींत तर तसें त्यांना भाग पाडण्यास पुरेशी अशी अहिंसक किंवा हिंसक शक्ति आमच्या अंगीं असली पाहिजे."

—हरिजन १५-७-१९४२.

× × ×

## संपूर्ण अहिंसेचा लढा.

[ ब्रिटिश लोकाना वळणावर येण्याची अक्कल सुचेल असें त्यांच्या आजवरच्या इतिहासावरून वाटतें काय? अशा प्रश्नास उत्तर देतांना गांधीजी म्हणाले, ]

"कां नाहीं सुचणार? तीं माणसेंच आहेत व मनुष्यप्राणी उत्क्रांत होण्याची शक्यता मीं कधींच नाकारली नाहीं; शिवाय प्रामुख्यानेंच केवळ नव्हे तर संपूर्णपणें अहिंसेच्या मार्गानें चाललेल्या स्वातंत्र्याच्या लढ्याला तोंड देण्याचा प्रसंग दुसऱ्या कोणत्याहि राष्ट्राला कधींच आलेला नाहीं."

—हरिजन १९-७-१९४२.

× × ×

## उपवास : अहिंसात्मक शस्त्र.

"जो लढा टळावा म्हणून आम्ही शिकस्तीचे प्रयत्न करीत आहोंत, तो जर व्हावयाचाच असेल व यश मिळविण्यासाठीं त्याचें अवश्य तें अहिंसात्मक स्वरूप जर टिकवावयाचें असेल, तर त्याबाबत उपवासाला फार महत्त्वाचा कार्यभाग राहील.......राजकीय लढ्याचें एक अंग या नात्यानें उपवास पुष्कळांना नापसंत आहे.........पण त्याचें कारण हें एक नवीन शस्त्र आहे हेंच होय. मरणांतिक उपवास हें सत्याग्रहाच्या कार्यक्रमाचें एक अविभाज्य अंग होय, अशा निश्चित निर्णयावर मी आलों आहें. विशिष्ट परिस्थितीमध्यें सत्याग्रहाच्या शस्त्रागारांतील तें अत्यंत प्रबळ व परिणामकारक शस्त्र होय. पण कोणालाहि योग्य शिक्षणाखेरीज तें शस्त्र वापरण्याची पात्रता येईल, असें मात्र नव्हे."

—हरिजन २६-७ १९४२.

× × ×

## अहिंसा आणि उपवास.

" अहिंसा व उपवास हीं साधनें संसारी माणसासाठीं नसून गिरिकंदरांत राहाणारांसाठीं किंवा स्वर्गांत एखादें उच्च स्थान मिळवूं इच्छिणारांसाठींच आहेत असें मानणें चुकीचें आहे. दैनंदिन जीवनांत ज्या सद्‌गुणानें कांहीं कार्यभाग होत नसेल तो सद्‌गुण निरुपयोगीच मानला पाहिजे. म्हणूनच सर्व निव्वळ राजकारणी लोकांना माझी अशी आग्रहाची शिफारस आहे कीं, त्यांनीं अहिंसा व त्याचाच एक आत्यंतिक पर्याय या दृष्टीनें उपवास या विषयांचा सहानुभूतिपूर्वक व सद्‌बुद्धिपूर्वक अभ्यास करावा. "

—हरिजन २६–७–१९४२.

x x x

## अहिंसेचें बंड.

" मीं असा निश्चित विचार केला आहे कीं, ब्रिटिश राज्याच्या विरुद्ध शौर्यपूर्वक अहिंसेच्या बंडांत जर येथील दहा लाख लोक गोळया लागून ठार झाले तर ती फार चागली गोष्ट होईल.........आम्ही लाजिरवाण्या भेंकडपणाचें प्रदर्शन करीत आहोंत. युरोपला जें रक्तस्नान घडत आहे त्याची मला कांहीच पर्वा वाटत नाहीं. तें वाईट तर खरेंच, पण त्यांत भरपूर शौर्य आहे. माता आपल्या एकुलत्या एक पुत्रांनां गमावीत आहेत, बायका आपल्या नवऱ्यांना मुकत आहेत."

—हरिजन २–८–१९४२.

x x x

## सत्य अहिंसा अणुगोलापेक्षां प्रभावी आहे.

बऱ्याचशा इंग्लिश व अमेरिकन वाचकांनीं विशेषतः फॅसिस्ट राष्ट्रांच्या पराभवानंतर हरिजन बाबत विशेष आग्रह धरला तेव्हां मलाहि त्या बाबत उत्सुकता निर्माण झाली. त्यांना आतां माझीं मतें सत्य अहिंसेबाबत काय आहेत व सध्यांच्या हिंदुस्थानांतील व इतरत्र जगांतील परिस्थितीला कितपत व कशीं लागू पडतील हें जाणण्याची त्यांची इच्छा उघड दिसत होती. या जगांतील घटनांत अद्‌भुत फेरबदल होत असतांना अद्यापिही माझा

सत्य व अहिंसेवर विश्वास आहे काय ?—ॲटम बॉम्बनें या माझ्या श्रद्धेचा स्फोट झाला कीं नाहीं ? परंतु माझी सत्य-अहिंसेवरील श्रद्धा उडून गेली नाहीं इतकेंच नव्हे तर या दोहोंच्या ठायीं जगांतील सर्वांत बलिष्ठ अशी शक्ति सामावलेली आहे अशी माझी पुरेपूर खात्री पटलेली आहे. ॲटम बॉम्बचा तिच्यापुढें कांहींच पाड लागणें शक्य नाहीं. ॲटम बॉम्ब व सत्य अहिंसा या दोन्हीही पूर्णतया भिन्न शक्ति आहेत. एकीचें स्वरूप नैतिक व आध्यात्मिक असून दुसरीचें भौतिक व पार्थिव आहे. दुसरीला निसर्गतःच शेवट आहे व पहिली तिच्यापेक्षां असंख्य पटीनें श्रेष्ठ आहे. त्याची प्रेरक शक्ति सदैव अखंड व प्रगतिमान् आहे व तिच्या संपूर्ण आविष्कारानंतर ती सर्व जगांतील एक अजिंक्य शक्ति ठरेल. यांत नवीन असें कांहींच नाहीं. प्रत्येक लहान थोर स्त्रीपुरुषाचें अंगीं काळा गोरा असा कोणताहि भेद न दर्शवितां प्रतिकारशक्ति वसत असते हेंच मी निदर्शनास आणूं इच्छितों.

× × ×

" ......बेजबाबदार भाकितांनीं कांहीं व्हावयाचें नाहीं. हिंसेच्या बाबतींत आपण कोठें आहोंत, आपली भूमिका काय रहाणार आहे हा खरा प्रश्न आहे."

× × ×

" ......मोडतोड हें हिंसेचेंच स्वरूप आहे. शारीरिक हिंसेचा फोलपणा पटला आहे पण मोडतोडीच्या सौम्य स्वरूपांत ती यशस्वीपणें आचरणांत येईल असें काहींना वाटतें."

× × ×

" ......हिंसक पद्धतीचें शिक्षण मिळालेला मनुष्य अहिंसक आदर्शाच्या जास्त जवळ येऊं शकतो. हें पुनः पुनः हिंसक पद्धतीची व्यर्थता पटल्यामुळें घडतें याच अर्थानेंही खरें असेल. पण दुर्गुणाची चव घेतलेला मनुष्य चव न घेतलेल्यापेक्षां सद्गुणांच्या अधिक जवळ असतो असें म्हणतां येईल काय ?"

× × ×

## गुप्त संघटना आणि अहिंसा.

"......गुप्त संघटना कितीहि मोठी असली तरी लाभदायक होऊं शकत नाहीं. तुमच्या भोंवतीं संरक्षक भिंत उभारणें हा तिचा हेतु असतो. अहिंसेला असलें संरक्षण नको असतें."

—हरिजन १०-२-४६.

---

# ३ ईश्वर आणि त्याची साधना

## ईश्वर.

"ईश्वर खात्रीनें एकच आहे. तो अगम्य आहे. अगोचर आहे. आणि मानवजातींतल्या बहु-जन-समाजाच्या दृष्टीनें अज्ञात आहे. तो सर्वव्यापी आहे. तो डोळ्याशिवाय पहातो, कानाशिवाय ऐकतो. तो निराकार आणि अभेद्य आहे. तो अजन्म आहे. त्याला माता नाहीं, पिता नाहीं, संतान नाहीं. तरीहि तो पिता, माता, पत्नी, किंवा संतान या रूपानें पूजा ग्रहण करतो. इतकेंच काय, जरी तो काष्ठ नाहीं, पाषाण नाहीं तरी तो काष्ठ आणि पाषाणाच्या स्वरूपांतसुद्धां पूजा-अर्चेचा अंगिकार करतो. तो हातीं येत नाहीं-हूल देऊन निघून जातो. आणि जर आपण त्याला ओळखलें तर तो आपल्या अगदीं जवळ आहे. पण जर आपण त्याची सर्वव्यापकता जाणली नाहीं तर तो आपल्यापासून अगदीं दूर आहे."

—१९-९-२४ यं. इं. हिं. न. जी. २८-९-'२४. पृष्ठ ५३.

## ईश्वरीय प्रकाशाची सार्वदेशिकता.

"ईश्वरीय प्रकाश ही कोणत्याहि एकाच राष्ट्राची किंवा जातीची संपत्ति नाहीं."

—१९-९-२४ यं. इं., हिं. न. जी. २८-९-२४.

## ईश्वर.

"ईश्वर "काबां" त नाहीं, काशीमध्यें नाहीं. तो तर घराघरामध्यें भरलेला आहे-प्रत्येक हृदयांत त्याचें वास्तव्य आहे.

—यं. इं., हिं. न. जी. १-१-२५. पृ. १६७

x x x

"......माझा ईश्वर तर माझें सत्य आणि प्रेम आहे. नीति आणि सदाचार ईश्वर होय. निर्भयता ईश्वर होय. ईश्वर जीवन आणि प्रकाशाचें मूळ आहे. आणि परत पुन्हां तो या सर्वांच्या पलीकडे आहे. ईश्वर अंतरात्माहि आहे. तो तर नास्तिकाची नास्तिकताही आहे. कारण कीं, तो आपल्या अमर्यादित प्रेमानें त्यांनाहि जिवंत राहूं देतो. तो हृदय पाहणारा आहे. तो बुद्धि आणि वाणी यांच्या पलीकडे आहे. आपण स्वतः आपल्याला जितकें ओळखतों त्याच्याहिपेक्षां अधिक तो आम्हांला आणि आमच्या हृदयाला ओळखतो. आम्ही म्हणतों तसाच तो आम्हांला समजत नाहीं. कारण तो जाणतो कीं, वाणी यथार्थ भाव व्यक्त करूं शकत नाहीं. ...जे त्याला व्यक्तिरूपांत पाहूं इच्छितात अशा लोकांनां ईश्वर एक व्यक्ति आहे. जे त्याला स्पर्श करूं इच्छितात त्याच्या करितां तो शरीर धारण करतो. तो पवित्रातलें पवित्र तत्त्व आहे. ज्यांची त्याच्यावर श्रद्धा आहे त्याच्याकरितां त्याचें अस्तित्व आहे......तो आपल्याला व्यापून राहिला आहे आणि तरीहि आपल्या पलीकडे आहे. त्याचें व्यक्तित्व म्हणजे ह्या भावी जगांतही सर्वांत अधिक काम करणारी शक्ति आहे. तो फारच सहनशील आहे, व फार धैर्यवान् आहे. पण फार भयंकरहि आहे. जसें आपण आपल्या शेजाऱ्यांशीं–मनुष्य आणि पशु या दोहोंशीं–जसें वर्तन करतों तसेंच वर्तन तो आपल्या बरोबर करतो. त्याच्या समोर अज्ञानांचा युक्तिवाद चालूं शकत नाहीं. पण हें सर्व होऊनहि तो मोठा दयाळू आहे. कारण तो आपल्याला पश्चात्ताप करावयाला संधि देतो. तो जगात सर्वांत मोठा लोकसत्तावादी आहे, कारण चांगल्या-वाईटाची निवड करावयास आपल्याला तो स्वतंत्र सोडतो. तो सर्वांत मोठा कठोर आहे. कारण अचानक आपल्या तोंडाजवळ आलेला घांस काढून घेतो, आणि इच्छा-स्वातंत्र्याच्या नांवाखालीं इतकी कमी सवलत देतो कीं, आमच्या विवशतेनें त्याला आनंद मिळतो. ती सर्व हिंदुधर्माप्रमाणें, त्याची लीला आहे, त्याची माया आहे. आपण असें कोणीच नाहीं, फक्त तोच आहे."

—यं. इं. हिं. न. जी. ५–३–२५ पृष्ठ २३८–२३९.

× × ×

" ......जर तो नाहीं, तर आपल्यालाही अस्तित्व नाही. एवढ्याच-करितां आपण सर्व त्याला एकमुखानें......अनेक आणि अनंत नावांनीं हांक मारतों. तो एक आहे, नि अनेकही आहे. अणूपेक्षांहि लहान आणि हिमालयापेक्षांहि मोठा आहे. समुद्राच्या एका बिंदूमध्येंहि समावून जाऊं शकतो आणि इतका भारी आहे कीं, सातसमुद्र मिळून सुद्धा त्याला सहन करूं शकणार नाहींत, त्याला ओळखण्याकरितां बुद्धिवादाचा उपयोग काय होणार? कारण तो तर बुद्धीला अतीत आहे. ईश्वराचें अस्तित्व मानण्यासाठीं श्रद्धेची आवश्यकता आहे........माझी श्रद्धा बुद्धीच्याही पुढें इतकी धांवत आहे कीं, मला सर्व जगाचा विरोध झाला तरींहि मी असेंच सांगेन कीं, ईश्वर आहे, तो आहेच आहे. "

—नवजीवन. हिं. न. जी. २१-१-२६. पृ. १८१.

x x x

" ईश्वर प्रकाश आहे, अंधकार नाहीं. तो प्रेम आहे, तिरस्कार नाहीं. तो सत्य आहे, असत्य नाहीं. एक ईश्वरच महान् आहे. आपण त्याचे दास, त्याच्या पायाची धूळ आहोंत. "

ह. से. २६-३-३३.

## ईश्वराच्या ठायीं खरी श्रद्धा.

" ......जर आपल्या हृदयांत खरी श्रद्धा असेल, जर आपलें हृदय खरोखरच प्रार्थनाशील असेल तर आपण ईश्वराला प्रलोभन लावणार नाहीं, त्याच्याशीं करार करणार नाहीं. त्याच्यापुढें आपल्याला शून्य-नगण्य-केलें पाहिजे......जोंपर्यंत आपण आपल्याला शून्यावस्थेपर्यंत नेलें नाहीं तोंपर्यंत आपण आपल्यांतील दोष दूर करूं शकत नाहीं. ईश्वर पूर्ण आत्मसमर्पणाशिवाय संतुष्ट होत नाहीं. खऱ्या स्वतंत्रतेसाठीं तो इतक्या मूल्याची इच्छा करतोच करतो आणि ज्या क्षणीं मनुष्य अशा प्रकारें आपल्याला विसरतो त्याच क्षणीं तो स्वतःला प्राणिमात्रांच्या सेवेंत लीन झाल्याचें पाहतो. तो त्याच्या दृष्टीनें आनंद आणि श्रम-परिहाराचा विषय होतो तेव्हां तो एक अगदीं नवीन मनुष्य होतो आणि ईश्वराच्या या सृष्टींत सेवेमध्यें आपल्याला झिजवून घेतांना कधींहि थकत नाहीं."

—यं. इं. हिं. न. जी. २९-१२-२८. पृ. १४०.

## ईश्वराच्या अस्तित्वाचा अनुभव.

" मी अंधुक रीतीनें अवश्य हा अनुभव घेतों. जेव्हां माझ्या चारी बाजू बदलत आहेत, नष्ट होत आहेत तरी देखील या सर्व परिवर्तनाच्या मुळाशीं एक चैतन्यशक्ति आहे. जी कधीं बदलत नाहीं ( नष्ट होत नाहीं ), जी सर्वांना एक सूत्रांत गोवून ठेवते, नवीन सृष्टि निर्माण करीत आहे, त्याचा संहार करीत आहे आणि परत नव्यानें आरंभ करीत आहे, ती शक्ति ईश्वर आहे. परमात्मा आहे. मी इंद्रियानीं ज्याचा अनुभव घेतों, त्यांपैकीं दुसरी कोणतीहि वस्तु टिकूं शकत नाहीं, नि शकणार नाहीं, म्हणूनच 'तत्सत्' एक तोच आहे. आणि ही शक्ति शिव आहे कीं अशिव आहे ? मी तर तिला शिवरूपांत पहातों, कारण मी पहात आहें कीं, मृत्यूमध्येंच जीवन कायम असतें, असत्यांत सत्य विकसित होत असतें, अंधकारात प्रकाश कायम असतो. याकरितांच मी मानतों कीं, ईश्वर जीवन आहे, सत्य आहे, प्रकाश आहे, तो प्रेम आहे. तो परम मंगल आहे. "

—कोलंबिया ग्रामोफोन कंपनीच्या रेकॉर्ड वरून.

## जीवनांत ईश्वराचें स्थान.

जीवनात ईश्वराचें कांहीं स्थान नाहीं असें समजणं आणि खऱ्या ईश्वरावर अढळ आस्था ठेवण्याच्या आवश्यकतेशिवायहि सर्वोच्च जीवनापर्यंत पोहोंचण्यावर जोर दिला जाणें ही आजकाल एक फॅशन बनली आहे. पण माझा स्वतःचा अनुभव मला हेंच शिकवतो कीं, ज्याच्या नियमानुसार साऱ्या विश्वाचें संचालन होत आहे त्या शाश्वत नियमावर अचल विश्वास ठेवल्याशिवाय पूर्णतम जीवन संभवनीय नाहीं. अशी विश्वासहीन व्यक्ति समुद्रापासून दूर जाऊन पडणाऱ्या समुद्रबिंदूप्रमाणें नष्टच होते.

—ह. से २५-४-३६. पृ. ७६

## ईश्वरावर विश्वास.

" जे लोक ईश्वराच्या अस्तित्वावर विश्वास ठेऊं इच्छित नाहींत, ते आपल्या शरिराशिवाय दुसऱ्या कोणत्याही वस्तूच्या अस्तित्वावर विश्वास ठेवीत नाहींत. मानवतेच्या प्रगतीकरितां असा विश्वास आवश्यक आहे.

आत्मा वा परमात्म्याच्या अस्तित्वाबद्दल कितीहि खंबीर प्रमाण युक्तिवाद मांडण्यांत आले, तरी अशा माणसांना ते व्यर्थच आहेत. ज्या मनुष्यानें आपल्या कानांत बोळे घालून ठेवले आहेत, त्याला आपण कितीहि उत्तम संगीत ऐकवलं तरी तो त्याची प्रशंसा काय करणार ? तो ऐकूंही शकणार नाहीं. अशा तऱ्हेचे जे लोक विश्वासहि ठेवूं इच्छित नाहींत, त्यांना तुम्ही प्रत्यक्ष ईश्वराच्या अस्तित्वावर विश्वास ठेवायलाच लावूं शकत नाहीं. "

ह. से १३-६-३६. पृ. १३२.

## रामनामाचा महिमा.

"......रामनामाच्या प्रतापानें पत्थर तरंगूं लागले, रामनामाच्या जोरावर वानरसेनेनें रावणाचा नक्षा उतरविला, रामनामाच्या आधारानें हनुमानानें पर्वत उचलला आणि राक्षसांच्या घरीं अनेक वर्षें राहूनहि सीता आपलें सतीत्व बचावूं शकली. भरतानें चौदा वर्षें प्राण ठेवला, कारण कीं त्याच्या कंठांतून रामनामाशिवाय दुसरा कोणताही शब्दच निघत नव्हता. यामुळेंच तुळशीदासानें सांगितलें आहे कीं, 'कलिकाळाचा मळ धुवून टाकण्याकरितां रामनाम जपा.' "

"अशा तऱ्हेनें सामान्य आणि सुधारलेलीं अशीं दोन्ही प्रकारचीं मनुष्यें रामनाम घेऊन पवित्र होतात. परंतु पावन होण्याकरितां रामनाम अगदीं अंतःकरणापासून घेतलें पाहिजे. जीभ आणि हृदय अगदीं एक करून रामनाम घेतलें पाहिजे. मी माझा अनुभव सांगतों. मीं जगामध्यें व्यभिचारी होण्यापासून वाचलों केवळ रामनामामुळेंच. मीं प्रतिज्ञा ( निश्चित ) तर मोठमोठ्या केल्या, परंतु जर माझ्याजवळ रामनाम नसतें, तर तीन स्त्रियांना मी बहीण म्हणावयालाही पात्र झालों नसतों. जेव्हां जेव्हां माझ्यावर बिकट प्रसंग आले तेव्हां तेव्हां मीं रामनाम घेतलें आणि वांचलों. अनेक संकटांतून रामनामानें माझा बचाव केला आहे."

—नवजीवन, हिं. न. जी. ३०-४-२५. पृ. ३००-३०१.

x x x

[ 'संभाषणांत, बुद्धीच्या कामांत, किंवा ज्या वेळीं एखादी व्यक्ति दुःखी होते, तेव्हां ती रामनामाचा जप हृदयांत करूं शकते का ? लोक असें करतात का ? आणि जर करीत असतील तर कसें ?' या प्रश्नाला म. गांधींनीं खालील उत्तर दिलें. ]

अनुभव असे दाखवितो कीं, मनुष्य तसें केव्हांही करूं शकतो, अगदीं झोपेंत सुद्धा पण 'रामनाम' त्याच्या हृदयांत-देव्हाऱ्यात अधिष्ठित झालें असलें पाहिजे. जर 'नाम' घेणें संवयच झाली असेल तर हृदयातून जप करणे, हृदय-स्पंदनाइतकें सहज बनतें. नाहींतर रामनाम निवळ यांत्रिक बनतें. किंवा फार तर हृदयाला थोडासा स्पर्श करतें. जेव्हा रामनाम आपलें वर्चस्व हृदयावर बसवितें तेव्हां तोंडच्या जपाचा प्रश्नच येत नाहीं.

—हरिजन १७-२-१९४६.

x x x

"......कोस्यवधि हृदयाचे अनुसंधान करण्याकरितां आणि त्याच्यात ऐक्यभाव निर्माण करण्याकरितां एकोप्यानें रामनामाच्या छंदाशिवाय दुसरें कोणतेंहि सुंदर आणि समर्थ साधन नाहीं. कांहीं तरुण यावर असा आक्षेप घेतात कीं, हृदयामध्यें रामनामाची आवड जबरदस्तीनें जागृत करणें शक्य होत नाही. तेव्हां तोंडानें रामनाम बोलण्याचा काय फायदा ? पण ज्याप्रमाणें गायनविद्याविशारद जोंपर्यंत सूर मिळत नाहीं तोपर्यंत तार लावीत बसतात आणि असें करीत असतांना जसा त्यांना अकस्मात् योग्य स्वर मिळतो, त्याचप्रमाणें आपणहि भावपूर्णतेनें हृदयातून रामनामाचा उच्चार करीत राहिल्याने कोणत्या ना कोणत्या वेळीं अकस्मात् हृदयांत लपलेली तार एकतान पावेल. हा अनुभव माझा एकट्याचा नाहीं, दुसऱ्याहि कित्येकांचा आहे. कित्येक खोडकर मुलांचा तुफानी स्वभाव निरंतर रामनामोच्चारानें नाहीसा झाला आणि ते रामभक्त बनले ह्या गोष्टी मीं स्वतः डोळयानीं पाहिल्या आहेत. पण त्यामध्यें एक अट आहे. तोंडानें रामनाम घेताना वाणी आणि हृदय ही तद्रूप झालीं पाहिजेत. कारण भावनाशून्य शब्द ईश्वराच्या दरबारापर्यंत पोंहचत नाहींत."

—नवजीवन, हिं. न. जी. ७-३-१९२९ पृष्ठ २३० कराचींतील एका प्रवचनामधून.

## प्रार्थना.

"......प्रार्थना करणें म्हणजे याचना करणें नव्हे. ती तर आत्म्याची हाक आहे."

—यं. इं. हिं. न. ज. ३०-९-२६. पृष्ठ ५२.

x x x

ज्या वेळीं आपण आपली खरीखुरी असमर्थता जाणतों आणि सर्व सोडून ईश्वरावर विश्वास ठेवतों त्याच भावनेचें फळ म्हणजे प्रार्थना होय.

—यं. इं. हिं. न. जी. २५-११-२६. पृ. ११४.

एका माणसाला आपण पत्र लिहितों. त्याचें बरें वाईट उत्तर मिळतें अगर मिळतहि नाहीं. तें पत्र शेवटीं कागदाचा तुकडाच ! ईश्वराला पत्र लिहिण्याला कागदाचा तुकडा लागत नाहीं, दौत-लेखणी आणि शब्दहि लागत नाहींत. ईश्वराला जें पत्र लिहिलें जातें त्याचें उत्तर मिळत नाहीं, हें संभवनीय नाही. त्या पत्राचें नांव पत्र नसून प्रार्थना हें आहे, पूजा आहे. मंदिरांत जाऊन अशीं पत्रें कोट्यवधि लोक प्रतिदिनीं लिहितात आणि त्यांची श्रद्धा आहे कीं, त्या पत्रांना उत्तर भगवंतानें दिलेंहि आहे. हा निरपवाद सिद्धांत आहे-( त्याचे ) भक्त बाह्य प्रमाण देऊं शकले नाहींत तरी त्याची श्रद्धा हेंच त्याचें प्रमाण होय. उत्तर प्रार्थने-मध्येंच सदैव राहिलें आहे, अशी भगवंताची प्रतिज्ञा आहे.

—ह. से. ३१-३-'३३.

"प्रार्थनेचें आमंत्रण हें खात्रीनें आत्म्याच्या व्याकुलतेचें द्योतक आहे. प्रार्थना पश्चात्तापाचें एक चिन्ह आहे. प्रार्थना ही आपण अधिक चांगलें, अधिक शुद्ध होण्याची आतुरता सूचित करते."

—ह. से. २१-६-३५. पृ. १४४.

× × ×

## प्रार्थना आणि हृदयाचा संबंध.

"......प्रार्थना अथवा भजन हें जिभेनें नाहीं तर हृदयानें होतें. आणि म्हणूनच मुके, तोतरे, मूढहि प्रार्थना करूं शकतात. जिभेवर अमृत असेल आणि हृदयांत हलाहल तर मग जिभेवर अमृताचा काय फायदा ? कागदाच्या गुलाबापासून सुगंध कसा होणार ?"

नवजीवन, हिं. न. जी. २४-९-२५ पृ. ४४.

## प्रार्थना.

"......स्तुति, उपासना, प्रार्थना म्हणजे कांहीं अंध-विश्वास नव्हे. आपण खातों, पितों, चालतों, बसतों हें जितकें खरें आहे त्यापेक्षांही या गोष्टी अधिक खऱ्या आहेत. उलट ह्याच एकमेव सत्य गोष्टी असून इतर सर्व कांहीं खोटें आहे, असं म्हणणं अतिशयोक्तीचें नाहीं."

"अशी उपासना, अशी प्रार्थना हें वाणीचें वैभव नाहीं. तिचें मूळ कण्ठ नाहीं तर हृदय आहे. अतएव जर आपण हृदयाला निर्मळ बनवूं नि त्याच्या ( हृदयाच्या ) 'तारां' चा सूर मिळवूं तर त्याच्यामधून निघणारा तो सूर गगनगामी होईल. त्यासाठीं जिभेची आवश्यकता नाहीं. ती तर स्वभावतःच अद्‌भुत वस्तु आहे. विकाररूपी मलाच्या शुद्धीकरतां हार्दिक उपासना ही एक जीवन-संजीवनी आहे."

—हिंदी आत्मकथा, भाग १ अध्याय २२ पृ. ८२–८३.

## प्रार्थना आणि उपवास.

"अर्थहीन स्तोत्रपाठ ही प्रार्थना नव्हे नि शरिराला भुकें मारणें हा उपवास नव्हे. ज्याला ईश्वराचें श्रद्धापूर्वक ज्ञान आहे त्याच्याच हृदयांतून प्रार्थना निर्माण होते आणि वाईट अर्थात् हानिकारक विचारांपासून नि अशुद्ध कर्म नि आहार यांपासून परावृत्त होणें हा उपवासाचा अर्थ आहे. मन तर विविध प्रकारच्या चटकदार पदार्थांकडे धांव घेत आहे आणि शरीर तर भुकेनें मरत आहे, असा उपवास निरर्थक व्रत-उपवासापेक्षांहि वाईट आहे."

ह. से. १०–४–३७. पृ. ६२.

## —प्रार्थना–हार्दिक.

"......प्रार्थना ही औपचारिक होऊंच शकत नाहीं. जेव्हां ती आपोआप हृदयांतून निघते तेव्हांच ती प्रार्थना खरी प्रार्थना होय."

—नवी दिल्ली १–७–४०. ह. से. ६–७–४०. पृ. १७

## आत्मबलाचें अस्तित्व.

" आत्मबलाच्या सफलतेचें सर्वांत मोठें प्रमाण हेंच कीं इतकी युद्धें होऊन सुद्धां जग अजून कायम आहे. यावरून हें स्पष्ट होतें कीं, युद्धबला-शिवाय दुसरें एकादें बलच जगाचा आधार आहे."

—१९०८ हिंद स्वराज्य.

## हृदयाची गुहा हीच खरी गुहा होय.

"......जगाचा ज्ञानमय त्याग हीच मोक्षप्राप्ति होय. जगाचा सर्वथा त्याग हिमालयाच्या शिखरावरहि नाही. हृदयाची गुंफा हीच खरी गुंफा आहे. मनुष्यानें त्यांत लपून, सुरक्षित राहून, संसारांत राहूनही त्यापासून अलिप्त राहावें नि अनिवार्य कामामध्यें प्रवृत्त होऊन विचरण करावें."

—नवजीवन हिं. न. जी. २०–८–२५. पृ. ३.

## भ्रमात्मक वस्तु.

"......शरीर जर मोक्षाला बाधक होत असेल तर तें भ्रमात्मक ( मोहमयी ) आहे. त्याचप्रमाणें आत्म्याच्या गतीला ज्या ज्या गोष्टी आडव्या येतात त्या भ्रमात्मक आहेत."

—नवजीवन हिं. न. जी. २–११–२४ पृष्ठ ९०.

## मृत्यु.

"......खरें सांगावयाचें म्हणजे मृत्यु हें ईश्वराचें अमर दान आहे. काम करणारें शरीर चेतनाशून्य बनतें आणि त्यामध्यें राहणारा पक्षी उडून जातो. जोंपर्यंत या ( आत्मरूपी ) पक्ष्याचा मृत्यु होत नाहीं तोंपर्यंत शोक करण्याचा प्रश्नच येत नाहीं."

—नवजीवन हिं. न. जी. ७–३–२९ पृष्ठ २२६.

x x x

## खरा हिमालय हृदयांत आहे.

"......खरा हिमालय आपल्या हृदयांत आहे. या हृदयरूपी गुहेंत लपून तेथून शिवदर्शन करणें हीच खरी यात्रा आहे, नि हाच पुरुषार्थ आहे.

—नवजीवन. हिं. न. जी. १८–७–२९ पृ. ३८३.

## मानव जीवनाचें ध्येय.

"......मनुष्यजीवनाचा उद्देश आत्मदर्शन हा आहे, आणि त्याच्या सिद्धीचा मुख्य आणि एक उपाय म्हणजे पारमार्थिक भावनेनें जीवनमात्राची सेवा करणें, आणि त्याच्याशीं तन्मय होणें नि अद्वैताचें दर्शन करणें हा होय."

हिं. न. जी. १५-८-२९ पृ. ४१२.

x x x

## अंतरात्म्याची जागृति.

"......अंतरात्मा अभ्यासानें जागृत होतो. तो मनुष्यमात्रामध्यें स्वभावतः जागृत नसतो. त्याच्या अभ्यासाकरिता अतिशय पवित्र वायुमंडलाची जरुरी असते, सतत प्रयत्नाची जरुरी असते. ती अत्यंत नाजुक गोष्ट आहे......अंतःकरण म्हणजे काय? परिपक्व बुद्धिद्वारें आपल्या अंतर्पटावर पडणारा प्रतिध्वनि!"

—नवजीवन. हिं. न. जी. २४-८-२४ पृ. ११

## अंतर्नाद.

"मी असें मानतों कीं, सत्याचें तादृश ज्ञान, सत्याचा साक्षात्कार हाच अन्तर्नाद होय."

—ह. से. १०-११-३३.

## आत्मशांतीचा उपाय.

".......साधु-जीवनानेंच आत्मशांतीची प्राप्ति संभवनीय आहे. तीच इहलोक आणि परलोक या दोहोंचें साधन आहे. सत्य आणि अहिंसामय जीवन, संयमपूर्ण जीवन हाच साधुजीवनाचा अर्थ आहे. भोग कधींहि धर्म बनूं शकत नाहीं. धर्माचें मूळ तर त्यागामध्येंच आहे."

—हिं. न. जी. १५-८-२९ पृ. ४१२.

## सर्व कांहीं आपल्यामध्यें आहे.

"........स्वर्ग आणि पृथ्वी सर्व कांहीं आपल्यामध्यें आहे. आपण पृथ्वीशीं परिचित आहों पण आपल्या हृदयांत असलेल्या स्वर्गाशीं अगदीं अपरिचित आहों."

x x x

## मानवाची तात्त्विक एकता.

जीवमात्र शेवटीं एकच आहे ही धर्माची शिकवण आहे. अनेकता ही क्षणिक असल्यामुळें आभासमात्र आहे. राष्ट्रभावनासुद्धां आम्हांला हाच धडा देत आहे.

—ह. से. ४–७--३६ पृष्ठ. १५६.

# ४ हृद्गत भाव-तत्त्व : :

## आशावाद.

"आशावाद आस्तिकता आहे. केवळ नास्तिकच निराशावादी होऊं शकतो. आशावादी ईश्वराची भीति बाळगतो, विनयपूर्णतेनें आपला अन्तर्नाद ( आंतला आवाज ) ऐकतो, त्या अनुसार वागतो आणि ईश्वर जें करतो तें चांगल्या करितांच करतो असें मानतो."

× × ×

आशावादी प्रेमात मग्न राहातो. कोणालाही आपला शत्रु मानत नाही. त्यामुळें ( प्रेमानें ) निर्भय होऊन तो जंगलांत आणि गांवोगांवी प्रवास करतो. भयानक जनावरें आणि अशाच हिंस्र स्वभावाच्या माणसानाही तो घाबरत नाहीं. कारण त्याच्या आत्म्याला साप चावूं शकत नाहीं आणि पाण्याचा खंजीरही छेदूं शकत नाहीं. शरीराची तो तर चिंताच करीत नाहीं. कारण तो शरीराला कांचेची बाटली समजतो. तो जाणतो कीं, ती एके दिवशीं फुटणार आहे. म्हणून तो शरीररक्षणाकरितां जगाला त्रास देत नाहीं......

—नवजीवन, हिं. न. २८–१०--२१.

## शांति दगडाची नाहीं—हृदयाची.

"मी शांतिपरायण मनुष्य आहें. शांतीवर माझा विश्वास आहे, पण मी वाटेल ती किंमत देऊन शांति खरेदी करूं इच्छीत नाहीं. तुम्ही दगडांत जी शांति पहातां ती मला नको आहे. जी आपण कबरेमध्यें पहात

अहांत ती शांति मी इच्छीत नाहीं. परंतु जी मनुष्याच्या हृदयामध्यें समाविष्ट आहे आणि सारी दुनिया वार करण्याकरितां तयार झाली असतां देखील सर्व शक्तिमान् ईश्वराची शक्ति ज्याचें रक्षण करते ती शांति मला हवी."

—सर्वोदय, 'एप्रिल' ३९ पृष्ठ ३७.

x x x

## श्रद्धेचा अर्थ.

"......श्रद्धेचा अर्थ आहे आत्मविश्वास, आणि आत्म-विश्वासाचा अर्थ आहे ईश्वरावर विश्वास. जेव्हां चारी बाजूंनीं वादळाचे काळेकुट्ट ढग दिसतात, किनारा कांहीं नजरेसमोर येऊं शकत नाहीं आणि असें वाटूं लागतें कीं, बस, आपण आतां बुडणार, तरीसुद्धां ज्याला विश्वास असतो कीं, मी मुळींच बुडणार नाहीं, त्याला म्हणतात श्रद्धावान्."

—पुण्याच्या सभेंत, नवजीवन हिं. न. जी. १४-९-२४ पृ. ३८.

## श्रद्धा.

"......काशी विश्वनाथाची भव्य मूर्ति मौ. हसरत मोहानींना एक दगडाचा तुकडा असेल, पण मला ती ईश्वराची प्रतिमा आहे. माझें हृदय त्याच्या दर्शनानें द्रवित होतें. ही श्रद्धेची गोष्ट आहे. जेव्हां मी गाईचें दर्शन घेतों त्या वेळीं मला कांहीं भक्ष्य पशूचें दर्शन होत नाहीं, तर तीमध्यें मला एक करुण काव्य दृष्टीस पडतें. मी तिची पूजा करीन, आणखी एकदां करीन आणि सारें जगत् मला विरोध करण्याकरितां उभें राहिलें तरी त्याच्या बरोबर सामना देईन. ईश्वर एक आहे पण तो मला दगडाची पूजा करण्याची श्रद्धा प्रदान करत आहे.

—हिं. न. जी. ८-१-२५ पृ. १७८.

"......मी हें सांगण्याचें धाडस करतों कीं, श्रद्धा आणि विश्वास राहिला नाहीं तर (एका) क्षणांत प्रलय होऊन जाईल. खरी श्रद्धा याचा अर्थ हाच कीं, ज्यांनीं तपस्या व भक्तिद्वारा आपलें पवित्र जीवन व्यतीत केलें आहे असा आमचा विश्वास आहे, त्याच्या युक्तियुक्त अनुभवाचा आदर करणें. म्हणूनच प्राचीनकालीन अवतारावर किंवा

देवदूतावर विश्वास ठेवणें, हें निरर्थक नव्हे, तर ती आत्म्याच्या आंतरिक भुकेची तृप्ति आहे."

—यं. इं. हिं. न. जी. १४--४--२७ पृ. २७१.

× × ×

## श्रद्धा—अंधश्रद्धा नव्हे.

"......माझी श्रद्धा तर ज्ञानमयी आणि विवेकपूर्ण आहे. जो बुद्धीचा विषय आहे, तो श्रद्धेचा विषय कदापिही होऊं शकत नाहीं. आणि म्हणूनच अंधश्रद्धा ही श्रद्धाच नव्हे."

—हिं. न. जी. २९-८-२९, पृ. १२.

## श्रद्धेचें महत्त्व.

"जेथें मोठमोठ्या बुद्धिमानाची बुद्धि काम करूं शकत नाहीं, तेथें फक्त श्रद्धावानाची श्रद्धा काम करूं शकते. दुसऱ्यांचे नेत्र जेथें दिपून जातात, तेथें श्रद्धावंताचे नेत्र दीपकवत् सर्व स्पष्ट रूपांत पाहतात. जेथें श्रद्धा आहे तेथें पराजय नाहीं. श्रद्धावंताचें अकर्म सुद्धां कर्म होतें."

—ह. से. २१--४--३३.

## भक्ति बुद्धीचा विषय नाहीं.

"भक्तीचा प्रवाह लेखणींतून वहात नाहीं. तो बुद्धीचा विषय नव्हे. तो हृदयाच्या गुंफेमधूनच निघूं शकतो आणि जेव्हां तो तेथून बाहेर पडतो तेव्हां तिचा प्रवाह कोणतीही शक्ति रोखूं शकत नाहीं. गंगेच्या प्रबल प्रवाहाला कोण रोखूं शकणार ?"

ह. से. ५-५-३३.

## बुद्धि कर्मानुसारिणी आहे.

"......प्रथम हृदय, नंतर बुद्धि. आधीं सिद्धांत नंतर प्रमाण. प्रथम स्फुरण आणि मग त्याला अनुकूल तर्क. प्रथम कर्म आणि नंतर बुद्धि. आणि म्हणूनच बुद्धि ही कर्मानुसारिणी म्हटली आहे. मनुष्य जें कांहीं करतो किंवा करूं इच्छितो, त्याचें समर्थन करण्याकरितां प्रमाणही शोधून काढतो."

—नवजीवन, हिं. न. जी. १५-१०-२५, पृ. ६८.

## बुद्धीची मर्यादा.

"....जेव्हां मनुष्य सर्वज्ञतेचा आव आणूं लागतो तेव्हां बुद्धिवादाला भयंकर राक्षसाचें नांव दिलें पाहिजे. विटा-दगड यांनाच ईश्वर मानून पूजा करणें ही मूर्तिपूजा जशी वाईट तशी बुद्धीलाच सर्वस्व मानणें ही तितकीच वाईट मूर्ति-पूजा होय."

यं. इं. न. जी. १४--१०--२६ पृ. ६६.

× × ×

"......केवळ व्यावहारिक बुद्धि तर सत्याचें आवरण आहे. ते तर सोन्याचें पात्र असून सत्यरूपाला झाकून टाकतें. अशा बुद्धींतून हजारों गोष्टी पैदा होतील. त्यांतून एकच गोष्ट बचावेल आणि ती म्हणजे श्रद्धा!"

—गां. से. संघसंमेलन, डेलांग. २८–३–३८.

## बुद्धि विरुद्ध श्रद्धा.

"ज्यांची दृष्टि अंधुक झालेली नाहीं आणि ज्यांची श्रद्धा पुष्कळ विद्वत्ता प्राप्त करण्यामुळें मंद झालेली नाहीं अशा वाचकांच्या समोर मी तें (रामनाम) ठेवीत आहें. विद्वत्ता आपल्याला जीवनांतल्या अनेक अवस्थांमधून सफलतापूर्वक नेते, पण संकट आणि प्रलोभनाच्या वेळीं ती आपल्याला मुळींच साथ देत नाहीं. अशा अवस्थेंत फक्त एकटी श्रद्धाच मुक्त करते. रामनाम अशा लोकांकरितां नाहीं कीं, जे ईश्वराला हरतऱ्हेनें फूस लावूं इच्छितात आणि नेहमीं आपल्या रक्षणाची आशा त्याच्यापासून करतात. जे ईश्वराला भिऊन वागतात आणि जे संयमपूर्वक जीवन व्यतीत करूं इच्छितात पण आपल्या दौर्बल्यामुळें जे त्याचें पालन करूं शकत नाहींत, अशाच लोकांकरितां रामनाम आहे."

—यं. इं. २२–१–२५, पृ. २७.

"......ज्या विषयांत बुद्धीचा प्रयोग करतां येतो, तेथें आपण केवळ श्रद्धेनें चालूं शकत नाहीं. ज्या गोष्टी बुद्धीच्या पलीकडे आहेत त्यांच्याकरिताच श्रद्धेचा उपयोग आहे."

—नवजीवन, हिं. न. जी. २४–६–२६ पृ. ३३५.

"......श्रद्धा आणि बुद्धि यांचीं क्षेत्रें निरनिराळीं आहेत. श्रद्धेनें अंतर्ज्ञान, आत्मज्ञानाची वृद्धि होत असल्यानें अंतःशुद्धिहि होतेच. बुद्धीनें बाह्य ज्ञानाची, सृष्टीच्या ज्ञानाची वृद्धि होते, परंतु तिचा अंतःशुद्धीशीं कार्यकारणासारखा असा कांहीं संबंध रहात नाहीं. अत्यंत बुद्धिशाली लोक अत्यंत चरित्रभ्रष्टही आढळतात. पण श्रद्धेच्या बाबतींत चारित्र-शून्यता असंभवनीय आहे."

— हिं. न. जी. १९–९–२९, पृ. ३६.

"ज्याच्या ठिकाणीं शुद्ध श्रद्धा आहे, त्याची बुद्धि तेजस्वी रहाते. तो स्वतःच आपल्या बुद्धीनें ओळखतो कीं, जी गोष्ट बुद्धीपेक्षां श्रेष्ठ आहे, पलीकडे आहे ती श्रद्धाच होय. जेथें बुद्धि पोहचत नाहीं तेथें श्रद्धा प्रवेश करूं शकते. बुद्धीचें उत्पत्तिस्थान मेंदू आहे. श्रद्धेचें हृदय आहे. आणि हा तर जगताचा अविच्छिन्न अनुभव आहे कीं, बुद्धिबलापेक्षां हृदयबल हजारों पटीनें अधिक आहे. श्रद्धेनें जहाज चालतें, श्रद्धेनें मनुष्य पुरुषार्थ करतो, आणि श्रद्धेनेंच तो पहाडाला हालवूं शकतो. श्रद्धावंताला कोणी पराजित करूं शकत नाहीं. बुद्धिमानाला नेहमीं पराजयाचें भय वाटतें."

— हिं. न. जी. १९–९–२९, पृ. ३६.

## प्रेम-तत्त्व.

"......प्रेमतत्त्वच जगावर राज्य करीत आहे. मृत्यूनें घेरलें असतांहि जीवन अढळ आहे. विनाश निरंतर सुरू असतांनाहि हें विश्व बरोबर चालूच आहे असत्यावर सत्य नेहमीं जय मिळवितें. प्रेम तिरस्काराला जिंकून घेतें. ईश्वर सैतानावर सदैव विजयी होतो."

—यं. इं. हिं. न. जी. २६–१०–२४, पृ. ८४.

## प्रेमबंधन.

".......प्रत्येक धर्म गर्जना करून सांगत आहे कीं, प्रेमाच्या ग्रंथीनेंच जगत् बांधलें आहे. विद्वान् लोक हें शिकवीत आहेत कीं, जर प्रेमबंधन नसलें तर पृथ्वीचा एक एक परमाणु अलग अलग होईल. आणि पाण्यांतहि जर स्नेह नसला तर त्याचा एक एक बिंदु अलग अलग

होईल. अशाच प्रकारें जर मनुष्यामनुष्यामध्यें प्रेम नसलें तर आपण मृतप्रायच होऊं."

—हिं. न जी. ५–३–२५, पृ. २४१.

## प्रेम.

"प्रेम कधींच हक्क दाखवीत नाहीं, तें नेहमी देतें. प्रेम नेहमी कष्ट सहन करतें. तें कधीं त्रासत नाहीं, नि कधीं बदलाही घेत नाहीं."

— यं. इं. हिं. न. जी. ९–७-२५, पृ. ३८२.

## शुद्ध विरुद्ध विकृत प्रेम.

"......जेथें शुद्ध प्रेम असतें तेथें अधीरतेला स्थानच नसतें. शुद्ध प्रेम हें देहाचें नव्हे तर, आत्म्याचेंच संभवनीय आहे. देहाचें प्रेम विषयरूप आहे...... आत्मप्रेमाला कोणतेंहि बंधन विघ्नरूप असत नाहीं. तर त्या प्रेमांत तपश्चर्या असते आणि धैर्य तर इतकें असतें कीं, मृत्यूपर्यंत वियोग झाला तरी काय झालें ?"

- नवजीवन-हिं. न. जी. ८–४–२६ पृ. २६७.

## एकपक्षीय प्रेम.

"प्रेम जरी एकपक्षीयहि असलें तरी तेथें सर्वस्वी दुःख असूं शकत नाहीं."

— आत्मकथा, पृष्ठ १३.

## शुद्ध प्रेम.

"......शुद्ध प्रेमाला जगांत कोणतीहि गोष्ट असंभवनीय नाहीं."

—आत्मकथा, पृष्ठ १४.

## प्रेम.

"......प्रेमानें ओथंबलेलें हृदय आपल्या प्रेमपात्राच्या चुकीवरहि दया करतें आणि स्वतः घायाळ होऊनहि त्यावर प्रेम करतें. एकल्या सुखाचा साथीदार प्रेमी कधींहि होत नाहीं."

—यं. इं. हिं. न. जी. २४–१०-२९, पृ. ७४.

## विकारयुक्त प्रेम.

"......जें प्रेम पशुवृत्तीच्या तृप्तीवर अवलंबून असतें तें निवळ स्वार्थी असतें आणि थोड्याशाही दाबानें थंड पडूं शकतें."

—यं. इं. हिं. न. जी. १६-९-२६, पृष्ठ ३६.

## उन्मुक्त प्रेम.

"गुप्त किंवा उघड अशा स्वतंत्र प्रेमावर माझा विश्वास नाहीं. उन्मुक्त प्रेमाला मी कुत्र्याचें प्रेम समजतों आणि गुप्त प्रेमामध्यें तर भ्याडपणाहि आहे."

—ह. से. ४-११-३९, पृ. ३०३

"वज्रादपि कठोराणि, मृदूनि कुसुमादपि.—प्रेमाची माझी कल्पना ही आहे कीं, तें फुलापेक्षांही कोमल आणि वज्रापेक्षांही कठोर असतें."

—ह. से. १३-१-४०, पृ. ३८६.

## प्रेम निर्भय आहे.

" ......तुमच्या भित्रेपणांतहि तुमचा अभिमान आहे, यांत हिंसा आहे. जेथें प्रेम आहे, तेथें भीतीला स्थानच कोठें आहे?"

—ह. से. २७-७-४०, पृ. २८६.

## विकार.

" ......विकार आगीप्रमाणें आहे. तो माणसाला गवताप्रमाणें जाळतो. गवताच्या राशींतल्या एका काडीला पेटवा, बस, सारी रास पेटून जाईल. प्रत्येक काडीला निरनिराळें जाळण्याचे कष्ट आपल्याला करावे लागणार नाहींत. एकाच्या मनांत विकार उत्पन्न झाला तर त्याचा स्पर्श दुसऱ्याला होतो. दंपतीमध्यें एकांत विकार उत्पन्न होऊनहि जर दुसरा निर्विकार राहूं शकत असेल तर त्याला मी सहस्र वेळां प्रणिपात करतों."

—नवजीवन हिं. न. जी. ९-७-२४, पृ. ३८५.

## दुर्भावना.

" दुर्भावनेला मी मनुष्यत्वावरचा कलंक समजतों. "

—यं. इं. हिं. न. जी. १२–९–२९, पृ. २९.

## क्रोध = मदिरा–अफू.

"......क्रोधाचीं लक्षणें मदिरा आणि अफू ह्या दोहोंशीं जुळतीं आहेत. दारुड्याप्रमाणें क्रोधी मनुष्यही पहिल्यानें आवेशाच्या झटक्यांत लाल पिवळा होतो. मग आवेश मंद झाल्यावरहि क्रोध कमी झाला नाहीं तर तो अफूचें काम करतो, आणि मनुष्याच्या बुद्धीला मंद बनवितो. अफूप्रमाणें बुद्धीला पोखरून टाकतो. क्रोधाचीं लक्षणें क्रमशः संमोह, स्मृतिभ्रंश आणि बुद्धिनाश अशीं मानलीं गेलीं आहेत. "

—नवजीवन, हिं. न. जी. २४–१०–२९, पृ. ७७.

## खोटें.

"...... खोट्याला कांहीं उत्तर न देणें हाच सर्वोत्कृष्ट उपाय आहे. खोटें आपल्याच मरणानें मरतें. त्याची स्वतःची कांहीं शक्ति नाहीं. विरोधानें तें वाढतें. "

—ह. से. २२–६–४०, पृ. १५३.

## आतङ्क ( रोग )

" आतङ्क सर्वांत जास्त निःसत्त्व करणारी अवस्था आहे, जीमध्यें कांहींही होऊं शकतें. "

—सेवाग्राम, ४–६–४०. ह से ८–६–४०, पृ. १३७.

---

# ५ गांधीप्रतिपादित मार्गाचें व्रत

## यज्ञाचें मर्म.

"......यज्ञ करणारा मनुष्य दुसऱ्याच्या दयेचा भुकेलेला नसतो. त्याची स्थिति दयाजनक नसून आदरणीय आहे. जो अनिच्छेनें किंवा

खेदानें केला जातो तो यज्ञ नव्हे. बलिदानांत उल्हास, हर्ष आणि उत्साह असतो. बलिदान करणारा अशी इच्छा करतो कीं, मला अधिक त्याग करण्याचें सामर्थ्य लाभलें आहे. तो त्यागानें दुःखी होत नाहीं. कारण त्याला त्यागांत सुख मिळतें."

—नवजीवन, हिं. न जी. २३–११–२४, . ११८

## संकल्प.

"......संकल्पकर्तारूपी नाविकाला संकल्प हा दीपस्तंभासारखा आहे. दीपस्तंभाकडे लक्ष ठेवलें तर अनेक तुफानांतून सुद्धां मनुष्य सहीसलामत पार पडूं शकतो. परंतु ज्याप्रमाणें तो दीपस्तंभ तुफान शांत करूं शकत नाहीं, तरीहि तो या तुफानातून सुरक्षितपणें पार पडण्याची (नाविकाला) शक्ति देतो, त्याप्रमाणें हृदयरूपी उसळलेल्या समुद्रांतील तरंगांपासून पार पडण्याची प्रचंड शक्ति (मनुष्याला) मनुष्याचा संकल्प ही आहे."

—हिं न. जी. ५–८–२६, पृष्ठ ४०६.

## व्रत.

"......व्रत बंधन नाहीं, तर स्वातंत्र्याचें द्वार आहे......व्रत-बंधनापासून दूर राहून मनुष्य मोहांत पडतो. आपण व्रताच्या बंधनांत राहाणें म्हणजे जणुं काय व्यभिचारापासून मुक्त होऊन एकपत्नीनिष्ठ राहाणें होय."

—हिं आ क. भाग ३, अध्याय ७, पृष्ठ २२७ सस्ता संस्करण १९३९.

## जीवनांत प्रतिज्ञेचें महत्त्व.

"......प्रतिज्ञाहीन जीवन हें पाया नसलेल्या घरासारखें आहे. अथवा असें म्हणा कीं, कागदाचें जहाज आहे......प्रतिज्ञेच्या शक्तीवर हें जग टिकून राहिलें आहे. प्रतिज्ञा न घेणें याचा अर्थ अनिश्चित अथवा अस्थिर राहणें होय."

—नवजीवन हिं. न. जी १५–८–२९, पृ ४११.

## शांति आणि ब्रह्मचर्य

"शांति मुद्धां एक सूक्ष्म वीर्य आहे. तिचा (शांतीचा) संचय करणाराही मोठा ब्रह्मचारी आणि तेजस्वी होतो. आपण ब्रह्मचर्याच्या व्याख्येला केवळ स्थूल अर्थ दिला आहे; आणि जे लोक प्रतिक्षणीं क्रोधाविष्ट होतात त्यांना (आपण) दोषी मानण्याचें सोडून दिलें आहे. ज्याप्रमाणें स्थूल ब्रह्मचर्याचें पालन शरीरसुखाला आवश्यक आहे, त्याप्रमाणें आध्यात्मिक ब्रह्मचर्याची मुद्धां आवश्यकता आहे."

—हिं. न जी. वर्ष १ अंक १-२१

## परम सत्य.

"... ...परम सत्य एकटें उभें असतें. सत्य साध्य आहे. अहिंसा साधन आहे."

—येरवडा जेल, १९-८-३०.

## सत्य व्रताचें मूळ आहे.

"......सगळीं व्रतें......सत्याच्या गर्भात आहेत. तीं अशा प्रकारें दाखवितां येतील—




इत्यादि, पुष्कळच वाढवतां येतील."

—येरवडा जेल, १९-८-३०.

## ब्रह्मचर्य.

"......काया-वाचा-मनानें सर्व इंद्रियांचें संयमन हाच ब्रह्मचर्याचा अर्थ...... जोंपर्यंत आपल्या इच्छेशिवाय एकहि विचार येणार नाहीं इतका ताबा आपल्या मनावर बसला नाहीं, तोंपर्यंत तें संपूर्ण ब्रह्मचर्य नव्हे. जितके जितके म्हणून विचार आहेत ते सर्व एक तऱ्हेचे विकार

आहेत. त्यांना वश करणें याचा अर्थ मन वश करून घेणें आणि मनाला वश करणें हें वायूला वश करण्यापेक्षांहि कठीण आहे. इतकें असूनहि आत्मा जर कांहीं वस्तु असली तर हें सुद्धां साध्य होईल."

--हिं. आ क. भाग ३ अध्याय ८ पृष्ठ २३१-२३२, १९३९.

"......ब्रह्मचर्यहीन जीवन मला शुष्क आणि पशुवत् वाटतें. पशु स्वभावतः निरङ्कुश (अनिर्बंध) आहे, पण मनुष्यानें स्वतःला स्वेच्छेनें ताब्यांत ठेवणें याच गोष्टींत मनुष्यत्व आहे. ब्रह्मचर्याची जी स्तुति धर्मग्रंथांत केली गेली आहे ती मला प्रथम अत्युक्ति वाटत होती. परंतु ती फारच उचित (योग्य) आणि अनुभवासिद्ध आहे हें (मला) दिवसेंदिवस अधिकाधिक स्पष्ट होत आहे."

—हिं आ. क. भाग. ४ अध्याय २५, पृष्ठ ३५५.

x x x

"विषयमात्राचा निरोध (विरोध) च ब्रह्मचर्य होय."

—येरवडा जेल. ५-८-३०.

x x x

"......सत्याग्रही सेनापतीच्या शब्दांत शक्ति असली पाहिजे— असीमित अस्त्रशस्त्रानीं प्राप्त होणारी ती शक्ति नव्हे, तर जी (शक्ति) जीवनाची शुद्धता, दृढ जागरूकता आणि सतत आचरणानें प्राप्त होते (ती होय.) हें ब्रह्मचर्याच्या पालनाशिवाय असंभवनीय आहे. मनुष्याला जितकी संभवनीय आहे तितकी ती सपूर्ण असणं आवश्यक आहे. येथें ब्रह्मचर्याचा अर्थ फक्त दैहिक आत्मसंयम किंवा निग्रहच नव्हे. त्याचा ह्यापेक्षां अधिक अर्थ आहे. सर्व इंद्रियांवर पूर्ण विश्वास हा त्याचा हेतु आहे. अशा प्रकारें अशुद्ध विचार म्हणजे सुद्धां ब्रह्मचर्यभंग होय. आणि हीच अवस्था क्रोधाची आहे. ज्यामुळें जीवन निर्माण होतें, ती सारी शक्ति या वीर्य-शक्तीच्या रक्षणानें आणि ऊर्ध्वगतीनें प्राप्त होते. आणि ह्या वीर्य-शक्तीचा नाश करण्याऐवजीं संचय केला गेला तर ती सर्वोत्तम सृजन-शक्तीच्या रूपांत परिणत होते. वाईट-अस्ताव्यस्त, अव्यवस्थित, अवाञ्छनीय विचारांनीं सुद्धां या शक्तीचा सतत आणि नकळत क्षयही होत असतो. आणि ज्या अर्थी विचारच सर्व वाणी आणि क्रिया यांचें मूळ होय म्हणून

वाणी, क्रिया त्याचेंच अनुसरण करतात. म्हणूनच पूर्णत: नियंत्रित विचार हीच स्वत: सर्वोच्च प्रकारची शक्ति आहे, आणि स्वत: क्रियाशील बनूं शकते. मूकरूपानें केल्या जाणाऱ्या हार्दिक प्रार्थनेचा मला तर हाच अर्थ वाटतो. आणि मनुष्य ईश्वराच्या मूर्तीचा उपासक असेल तर तो आपल्या मर्यादित क्षेत्रांत कोणत्या गोष्टीची इच्छा करण्याचा अवकाश मात्र कीं, तो जें इच्छीत असेल तें होईल. ज्याप्रमाणें गळणाऱ्या नळांत वाफ ठेवल्यानें कांहींही शक्ति निर्माण होऊं शकत नाहीं, त्याप्रमाणें जो आपल्या शक्तीचा कोणत्याहि प्रकारानें क्षय होऊं देतो, त्याच्यामध्यें ही शक्ति असणें असंभवनीय आहे."

—ह. से. २३-७-३८, पृ. १८०.

## ब्रह्मचर्याचें आचरण.

"सत्याग्रहाचें मूळ प्रार्थनेंत आहे. सत्याग्रहाची लढाई आत्मवीरांसाठीं आहे, भ्याड किंवा अश्रद्धाळू लोकांसाठीं नाहीं. जगण्याची आणि मरण्याची कला सत्याग्रह आम्हांला शिकवतो."

—इं. ह. १९४६.

## ब्रह्मचाऱ्याचें आचरण.

"......ब्रह्मचारी राहणें याचा अर्थ हा नव्हे कीं मी कोणत्याही स्त्रीला स्पर्श करणार नाहीं—आपल्या बहिणीला स्पर्श करणार नाहीं. ब्रह्मचारी असणें याचा अर्थ हाच कीं, ज्याप्रमाणें कागदाला स्पर्श केल्यावर विकार उत्पन्न होत नाहीं, त्याप्रमाणें स्त्रीला स्पर्श करूनहि कोणत्याही प्रकारचा विकार उत्पन्न न होणें. माझी बहीण आजारी आहे आणि तिची सेवा करतांना तिचा स्पर्श होतांच ब्रह्मचर्यामुळें मी कचरूं लागलों तर तें ब्रह्मचर्य कवडी किंमतीचें होय. ज्या निर्विकार स्थितीचा अनुभव आपल्याला मृत शरीराला स्पर्श करतांच होतो तसाच अनुभव जेव्हां आपल्याला सुंदर युवतीला स्पर्श करण्यानें होऊं शकेल, तेव्हांच आम्ही ब्रह्मचारी होय."

—हि. न. जी. २६-२-२५, पृ. २२१.

## सेवेकरितां ब्रह्मचर्य.

" देशसेवेकरितां जे लोक सत्याग्रही होऊं इच्छितात, त्यांनीं ब्रह्मचर्याचें पालन केलें पाहिजे. सत्यसेवन केलेंच पाहिजे आणि निर्भय बनलें पाहिजे."

—हिंद स्वराज्य. १९०८.

## परोपकार.

" माझें स्वातंत्र्य गमावून इतरांस मदत करीत राहण्याइतका परोपकारी मी नाहीं."

—हरिजन, २१-६-४१.

" गरिबांच्या सेवेची शक्ति माझ्यांत आहे असें आढळलें आणि तिचा पुरेपूर उपयोग मीं न केला तर माझी गणना मूर्खांतच होईल."

इं. इ. १९४६

## ब्रह्मचर्य आणि आस्तिकता.

" मला ही गोष्ट सांगावी लागेल कीं, जोंपर्यंत ईश्वरावर—कीं जो साक्षात् (जिवंत) सत्य आहे—अखंड श्रद्धा नाहीं, तोंपर्यंत ब्रह्मचर्य व्रताचें पालन होऊं शकणार नाहीं."

—ह. से. २५-४-३६ पृ. ७८.

## ब्रह्मचर्य.

" ज्याप्रमाणें अहिंसेशिवाय सत्यसिद्धि संभवनीय नाहीं, त्याप्रमाणें ब्रह्मचर्याशिवाय सत्य आणि त्याचप्रमाणें अहिंसा या दोहोंची सिद्धि अशक्य आहे."

× × ×

" ब्रह्मचर्याचा हेतु हा कीं, ब्रह्म अर्थात् परमेश्वराचा मार्ग अनुसरणें म्हणजेच मन आणि इंद्रियें यांनीं परमेश्वराचा मार्ग अनुसरणें होय."

× × ×

"रागादि विकारांशिवाय अब्रह्मचर्य अर्थात् इंद्रियपरायणता असूं शकत नाहीं, आणि विकारी मनुष्य सत्य अथवा अहिंसेचें पूर्ण पालन करूं शकत नाहीं."

× × ×

"ब्रह्मचर्याचा अर्थ केवळ वीर्यरक्षा अथवा कामजय हाच मात्र नाहीं, तर त्यामध्यें (ब्रह्मचर्यपालनामध्यें) सर्व इंद्रियांचा संयम आवश्यक आहे."

× × ×

"पण जसें सत्याचा स्थूल अर्थ सत्यवाणी आणि अहिंसेचा स्थूल अर्थ प्राणहरण न करणें असा झाला आहे, तसेंच ब्रह्मचर्याचाहि फक्त 'कामजय' इतकाच अर्थ घेतला जातो. याचें कारण हें आहे कीं, मनुष्याला 'कामजय' हा अधिकाहून अधिक कठीण इंद्रिय-जय वाटतो."

× × ×

"......ब्रह्मचर्यानें जीवन-निर्वाह अशक्य होत नाहीं तर उलट अधिक चांगला आणि तेजस्वी होतो."

× × ×

"......विचारशील मनुष्य हें स्पष्ट पाहूं शकतो कीं, दुसऱ्या इंद्रियांच्या पोषणाशिवाय कामविकाराचें पोषण होत नाहीं, आणि दुसऱ्या इंद्रियांना जिंकल्याशिवाय 'काम' जिंकण्याची आशा करणें व्यर्थ आहे."

× × ×

"अशा प्रकारें प्रयत्न करणाऱ्या स्त्रीपुरुषांना ब्रह्मचर्यपालन जितकें वाटतें तितकें कठीण नाहीं."

## शरीरश्रम.

"जीवनाला आवश्यक असणारे पदार्थ करण्याकरितां स्वतः शारीरिक श्रम करणें हा अस्तेय आणि अपरिग्रहामधून निघणारा साधा नियम आहे. परिश्रमाशिवाय जो पदार्थ उत्पन्न होत नाहीं आणि ज्याच्याशिवाय जीवन निभूं शकत नाहीं, त्याकरितां शारीरिक श्रम केल्याशिवाय त्याचा उपयोग घेतला तर जगांत आपण चोर ठरूं."

× × ×

"पारमार्थिक दृष्टीनें ह्या परिश्रमांचें नांव यज्ञ आहे. आपण केलेल्या परिश्रमापासून उत्पन्न झालेल्या पदार्थांचा स्वत:च उपयोग करण्याची अभिलाषा धरणें याला सकाम कर्म म्हणतां येईल. अशा अभिलाषेशिवाय अमुक पदार्थ जगाकरितां उत्पन्न झालेच पाहिजेत असें जाणून परिश्रम करण्याचें नांव निष्काम कर्म होय, आणि तो यज्ञ होय."

× × ×

"कचरा वगैरे अनर्थकारी पदार्थांच्या सफाईसंबंधीं केलेले श्रमसुद्धां यज्ञाचा प्रकार म्हटला जातो. असा परिश्रम प्रत्येकानें अवश्य केला पाहिजे......भारतवर्षाच्या आजच्या परिस्थितींत कताई तसेंच मलमूत्राच्या सफाईची व्यवस्था करणें हें आश्रमामध्यें यज्ञकर्म मानलें जातें."

## अस्वाद

"अस्वाद याचा अर्थ स्वाद न घेणें. स्वाद म्हणजे रस......... कोणतीहि वस्तु स्वादाकरितां चाखणें हा व्रतभङ्ग होय."

—येरवडा जेल १२-८-३०.

## अस्वाद.

"एक जरी इंद्रिय स्वच्छंदी बनलें तरी दुसऱ्या इंद्रियावर असलेलें नियंत्रण सैल होतें. त्यामध्यें ब्रह्मचर्याच्या दृष्टीनें जिंकण्यांत सर्वांत कठीण आणि महत्त्वाचें असें स्वादेंद्रिय होय."

× × ×

"शरीरांतील खर्च होणाऱ्या 'तत्त्वा'ची भर करण्याकरितां आणि अशाप्रकारें शरीराला कार्यक्षम स्थितींत ठेवण्याकरितां आहाराची जरूरी आहे. त्याकरितां ही दृष्टि ठेवून जितक्या आणि ज्या प्रकारच्या आहाराची आवश्यकता आहे तेवढेंच खाल्लें पाहिजे. स्वादाकरितां–अर्थात् जिभेला रुचणाऱ्या (आवडण्याच्या) दृष्टीनें कांहीं खाणें अथवा (खाण्याच्या पदार्थांत) मिळविणें अथवा अधिक आहार करणें, हा अस्वाद व्रताचा भंग होय."

× × ×

" अस्वाद-वृत्तीला अनुसरून चालणाऱ्या भोजनालयामध्यें जाऊन तेथें जें भोजन बनविलेलें असेल, त्यांतील जें आपल्याकरितां त्याज्य नसेल त्या आहाराला ईश्वराचा अनुग्रह मानून, मनामंध्यें सुद्धां त्यावर टीका न करतां संतोषपूर्वक आणि शरीराला जितकें आवश्यक असेल तितकें खाणें हें अस्वाद व्रताला पुष्कळ हितकारी आहे. "

x x x

## स्वादाचा उगम.

" स्वादाचें खरें स्थान जीभ नाहीं तर मन आहे. "

—हिंदी आत्मकथा. भाग १ प्रकरण १७ पृष्ठ ६४, सस्ता संस्करण, १९३९.

## अस्तेय.

" ज्या वस्तूची आपल्याला जरूरी नाहीं, ती ( वस्तु ) ज्याच्या मालकीची आहे त्याची परवानगी घेऊनहि ( ती वस्तु ) घेणें चोरी होय. अनावश्यक अशी एकहि वस्तु घेतां कामा नये.

—मनामध्यें आपण कोणाची तरी वस्तु प्राप्त करून घेण्याची इच्छा केली किंवा तीवर वाईट नजर टाकली तर ती चोरी होय. "

—येरवडा जेल, १९-८-३०.

## अपरिग्रह-आत्यंतिक.

" आत्यंतिक अपरिग्रहाचा आदर्श त्याचाच म्हणतां येईल कीं, जो मनानें आणि कर्मानें अनासक्त आहे. हेतु हा कीं, तो ( आदर्श ) पक्षाप्रमाणें घराशिवाय, वस्त्राशिवाय, अन्नाशिवाय वावरतो....या अवधूत अवस्थेला तर फारच थोडे जाऊं शकतात. "

—येरवडा जेल, २६-८-३०.

## अपरिग्रह : खऱ्या सभ्यतेचें लक्षण.

" खऱ्या सुधारणेचें, खऱ्या सभ्यतेचें लक्षण परिग्रह वाढविणें नसून तो, विचार आणि इच्छापूर्वकतेनें कमी करणें होय. जों जों परिग्रह कमी होतो तों तों खरें सुख आणि खरा संतोष वाढतो, सेवाशक्ति वाढते. "

—येरवडा जेल, २६-८-३०.

## अपरिग्रह.

“अस्तेय आणि अपरिग्रह यांमध्यें फार थोडा भेद आहे. ज्याची आपल्याला आज आवश्यकता नाहीं, त्याचा भविष्यकालाच्या काळजीनें संग्रह करून ठेवणें, परिग्रह होय. परमेश्वरावर विश्वास ठेवणारा हें मानतो कीं ज्या वेळीं एखाद्या वस्तूची आवश्यकता खरोखरच निर्माण होईल तेव्हां ती अवश्य प्राप्त होईल. याकरिता तो कोणताहि संग्रह करीत नाहीं.”

x x x

“याचा अर्थ हा नव्हे कीं, जो शक्तिमान् असून सुद्धा मेहनत करीत नाहीं, त्याच्यासुद्धा गरजा परमेश्वर पुऱ्या करतो ! ज्याची मेहनत करण्याची इच्छा नाहीं, जो मेहनत म्हणजे संकट समजतो, त्याला तर परमेश्वर पार पाडणारा आहे असा विश्वासच जमणें शक्य नाहीं. तो आपल्या परिग्रह-शक्तीवर विश्वास ठेवतो. जो शक्तिमान् असूनसुद्धां पुरेपूर श्रम करतो, श्रम करण्यांत प्रतिष्ठा मानतो, आणि अपरिग्रही राहतो त्याच्या निर्वाहाची चिंता परमेश्वर करतो.”

x x x

“पण याचा अर्थ हा नव्हे कीं समाजांत राहून हें व्रतपालन करण्याची इच्छा करणारा मनुष्य आपल्याशीं असलेल्या वस्तु रस्त्यात ठेवून त्यांचा दुरुपयोग होऊं देईल. तो आपल्याला त्या वस्तूंचा रक्षक समजून त्याची नीट काळजी घेईल, पण क्षणभरसुद्धां स्वतःला त्यांचा मालक मानणार नाहीं. आपल्याला अथवा आपल्या मुलांना उपयोगी पडेल या विचारानें जो एक चिंधीसुद्धां गोळा करून ठेवतो आणि दुसऱ्याला जरुर असूनसुद्धां उपयोग करूं देत नाहीं तो परिग्रही होय.”

## परिग्रह.

“......खरें पाहिलें तर परिग्रह मानसिक गोष्ट आहे. माझ्याजवळ घड्याळ आहे, दोरी आहे आणि लंगोटी आहे. त्याच्या अभावानें जर मला दुःख झालें तर मी परिग्रही होय. जर कोणाला मोठ्या कांबळीची जरुरी असली तर ती ठेवावी, पण (ती) हरवल्यावर जर तो दुःखी झाला नाहीं तर तो अपरिग्रही होय.”

— गांधीसेवासंघसंमेलन, सावळी ३ मार्च ३९.

"परिग्रह याचा अर्थ भविष्यकालाकरितां व्यवस्था करणें. सत्यान्वेषी, प्रेमधर्माचा अनुयायी, उद्यांकरितां कोणत्याही वस्तूंचा संग्रह करूं शकत नाहीं."

—सर्वोदय, नवम्बर ३८.

## अभय.

"अभय व्रताचें पूर्ण पालन जवळ जवळ अशक्य आहे. भयावस्थेपासून मुक्ति, ज्याला आत्मसाक्षात्कार झाला आहे त्याचीच होऊं शकते. अभय, मोह-रहित अवस्थेची पराकाष्ठा होय."

—येरवडा जेल, २-९-३०.

## अभय

"जो मनुष्य आपल्या मनाच्या विकाराशिवाय अन्य आपत्तीचें भय राखतो तो अहिंसेचें पालन करूं शकणार नाहीं. ......घाबरणारा मनुष्य धर्माधर्माचा खोल विचार करण्याचें साहसहि करूं शकत नाहीं. तो सत्याला शोधूं शकत नाहीं.......त्या दृष्टीनें त्याच्याकडून सत्याचें पालन होऊं शकत नाहीं. मनुष्यानें घाबरण्याची वस्तु एकच आहे—आपलें विकारी चित्त ! ईश्वराची भीति घ्या, अधर्माची भीति घ्या, किंवा आपल्या विकाररूपी शत्रूची भीति घ्या. तीनहि एकच आहेत. जर विकार नसेल तर तो अधर्म होऊं शकत नाहीं. आणि जर अधर्म नसेल तर 'ईश्वराची भीति' हा शब्दप्रयोगच अयुक्त ठरेल."

## शारीरिक बल आणि इच्छाशक्ति.

"केवळ सँडोचें नव्हे, तर ऊन पाऊस सहन करील व कितीहि मेहनतीच्या कामास डगमगणार नाहीं असें खंबीर शारीरिक बल आपणांस असलें पाहिजे. प्रतिकारक्षम अशी प्रबळ इच्छाशक्तिहि आपणांत असली पाहिजे. शरीराचे स्नायु तर आपणांस मजबूत केलेच पाहिजेत पण इच्छाशक्तीचे व बुद्धीचे स्नायुहि आपणांस मजबूत केलेच पाहिजेत. तसें केलें तरच आपल्यापुढें असलेल्या संग्रामांत भाग घेण्यास आपण समर्थ होऊं."

—हरिजन, ७-६-१९४२.

## स्वदेशी.

"......'स्वदेशी' तर शाश्वत धर्म आहे.....स्वदेशी आत्मा होय. खादी या युगाकरितां त्याचें शरीर होय.......'स्वदेशी' एक सेवाधर्म आहे......'स्वदेशी' मध्यें स्वार्थ नाहीं, शुद्ध परमार्थ आहे......"

—नवजीवन. हिं. न. जी. २३–६–२७.

## स्वदेशी.

शरीरश्रमाच्या सिद्धांतामधूनच स्वदेशीधर्माचा उद्भव होतो.

x x x

स्वदेशी-व्रत हें केवळ स्वदेशाभिमानाच्या विचारामधून निघालें नाहीं.

x x x

केवळ राष्ट्रीयत्वाच्या भावनेतून उपजलेला स्वदेशीचा विचार विदेशियांच्या हिताची उपेक्षा करूं शकतो. आणि त्यांचें अहित करण्याकरितां सुद्धां असूं शकतो. धर्मरूप स्वदेशी, स्वराष्ट्राचें कल्याण साधून सुद्धां परराष्ट्राचें अकल्याण इच्छिणार नाहीं. अकल्याण करण्याचा उपक्रम करणार नाहीं.

स्वदेशी म्हणजे आपल्याच डबक्यांत बुडून मरणें नव्हे. स्वदेशी याचा अर्थ असा आहे कीं, आपल्या डबक्याचें सार्वजानिक समुद्रांत विसर्जन ( रूपांतर ) करणें होय.

—नवजीवन, हिं. न. जी. २–४–२८ पृष्ठ १९०.

## स्वदेशी : आत्यंतिक.

"आत्म्याच्या दृष्टीनें स्वदेशीचा अंतिम अर्थ साऱ्या स्थूल संबंधांपासून आत्यंतिक मुक्ति हा होय. देह सुद्धां त्याला परदेशी आहे"

—येरवडा जेल, ७–१०–३०.

## नम्रता.

"नम्रतेचा अर्थ अहंभावाचा आत्यंतिक नाश"

—येरवडा जेल, ७–१०–३०.

"नम्रतेचा गुण अहिंसेचा एक अंश समजला जातो. जेथें अहंकार आहे तेथें नम्रतेची न्यूनता आहे. अहंकारी सर्वात्मभाव ठेवूं शकत नाहीं.......शून्यवत् होऊन राहाणें नम्रतेची पराकाष्ठा होय."

## शरीर-श्रम.

"शरीरश्रम मनुष्यमात्राला अनिवार्य आहेत.......भाकरीकरितां प्रत्यक मनुष्याला हातपाय हालविले पाहिजेत, हा ईश्वरी नियम आहे.... मालक-मजूर हा भेद सर्वव्यापक झाला आहे. गरीब श्रीमंतांची असूया करतात. जर सर्व आपली भाकरी मिळविण्याकरितां मेहनत करतील तर श्रेष्ठ-नीचतेचा भेद दूर होऊन जाईल.......ज्याला अहिंसेचें पालन करावयाचें आहे, सत्याची आराधना करावयाची आहे, ब्रह्मचर्य स्वाभाविक बनवावयाचें आहे त्याला शरीरश्रम रामबाण आहे.

—येरवडा जेल, ६-९-३०.

## आळस.

"......जो सत्य आणि अहिंसेचा उपासक आहे, भारत आणि जीवमात्राची सेवा करूं इच्छितो, तो सुस्त राहूं शकत नाहीं. जो वेळेचा नाश करतो तो सत्य, अहिंसा आणि सेवा यांचाहि नाश करतो."

—गांधीसेवासंघ संमेलन, सावली, ३ मार्च ३६.

"......आळस ही एक प्रकारची हिंसा आहे."

—तृतीय गांधीसेवासंघ संमेलन, हुदली १९३४-३७.

## अस्पृश्यता.

"......अस्पृश्यता स्वतःच एक असत्य आहे. असत्याचें समर्थन कधीं सत्यानें झालें नाहीं. जसें सत्याचें समर्थन असत्यानें होऊं शकत नाहीं आणि जर होत असलें तर तें स्वतःच असत्य होतें."

—ह. से. २३-९-३९.

## धार्मिक सहिष्णुता.

"......या वेळीं या गोष्टीची आवश्यकता नाहीं कीं, सर्व धर्म एक बनले पाहिजेत. तर या गोष्टीची आहे कीं, भिन्नभिन्न धर्मांचे अनुयायी

आणि प्रेमी यांनीं परस्पर आदरभाव आणि सहिष्णुता राखली पाहिजे. आपण सर्व धर्मांना एका मृतवत् सपाटीवर आणूं इच्छीत नाहीं, तर विविधतेमध्यें एकता इच्छीत आहोंत. पूर्वपरंपरा, तसेच आनुवंशिक संस्कार, जल, वायु आणि इतर आजूबाजूच्या गोष्टी उन्मूलित करण्याचा प्रयत्न केवळ असफलच होणार नाहीं, तर अधर्म्य होईल. सर्व धर्मांचा आत्मा एक आहे. तो भिन्नभिन्न आकृतींमध्यें मूर्तिमान् होतो आणि ही गोष्ट कालाच्या अंतापर्यंत कायम राहील. याकरितां जो बुद्धिमान् आहे, तो नुसत्या कलेवरावर लक्ष न देतां भिन्न भिन्न आकृतींमधील असलेल्या आत्म्याचें दर्शन घेईल."

—१९-४-२४. यं. इं. हिं. न. जी. २८-९-१९२४.

## सर्वधम-समभाव.

"......सर्व धर्म ईश्वरदत्त आहेत, परंतु ते मनुष्यकल्पित होण्यामुळें अपूर्ण आहेत. ईश्वरदत्त धर्म अगम्य आहे. मनुष्य तो भाषेनें प्रगट करतो. त्याचा अर्थ सुद्धां मनुष्य लावतो. कोणाचा अर्थ खरा मानावयाचा? सर्व आपापल्या दृष्टीनें जोंपर्यंत ती दृष्टि आहे तोंपर्यंत खरे आहेत. परंतु सर्वांचें खोटें असणें सुद्धां असंभवनीय नाहीं. यामुळेंच आपण सर्व धर्मांबाबतींत समभाव राखला पाहिजे. यामुळें आपल्या धर्माविषयीं उदासीनता उत्पन्न होत नाहीं. तर स्वधर्मविषयक प्रेम अंधप्रेम न राहतां ज्ञानमय होतें......सर्व धर्मांविषयीं समभाव आल्यावरच आपले दिव्यचक्षु उघडूं शकतात. धर्मांधता आणि दिव्यदर्शन यांमध्यें उत्तर-दक्षिणे इतकें अंतर आहे."

—येरवडा जेल. २३-९-३०.

## परस्पर-सहिष्णुता : आचारधर्माचें सुवर्णसूत्र.

"आचारधर्माचें सुवर्णसूत्र परस्परसहिष्णुता होय. कारण कीं, आपण सर्व एकाच तऱ्हेनें विचार करूं हें असंभवनीय आहे. आपण तर आपल्या विभिन्न दृष्टिकोनांतून सत्याला अंशतःच पाहूं शकतों. सदसद्विवेकबुद्धि सर्वांना एकच वस्तु होऊं शकत नाहीं. यामुळें ती व्यक्तिगत आचरणाला फार चांगली पथप्रदर्शक निःसंशय आहे. पण त्या आचारधर्माला, बलपूर्वक सर्व लोकांवर लादणें हा व्यक्तिमात्राच्या बुद्धिस्वातंत्र्यांत अक्षम्य आणि असह्य हस्तक्षेप आहे."

— सर्वोदय. १९३८.

## उपवासाचें रहस्य.

"......मानसिक अवस्थाच सर्व कांही आहे हें मी जाणतों. ज्याप्रमाणें प्रार्थना एकाद्या पक्ष्याच्या कलग्वाप्रमाणें भक्तिशून्य होऊं शकते, त्याप्रमाणेंच उपवास म्हणजे शारीरिक कष्टाशिवाय अधिक कांहीं होऊं शकत नाहीं......ज्याप्रमाणें प्रार्थनेच्या केवळ गायनानें कंठ चांगला होऊं शकतो. परंतु आत्म्यावर दोहोंचाहि कांहीं परिणाम होणार नाहीं.

परंतु जेव्हां पूर्ण आत्म-प्रकाशनाच्या हेतूनें उपवास केला जातो, जेव्हां शरीरावर आत्म्याचें प्रभुत्व प्रस्थापित करण्याच्या हेतूनें उपवासाचा उपयोग केला जातो, तेव्हां त्याचा ( उपवासाचा ) मनुष्याच्या प्रगतीमध्यें महत्त्वपूर्ण उपयोग होतो."

—यं. इं. हिं. न. जी. १५-२-२२ पृष्ठ २१५.

## उपवास.

"उपवास सत्याग्रहाच्या शस्त्रागारांतील एक महान् शक्तिशाली अस्त्र आहे. तें प्रत्येकजण कांहीं चालवूं शकत नाहीं. केवळ शारीरिक योग्यता ही कांहीं याकरितां पात्रता नव्हे. ईश्वरावर जिती-जागती श्रद्धा नसेल तर दुसरी पात्रता अगदीं निरुपयोगी आहे. विचाररहित मनोदशा अथवा केवळ अनुकरणवृत्तीनें तो ( उपवास ) कधींहि करतां नये. तो तर आपल्या अंतरात्म्याच्या आंतून प्रेरित झाला पाहिजे."

—ह. से. २५-३-३९. पृष्ठ ४४.

## सत्याग्रह आणि उपवास.

"राजकीय लढ्याचें एक अंग या नात्यानें उपवास पुष्कळांना नापसंत आहे.......पण त्याचें कारण हें एक नवीन शस्त्र आहे हेंच होय.

......मरणांतिक उपवास हें सत्याग्रहाच्या कार्यक्रमाचें एक अविभाज्य अंग होय, अशा निश्चित निर्णयावर मी आलों आहें. विशिष्ट परिस्थितीमध्यें सत्याग्रहाच्या शस्त्रागारांतील तें अत्यंत प्रबळ व परिणामकारक शस्त्र होय. पण कोणालाहि योग्य शिक्षणाखेरीज तें शस्त्र वापरण्याची पात्रता येईल असें मात्र नव्हे."

—हरिजन. २६-७-४२.

# ६ साधनापथ

## साध्य-साधनसंबंध.

"......साधन बीज आहे आणि साध्य वृक्ष आहे. म्हणून जो संबंध बीज आणि वृक्षामध्यें आहे, तोच संबंध साधन आणि साध्यांत आहे. सैतानाची उपासना करून मी ईश्वर पूजनाचें फल प्राप्त करूं शकणार नाहीं."

—'हिंदी स्वराज्य' १९०८.

## साधनामध्यें क्रांति.

"......कांहीं लोक मला या युगांतला सर्वांत मोठा क्रांतिकारक मानतात. कदाचित् तें असत्य असेल, तरीहि मी स्वतःला एक क्रांतिकारक—शांतिपरायण क्रांतिकारकच मानतों. असें सांगितलें जातें कीं, शेवटीं साधन हें साधनच आहे. मी सांगतों कीं, शेवटीं साधनच सर्व कांहीं आहे. जसें साधन तसें साध्य. साध्य आणि साधनांत कांहीं अभेद्य भिंत नाहीं. ज्या प्रमाणांत साधनाचें अनुष्ठान असेल त्या प्रमाणांतच ध्येयप्राप्ति होईल हा नियम निरपवाद आहे."

—सर्वोदय, आक्टोबर, ३८.

## साध्य-साधनाचा अभेद्यपणा.

"अहिंसा हें सत्यशोधनाचें अनुष्ठान आहे. अहिंसा आणि सत्य अशा तऱ्हेनें एकमेकांत गुंतलीं आहेत कीं, त्यांना उकलून अलग अलग करणें फारच कठीण आहे. तीं (सत्य आणि अहिंसा) शिक्क्याच्या दोन बाजूंप्रमाणें आहेत, किंवा असेंही म्हणतां येईल कीं, तीं धातूच्या एका गोळ सफाईदार आणि छाप नसलेल्या चक्रीच्या दोन बाजू आहेत. त्यांपैकीं कोणती बरोबर आणि कोणती उलटी आहे हें कोण सांगूं शकेल? तरी सुद्धां अहिंसा साधन आहे आणि सत्य साध्य आहे. साधनाचें साधनत्व यांतच असतें कीं, तें अव्यवहार्य नसावें. यामुळें अहिंसा आपला परम धर्म आहे. जर आपण साधनाचें रक्षण करूं तर आपण आज नाहीं, उद्यां साध्य प्राप्त करूनघेऊंच घेऊं."

—सर्वोदय, नव्हेंबर, ३८.

## दिव्य जीवनधर्म.

" माझा असा अनुभव आहे कीं, विनाशामध्यें सुद्धां जीवन कायम राहतें. म्हणून विनाशापेक्षा श्रेष्ठ असा दैवी शक्तीचा कायदा हा असणारच. अशा कायद्याच्या आधारावरच सुव्यवस्थित समाजाचें अस्तित्व समजूं शकतें आणि जीवन सुसह्य होऊं शकतें. जों जों ह्या कायद्याची मी अंमलबजावणी करीत आहें तों तों मला जीवनांत मजा वाटत आहे. सृष्टीच्या रचनेंत आनंद वाटत आहे. त्याच्यामुळें मला जी शांति मिळत आहे—आणि प्रकृतीचा गूढ भाव समजण्याची शक्ति प्राप्त होत आहे त्याचें वर्णन करणें माझ्या शक्तीपलीकडे आहे.........

जगताचें नियमन प्रेमधर्म करीत आहे. मृत्यु होऊन सुद्धां जीवन शिल्लकच आहे. प्रतिक्षणीं विध्वंस चालू आहे तरी सुद्धां विश्व विद्यमान आहेच. सत्य असत्यावर विजय प्राप्त करीत आहे. प्रेम द्वेषाला पराजित करीत आहे. ईश्वर निरंतर सैतानाचें तोंड आंबट करीत आहे."

—सर्वोदय, वर्ष १ लें, अंक ८ वा

## आध्यात्मिक उन्नति: व्यक्तिगत आणि सार्वजनिक.

"शेजारी दुःखी असताना कोणत्याहि व्यक्तीची आध्यात्मिक उन्नति होऊं शकते, यावर माझा विश्वास नाहीं. मनुष्यमात्राच्या—अतएव प्राणिमात्रांच्या—मूलभूत एकतेवर माझा विश्वास आहे. म्हणून मी हें मानतों कीं, जर एका माणसाची आध्यात्मिक उन्नति होते तर त्याच्याबरोबर साऱ्या जगाची उन्नति होते, आणि एका व्यक्तीचें पतन झालें तर त्या प्रमाणांत जगाचेंहि पतन होतें. सारी मनुष्यजात एक आहे. ईश्वराच्या दृष्टींत सारीं माणसें समान आहेत."

—सर्वोदय, वर्ष १ लें, अंक ७ वा पृष्ठ ३१.

## मनुष्य आणि पशु यांतील अंतर.

"......आपला मानव अवतार याकरितांच झाला आहे कीं, आपल्या हृदयांत जो ईश्वर आहे त्याचा आपण साक्षात्कार करूं शकूं. पशूमध्यें आणि आपल्यामध्यें खरें अंतर हेंच आहे......मनुष्यशरीराबरोबर आपल्याला मनुष्याचें बल म्हणजे अहिंसेचें बलहि मिळालें

आहे. आपण आत्म्याच्या गूढ शक्तीचें दर्शन करूं शकतों, यामध्यें आपली मनुष्यता आहे. मनुष्याचा स्वभाव अहिंसक आहे. ईश्वराचा साक्षात्कार करणें याचा अर्थ हा कीं, आपण भूतमात्रांच्या ठायीं त्याला पाहणें, अर्थातच भूतमात्रांच्या बरोबर ऐक्य साधन करणें. हा माणसाचा विशेष अधिकार आहे, आणि हाच मनुष्य आणि पशूमध्यें भेद आहे."

—गांधीसेवासंघ संमेलन, डेलांग. २५-३-३८.

## दीनसेवेंत ईश्वरदर्शन.

"......दृश्य ईश्वर म्हणजे काय..........गरिबांची सेवा."

—हिं. न. जी. ५-२-२५ पृष्ठ २०९. महिलापरिषदेच्या भाषणांतून.

## सेवा आणि सत्ता.

"आपल्या शुद्ध सेवेच्या बलावर जें पद आणि सत्ता आपल्याला मिळते ती आपल्या हृदयाला उच्च बनविते. जी सत्ता सेवेच्या नावाखालीं केवळ बहुमताच्या जोरावर प्राप्त केली जाते, तें केवळ भ्रमजाल होय."

—यं. इं. हिं. न. जी. १४-९-२४. पृष्ठ ३८.

"......सेवेच्छूला, सत्ता, पद, प्रतिष्ठा याची पर्वा नसते."

—यं. इं. हिं. न. जी. २६-१०-२४. पृष्ठ ८४ .

## सेवा हा माझा धर्मसिद्धांत आहे.

"......माझा धर्मसिद्धांत हा आहे कीं, ईश्वराची आणि त्याकरितां मनुष्यजातीची सेवा करणें. जर एक भारतवासी या नात्यानें भारताची आणि एक हिंदु या नात्यानें भारतीय मुसलमानांची सेवा न केली तर मी ईश्वराची सेवा करूं शकणार नाहीं आणि मनुष्यजातीचीही करूं शकणार नाहीं. ऐच्छिक सेवेचा अर्थ शुद्ध प्रेम."

—यं. इं. हिं. न. जी. २९-१०-२४, पृष्ठ ८४.

## अधिकार आणि कर्तव्य.

"......प्रत्येक धर्मपालनाच्या गर्भस्थानीं अधिकार असतो, आणि अशा प्रत्येक अधिकारप्रयोगांतून कर्तव्य निर्माण होतें. अशा तऱ्हेनें अधिकार आणि धर्म-कर्तव्याचें चक्र चालूच राहातें."

—नवजीवन. हिं. न. जी. २९-८-२९, पृष्ठ १३.

## व्यक्तिगत सेवेची मर्यादा.

"या विषयीं सर्वांत चांगला नियम 'त्यजेदेकं कुलस्यार्थे' या श्लोकांत मिळतो. समाजसेवेला विरोध न होईल इतकी व्यक्तिसेवा करावी. माझा मुलगा आजारी आहे, आई आजारी आहे, किंवा पत्नी आजारी आहे आणि मला लखनौला प्रमुखत्व घ्यावयाला जावयाचें आहे तर मी मुलाला, मातेला, आणि पत्नीला नातेवाईकांच्या स्वाधीन करून निघून जाईन."

—गांधीसेवासंघ संमेलन, सावली, ४ मार्च १९४६.

## योग्य सेवा.

"......ज्यांना सेवेची जरुरी आहे त्यांचीच सेवा करा. ज्याला सेवेची जरुरी नाहीं त्याची सेवा करणें ढोंग आहे. तो तर शुद्ध दंभ होय."

## सर्वग्राही सेवा.

"लोक वाटेल तें बोलोत, सेवेचा कांहीं संप्रदाय बनणें शक्य नाहीं. ती तर सगळ्यांकरितां आहे. ......आपण तर तीस कोटींच्या बरोबर अद्वैत सिद्ध करूं इच्छित आहोंत."

—गां. से. सं. संमेलन, मालिकांदा. (बंगाल) २१-२-४०.

## तेन त्यक्तेन भुञ्जीथाः

"जो जीवनाचा लोभ सोडून जगत आहे तोच जिवंत रहातो."

—सेवाग्राम, २३-२-४२.

## आचरणाचें बल.

"......आचरणाचें बल काय आहे? रामनाम एकच आहे, पण एक मनुष्य रामनाम उच्चार करतो तो प्रभावी होतो, दुसरा होत नाहीं. याचें काय कारण आहे? एकानें तें (रामनाम) आपलेंसें केलें, दुसऱ्यानें तें सतार किंवा दिलरुब्याप्रमाणें केवळ ध्वनि काढला. पोपटाच्या कंठांतून सुद्धां रामनाम निघतें पण त्याच्या तें हृदयापर्यंत थोडेंच जातें. तो तर त्याचें महत्त्व समजतच नाहीं......"

—तिसरें गां. से. सं. संमेलन, हुदली, १७-४-४७.

## शास्त्राचें उच्चारण नव्हे, तर आचरण.

"शास्त्राचा तोंडानें केवळ उच्चार करण्यांत कांहीं फायदा नसून त्याचा आचार करण्यांतच फायदा आहे."

—नवजीवन, हिं. न. जी. १५-९-१९२७ पृष्ठ २७.

## विवाह बंधनें जखडणारा आहे.

"......मोक्षच मनुष्यजीवनाची सार्थकता होय. हिंदु असल्यामुळें मी हें मानतों कीं, मोक्षाचा अर्थ जीवनमरणापासून मुक्ति—ईश्वर-साक्षात्कार. मोक्ष साध्य होण्याकरितां शरीराचें बंधन तुटणें आवश्यक आहे. शरीराचें बंधन तोडणारी प्रत्येक वस्तु पथ्य असून बाकी सर्व अपथ्य होत. विवाह, बंधन तोडण्याच्या ऐवजीं त्याला (शरिराला) अधिक जखडून टाकतो. केवळ एक ब्रह्मचर्यच मनुष्याचीं बंधनें मर्यादित करून त्याला ईश्वरार्पित जीवन व्यतीत करण्याकरितां शक्ति प्रदान करतें."

—हिं. न. जी. २-११-२४. पृष्ठ ९१.

## खरा भक्त.

"......जो भक्त स्तुति अथवा पूजेचा भुकेला आहे, जो मान न मिळण्यानें रागावून जातो तो भक्त नव्हे. भक्ताची खरी सेवा आपण भक्त बनण्यामध्यें आहे."

—हिं. न. जी. १४-६-२८ पृष्ठ ६४१.

## तपस्या जीवनाची सर्वश्रेष्ठ कला.

"—तपस्या जीवनाची सर्वश्रेष्ठ कला आहे."

—हिं. न. जी. १०-२-२४. पृष्ठ. २१२.

## तपाच्या बरोबर श्रद्धेची आवश्यकता.

"जर तपादिकांबरोबर श्रद्धा, भक्ति, नम्रता नसेल तर तपादिक केवळ कष्ट होत. तो शुद्ध दंभ म्हटला पाहिजे."

—हिं. न. जी. १२-१०-२४ पृष्ठ ९५.

## तपश्चर्या आणि श्रद्धा.

" शुद्ध तपश्चर्येच्या बलानें एकटा मनुष्य सुद्धां सर्व जग कंपायमान करूं शकतो, पण त्याकरितां अखंड श्रद्धेची आवश्यकता आहे. "

—हिं. न. जी. ३-१०-२९ पृष्ठ ५४.

## खरी साधुता.

" ......मी असें मानतों कीं, साधुतेवर हक्क सांगतां येत नाहीं. साधुता स्वयंसिद्ध असते. प्रमाण आणि हक्क याची अपेक्षा करणारी किंवा आधार घेणारी साधुता, साधुता नव्हे. "

—हिं. न. जी. ९-७-३१ पृष्ठ १९२.

## मनुष्याची मानसिक स्थिति.

" आपल्या प्रत्येक इच्छेला आपण आवश्यकतेचें नांव देतां कामा नये. मनुष्याची स्थिति तर एकप्रकारें प्रयोगात्मक आहे. त्याच्यांत आसुरी आणि दैवी अशा दोन्ही प्रकारच्या शक्ति आपापले खेळ खेळत आहेत. केव्हांही तो प्रलोभनाला बळी पडणें शक्य असल्यामुळें मनुष्यानें प्रलोभनाशीं झगडत त्याच्या आहारीं न जातां आपला पुरुषार्थ सिद्ध केला पाहिजे. "

—ह. से. ४-४-३६, पृष्ठ ५३.

## संतोषांतच सुख आहे.

" असें आढळून येतें कीं, जीवनाच्या गरजा वाढण्यानें मनुष्याची आचारविचारांत पिछेहाट होते. इतिहास हेंच सांगतो. संतोषांतच मनुष्याला सुख मिळतें. पाहिजे तितकें मिळाल्यानंतरहि जो मनुष्य असंतुष्ट राहतो तो आपल्या संवयींचा गुलामच समजला पाहिजे. आपल्या स्वभावाच्या गुलामीपेक्षां दुसरी मोठी गुलामी आजपर्यंत पाहिली नाहीं. सर्व ज्ञानवंतांनीं आणि सर्व अनुभवी मानसशास्त्र्यांनीं कंठशोष करून सांगितलें आहे कीं, मनुष्य स्वतःचा शत्रु आहे आणि त्याला इच्छा असेल तर तो आपला मित्रहि बनूं शकेल. बंधन अथवा मुक्ति मनुष्याच्या स्वतःच्या हातांत आहे. ही गोष्ट

जशी एकाऱ्या बाबतींत खरी आहे तशी ती सर्वांच्या बाबतींतही खरी आहे. ही युक्ति केवळ साध्या आणि शुद्ध जीवनापासूनच मिळूं शकते."

—सेवाग्राम, ९-१०-४०. ह. से. १९-१९-४० पृष्ठ ३०१.

## नम्रता शक्ति आहे.

"........आंब्याचें झाड जों जों वाढतें तों तों तें झुकतें. त्याप्रमाणें बलवानाचें बल जसजसें वाढत जातें तसतसा तो नम्र होत जातो, आणि ईश्वराचें भय अधिक मानतो."

—हिं. न. जी. ८-६-२४ पृष्ठ ३४९.

## आंतरिक गुणांवर भर.

"......माझा स्वभावच असा बनला आहे कीं, मी माझ्या साऱ्या जीवनभर आंतरिक शक्ति आणि गुण यांच्या वाढीचाच विचार केला आहे. जर आंतील शक्तीचा प्रभाव नसेल तर बाहेरील गोष्टींचा प्रयोग अगदीं निरर्थक आहे."

—यं. इं. हिं. न. जी. ७-९-२४, पृष्ठ २५.

## श्रद्धेची कसोटी.

"......ज्याची आपल्या कार्यावर आणि सिद्धांतावर अविचल श्रद्धा आहे तो दुसऱ्याच्या अश्रद्धेनें अथवा दूर जाण्यानें कां घाबरेल ?... जो श्रद्धावान् असतो तो तर दुसऱ्याची अश्रद्धा पाहून उलट अधिकच दृढ होतो......श्रद्धावान् मनुष्य आपले साथीदार पळालेले पाहून स्वतः सुदृढ होतो आणि सिंहाप्रमाणें एकटा लढून पर्वताप्रमाणें अचल होतो."

—नवजीवन हि. न. जी. २३--११--२४ पृष्ठ ५२.

## माझी चळवळ ईश्वराच्या नांवानें आहे.

"......मी जें सांगूं शकतों तें हेंच कीं, माझी चळवळ नास्तिक नाहीं. ती ईश्वराचा इन्कार करीत नाहीं. ती तर त्याच्या ( ईश्वराच्या ) नांवावर सुरू केली गेली आहे आणि निरंतर त्याची प्रार्थना करीत चालू आहे. होय, ती जनतेच्या हिताकरितां खास सुरू झाली आहे,

परंतु ती जनतेपर्यंत तिच्या ( जनतेच्या ) हृदयांत सत्प्रवृत्तीच्या द्वारें जाऊं इच्छिते."

—यं. इं. हिं. न. जी. २४-८-२४ पृष्ठ २२.

## स्वाभाविक त्याग.

" ......त्यागाला मोठें स्वरूप देण्याची आवश्यकता असत नाहीं. स्वाभाविक त्याग प्रकट होण्यापूर्वी डांगोरा पिटीत नाहीं. तो ( त्याग ) अदृश्य रूपानें येतो आणि कोणाला कळूंही देत नाहीं. तो त्याग शोभायमान असतो आणि कायम राहतो. तो त्याग कोणाला भारभूत होत नाहीं आणि संक्रातक ठरतो."

—नवजीवन हिं. न. जी. ९-४-२५ पृष्ठ २८०.

## त्याग.

" ......प्रेम जो न्याय देतें तो त्याग होय आणि कायदा जो न्याय देतो ती शिक्षा होय. प्रेमिकानें दिलेली वस्तु न्यायाची मर्यादा ओलांडून जाते आणि तरीहि नेहमीं तो जितकी देऊं इच्छितो त्यापेक्षां कमी पडते. कारण तो या गोष्टीकरितां उत्सुक असतो कीं, मी अधिक देईन. आणि जास्त नाहीं म्हणून दुःखी होतो."

—यं. इं. हिं. न. जी. ९-७-२५ पृष्ठ ३८२.

## धर्म ही सेवा आहे, अधिकार नव्हे.

"......धर्म तर म्हणतो—मी सेवा आहें, मला विधात्यानें अधिकार दिलेच नाहींत."

—नवजीवन हिं. न. जी. १५--१०--२५, पृष्ठ ७२.

## शुद्धतम प्रायश्चित्त.

"......जो मनुष्य अधिकारी व्यक्तीसमोर स्वेच्छापूर्वक आपले दोष शुद्ध हृदयानें कथन करतो आणि पुनः ते कधींहि न घडण्याची प्रतिज्ञा करतो तो जणूं काय शुद्धतम प्रायश्चित्तच घेतो."

—हिंदी आत्मकथा, भाग १ ला अध्याय ८, पृष्ठ ३१.

## क्षमेचें रहस्य.

"......क्रोधाचें कारण उपस्थित होऊनहि गुपचुप बसणें, मार खाणें, मार खाऊनहि कांहीं न बोलणें—या समजुतीनें हिंदुस्थानचें मूळ पोखरून टाकलें आहे. भगवान् बुद्धांनीं जेव्हां सांगितलें–अक्रोधेन जिनें कोधं ( म्हणजे अक्रोधानें क्रोधाला जिंकलें पाहिजे ) तेव्हां काय त्यांच्या मनांत असें असेल का कीं, अक्रोध म्हणजे जणुं काय कांहीं न करणें, हातावर हात ठेवून बसून राहाणें ? मला तर असें वाटत नाहीं. असें म्हटलें आहे कीं, 'क्षमा वीरस्य भूषणम्' मग काय ही क्षमा, केवळ निष्क्रिय क्षमा असेल ?—नाहीं. हा अक्रोध, ही क्षमा जेव्हां दयारूपांत प्रगट होते, प्रेमरूप धारण करते, तेव्हां ती शुद्ध क्षमा ठरते......अहिंसा काहीं आळस नाहीं, प्रमाद नाहीं, अशक्ति नाहीं. सक्रियता आहे."

—हिं. न. जी. १९-१-२८ पृष्ठ १७५.

## मृत्युशोक मिथ्या आहे.

"......पुत्र मेला अगर पति मेला तर त्याचा शोक करणें हें मिथ्या आहे, अज्ञान आहे."

—नवजीवन हिं. न. जी ११-६-३१ पृष्ठ १५८.

## दीक्षा.

"......दीक्षेचा अर्थ आत्मसमर्पण आहे. आत्मसमर्पण बाहेरील अवडंबरानें होत नाहीं. ती मानसिक वस्तु आहे."

—नवजीवन हिं. न. जी. १-९-२७, पृष्ठ ११.

## श्रद्धा आणि चरित्र.

"आपल्याला ज्या गोष्टीची आवश्यकता आहे ती म्हणजे निःसीम श्रद्धा आणि तिला अनुप्राणित करणारें निष्कलंक चरित्र हें होय."

—ह. से. २५-८-३३.

## सेवेचा मोह.

"सेवेचाहि मोह होतो. मोह सोडण्यानेंच खरी सेवा होऊं शकते. काय अपंग मनुष्य भक्ति करूं शकत नाहीं ? मनानेंहि सेवा करतां येते."

—ह. से १०-११-३३.

## गजेन्द्रमोक्ष.

"......गजेन्द्रमोक्ष हें केवळ काव्य नसून तें आपल्यासारख्यांना एक आश्वासन आहे. संरक्षणाचें कवच आहे."

—ह. से. १२-१२-३६ पृष्ठ ३३८.

## आध्यात्मिकता ही दुकानांतून खरेदी करण्याची वस्तु नव्हे.

"......आध्यात्मिकता ही अशी कांहीं वस्तु नव्हे कीं, ती वाण्याच्या दुकानावर गेलें आणि पुडी घेऊन चालावयाला लागलें."

—गां. से. सं. सम्मेलन, मालिकान्दा, (बंगाल). २१-२-४०.

## दुसऱ्यांचे दोषांकडे न पहातां पहा.

"......विरोधकांच्या स्वभावांतील उणिवा रज:कणाप्रमाणें क्षुल्लक लेखून गुणविशेषाकडेच पाहणें आणि परगुण परमाणूइतका असला तरीहि तो पर्वताइतका करून दाखविण्यांतच दया आणि प्रेमाची कला आहे."

—ह. से. २७-७-४० पृष्ठ २०६

---

# ७ इंद्रिय-संयम

## विकारांचें दमन.

"......इंद्रियभोग धर्म नाहीं. इंद्रियदमन धर्म आहे. ज्ञान आणि इच्छापूर्वक केलेल्या इंद्रियदमनापासून आत्म्याचा लाभ होतो, हानि होत नाहीं. विषयेंद्रियाचा उपयोग केवळ संततीची उत्पत्ति करण्याकरितां मान्य करण्यांत आला आहे. पण जो संततीचा मोह सोडून देतो, त्याला शास्त्रांनींहि वंदन केलें आहे. या युगांत विकाराचा महिमा इतका वाढला आहे कीं, अधर्माला लोक धर्म मानूं लागले आहेत. विकारांची वृद्धि अथवा तृप्ति यांमध्येंच जगाचें कल्याण आहे अशी कल्पना करणें

महादोषमय आहे असा माझा विश्वास आहे......शास्त्रेंही असेंच सांगतात आणि आत्मद्रष्ट्याचाही असाच स्पष्ट अनुभव आहे. विकारांचें दमन होणें शक्य नाहीं. किंवा ते ( विकार ) दाबण्यांत नुकसान आहे, हें सांगणेंहि अत्यंत हानिकारक आहे."

— नवजीवन हिं. न जी. ८-१०-२५ पृष्ठ ६४.

## संयम हाच एक मार्ग आहे.

"......आपल्या ऋषि-मुनींनीं सांगितलें आहे कीं, अंतर्नाद ( आंतला आवाज ) ऐकण्याकरितां अंतः-कर्ण पाहिजेत, अंतश्चक्षु पाहिजेत आणि ते प्राप्त करण्याकरितां संयमाची आवश्यकता आहे आणि म्हणूनच पातञ्जल योगदर्शनांच्या योगाभ्यासकांना, आत्मदर्शनेच्छूंना पहिला पाठ यमनियम पालन करण्याचा सांगितला आहे. संयमाशिवाय माझ्यापाशीं, तुमच्यापाशीं किंवा इतर कोणाजवळहि दुसरा मार्गच नाहीं."

—नवजीवन, हिं. न. जी. २०-९-२८ पृष्ठ ३९. टॉलस्टॉयच्या जन्मशताब्दिनिमित्त केलेल्या भाषणांतून.

## युवक आणि अङ्कुश.

"......जेव्हां वाफ आपण आपल्याला एका मजबूत पण छोट्याशा पात्रांत कैद करून घेते तेव्हां ती महान् शक्तिशालिनी बनते आणि नंतर ठराविक छोट्याशा मार्गानें निघून अशी प्रचंड गति निर्माण करते कीं, त्यामुळें मोठमोठीं जहाजें आणि भारी वजनदार मालगाड्या चालूं शकतात. त्याप्रमाणें राष्ट्राच्या नवजवानांनींही स्वेच्छेनें आपल्या अमर्याद शक्तीला एका मर्यादेंत आबद्ध करून तिला अङ्कुशांत ठेवणें जरूर आहे. जेव्हां योग्य प्रसंग येईल तेव्हां तिच्या योग्य परिणामाचा आवश्यक उपयोग ते करूं शकतील."

— यं. इं. हिं. न. जी. ३-१०-२९ पृष्ठ ५२-५३.

## संयमहीन जीवन.

"संयमहीन स्त्री अथवा पुरुष अगदीं कुचकामाचे समजावे. इंद्रियांना निरङ्कुश सोडून देणाऱ्यांचें जीवन कर्णधारहीन होडीप्रमाणें आहे, कीं जी निश्चित पहिल्या खडकावर आपटून नष्ट होऊन जाईल."

× × ×

" मला संन्यासी म्हणणें चुकीचें होईल. माझ्या जीवनाचा नियामक आदर्श तर सारी माणुसकी ग्रहण करण्यांत आहे. मीं ती हळू हळू, जसजसा माझ्या जीवनाचा विकास होत गेला तशी प्राप्त केली आहे."

x x x

" मला तर मुळींच संदेह नाहीं कीं, मीं जें साध्य केलें आहे तें प्रत्येक पुरुष स्त्री साध्य करूं शकेल. अट एवढीच कीं, त्यांनीं त्याच प्रयासानें, आशेनें आणि श्रद्धेनें चाललें पाहिजे. श्रद्धाहीन कार्य अतुल खंदकाचा थाग लावण्याचा प्रयत्न करण्यासारखें आहे."

—ह. से. ३–१०–३६ पृष्ठ २६०–२६१.

## कामदेवाची विजययात्रा.

"......गुजरातमध्यें काय आणि दुसऱ्या प्रांतांत काय सर्व जागीं कामदेव सहज तऱ्हेनें विजय प्राप्त करीत आहे ! आजकाल तर त्याच्या विजयांत एक विशेषता ही आहे कीं, त्याला ( कामदेवाला ) शरण गेलेल्या नरनारींनीं त्याला धर्मच मानल्याचें दिसून येतें. जेव्हां एकादा गुलाम आपल्या बेडीला शृंगार समजून पुलकित होतो, तेव्हां असेंच म्हटलें पाहिजे कीं, त्याच्या मालकाचा पूर्ण विजय झाला आहे. अशा तऱ्हेनें कामदेवाचा विजय पाहूनहि माझा इतका विश्वास आहे कीं, हा विजय क्षणिक आहे, तुच्छ आहे आणि शेवटीं नांगी ठेचलेल्या विंचूप्रमाणें निस्तेज होणार आहे...... आजकाल आपलें बाह्याचरण, आमचें वाचन, आमचें विचारक्षेत्र सर्व कांहीं कामाचा विजय सूचित करीत आहे. आपल्याला त्याच्या पाशांतून मुक्त होण्याचा प्रयत्न करावयाचा आहे."

—ह. से. २८–११–३६ पृष्ठ ३२४.

## असत्य आणि व्यभिचार.

"......मी तर असत्याला सगळ्या पापाचें मूळ मानतों आणि ज्या संस्थेंत असत्याचें स्वागत केलें जातें ती संस्था कधींहि समाजसेवा करूं शकत नाहीं, आणि तिचें अस्तित्वहि फार दिवस राहूं शकत नाहीं... व्यभिचारी तीन दोषांचा धनी असतो. असत्याचा अपराध तर तो करतोच

कारण आपल्या पापाला तो लपवून ठेवतो. व्यभिचारदोष तर आहेच आणि दुसऱ्या व्यक्तीचाही तो अधःपात करतो."

—ह. से. २७-२-३७ पृष्ठ १४.

## संतानोत्पत्ति कीं, विषयवासनांची पूर्ति?

"जेव्हां विवाहाचा स्वाभाविक परिणाम जो संतानोत्पत्ति, तो सोडून आपल्या पाशवी विषयवासनेची पूर्ति हाच विवाहाचा सर्वांत मोठा उपयोग मानला जातो, तेव्हांच विवाहाचें पावित्र्य नाहींसें होतें."

—ह. से. २८-३-३५ पृ. ४५.

## हल्लींचे विवाह.

"......आज आपण जे विवाह पहातों ते विवाह नसून विवाहाचें विडंबन आहे. आणि आपण ज्याला भोग म्हणतों तो केवळ भ्रष्टाकार आहे."

× × ×

"......पशुजीवनांत दुसरी गोष्ट होऊं शकते, परंतु मनुष्याच्या विवाहित जीवनाचा हा नियम असला पाहिजे कीं, कोणतींहि पति-पत्नी आवश्यकतेशिवाय प्रजोत्पत्ति करणार नाहींत. आणि प्रजोत्पादनाच्या हेतूशिवाय संभोग करणार नाहींत."

—सां. से. संमेलन, सावली. ६-३-३६.

## विवाहबंधनाचें शैथिल्य.

"......अलीकडे विवाहाची फारच अवहेलना होऊं लागल्याचें मला दिसून येत आहे. समाजाला पोषक अशीं बंधनें सैल करणें खात्रीनें सोपें आहे, पण तितकेंच तें घातकहि आहे. व्यक्तींना त्याचा अनुभव नसेल पण शेवटीं, समाजाला त्यापासून हानिच पोहोंचते. सगळे नियम बंधनरूप असतात. नियमाशिवाय आणि कायद्याशिवाय कोणत्याहि समाजाची संघटना करतां येत नाहीं."

—२९-३-४२ दिल्लीस वार्तांना.

## एकाच्या कृत्याचा सर्वांवर परिणाम.

"......माझा अद्वैतावर विश्वास आहे. माझा माणसाच्या परम आवश्यक एकतेवरहि विश्वास आहे, यामुळेंच मी सर्व जीवधारी यांच्या एकतेवर विश्वास ठेवतों. याच कारणांमुळें माझा असा दृढ विश्वास आहे कीं, एका मनुष्याच्या आध्यामिक लाभानें साऱ्या दुनियेचा लाभ होतो. त्याचप्रमाणें एका माणसाच्या अधःपतनानें त्या प्रमाणांत साऱ्या जगाची अधोगति होते."

— हिं. न. जी. ७–१२–२४, पृष्ठ १३२.

## चुकीची दुरुस्ती.

"चूक करणें माणसाचा स्वभाव आहे. केलेली चूक जाणणें, आणि अशा तऱ्हेनें आचरण ठेवणें, कीं ती चूक परत पुनः होणार नाहीं—हा पुरुषार्थ आहे."

—ह. से. १९–४–३७, पृष्ठ ६३.

---

# ८ धर्म-प्रकरण.

## धर्म, हिंदुधर्म आणि त्याची व्याख्या

### धर्म एक महावृक्ष आहे.

"......धर्म ही साधी रेषा नव्हे तर तो एक विशाल वृक्ष आहे. त्याला असंख्य पानें आहेत. पण त्यांपैकीं दोन सुद्धां पानें एकसारखीं नाहींत. प्रत्येक फांदी निरनिराळी आहे. त्याची एकहि आकृति रेखागणित आकृतीप्रमाणें मोजली मापलेली नसते. असें असून सुद्धां आपल्याला ठाऊक असतें कीं, बीज, फांद्या, आणि पानें एकच आहेत. त्यांत रेखागणिताच्या आकृति सारखें कांहीं नाहीं, तरी सुद्धां वृक्षाच्या शोभेशीं रेखागणित आकृति (शोभे) ची तुलना सुद्धां होऊं शकणार नाहीं. धर्म

ज्याप्रमाणें साधी रेषा नाही त्याप्रमाणें वक्र (रेषा) हि नाही. ती साध्या रेषेच्या पलीकडे आहे, कारण ती बुद्धीपलीकडे आहे. तो (धर्म) अनुभवानेंच जाणला जातो."

—नवजीवन, हिं. न. जी. १०-८-२४, पृष्ठ ४१८.

## धर्माची व्यापकता.

"......मी असें मानतों कीं, धर्मामध्यें आर्थिक, राजनैतिक इत्यादि विषयांचा समावेश आहे. जो धर्म शुद्ध मिळालेल्या द्रव्याचा विरोधी आहे, तो धर्म नव्हे. जो धर्म शुद्ध राजकारणाचा विरोधक आहे तो धर्म नव्हे. धर्महीन द्रव्य त्याज्य होय. धर्महीन राज्यसत्ता राक्षसी होय. अर्थादिकां (पैसा) पासून भिन्न असलेला धर्म अशी कांहीं वस्तुच नाहीं. व्यक्ति अथवा समाज धर्माच्या आधारानेंच जिवंत राहतात आणि अधर्मानें नष्ट होतात. सत्याचा आधार घेऊन केलेला द्रव्यसंग्रह अर्थात् व्यापार, प्रजेचें पोषण करतो. सत्यासत्याची पर्वा न करतां केलेला व्यापार प्रजेचा नाश करतो."

—हिं. न. जी. १०-९-२९ पृष्ठ २८.

## धर्म.

"......धर्म कांहीं संकुचित संप्रदाय नाहीं. केवळ बाह्याचारहि नाहीं. आपली ईश्वरत्वावर अढळ श्रद्धा, पुनर्जन्मावर अविचल विश्वास, सत्य आणि अहिंसेवर संपूर्ण श्रद्धा यांमध्येंच विशाल आणि व्यापक धर्म आहे."

—नवजीवन, हिं. न. जी. ३०-८-२८ पृष्ठ १४ अहमदाबादच्या प्रार्थनासमाजांतील भाषणांतून

## आध्यात्मिक-संबंधविहीन लौकिक संबंध.

"......अध्यात्महीन लौकिक संबंध हा प्राण नसलेल्या शरीराप्रमाणें आहे."

—हिं. आ. क. भाग ५ वा, पृष्ठ ४३३, संस्करण ३९

## धर्म उत्कट श्रद्धेचें नांव आहे.

"......धर्म तर उत्कट श्रद्धेचें नांव आहे. धर्माचें सार—धर्माचें दुसरें नांव अहिंसा आहे. त्यामध्यें ही ताकद आहे कीं, इंग्रजांच्या हातून

त्याची तरवार गळून पडेल, मुसलमानांचा गुंडपणा निष्प्रभ होईल. पतंजलीनें म्हटलें आहे कीं, अहिंसेसमोर हिंसा निकामी होते आणि जर आजपर्यंत असें झालें नसलें तर त्याचें कारण हें आहे कीं, आपली अहिंसा दुर्बलांची आणि भेकडांची होती."

—गां. से. सं. संमेलन, डेलांग. ३०–३–३८.

## विविध धर्म एकमेकांला पूरक असतात.

"माझा हिंदुधर्म सर्वव्यापक आहे. त्यामध्यें कोणत्याहि धर्माचा द्वेष नाहीं, न कोणत्याहि धर्माची अवगणना. सगळे धर्म एकमेकांशीं संलग्न आहेत. प्रत्येक धर्मांत कांहीं विशेषताहि आहे, पण एक धर्म दुसऱ्या धर्मापेक्षां श्रेष्ठ नाहीं. जें एकांत आहे, तें दुसऱ्यांत नाहीं. यामुळेंच एक धर्म दुसऱ्याचा पूरक आहे. तेव्हां एका धर्माची विशेषता दुसऱ्या धर्माच्या विशेषतेला प्रतिकूल होऊं शकत नाहीं. जगांतील सर्वसामान्य सिद्धांताला विरोधी ( सिद्धांत ) असूं शकत नाहीं."

—ह. से. ३१–३–३३ पृ. ३.

## धर्मांच्या एकीकरणाची चावी.

"......जितकें संभवनीय होतें, तितक्या विविध धर्मांचें अध्ययन करून मी या निर्णयावर आलों आहें कीं, जर सर्व धर्मांचें एकीकरण योग्य आणि आवश्यक असेल तर त्या सर्वांची एक महत्त्वाची चावी असली पाहिजे. ती चावी सत्य आणि अहिंसा आहे. ह्या चावीनें जेव्हां मी कोणत्याहि धर्माची पेटी उघडतों तेव्हां मला एका धर्माचें दुसऱ्या धर्माशीं ऐक्य करणें जराहि कठीण वाटत नाहीं. जरी वृक्षाच्या पानाप्रमाणे सर्व धर्म नजरेला निरनिराळे दिसतात, तरी बुंध्याकडे पाहिलें असतां एकच दिसतात."

—ह. से. १३–७–४०, पृष्ठ १७९.

## हिंदुधर्म विकासमान आहे.

"......मला जें हिंदुधर्माचें कांहीं ज्ञान आहे त्यावरून तो समावेशक, व्यापक, सदावर्धमान, आणि परिस्थितीला अनुरूप असें नवीन रूप धारण करणारा असा आहे."

—हिं. न. जी. १७–९–२४ पृष्ठ ५३.

## हिंदुधर्माचें वैशिष्ट्य.

"......माझ्या मतें हिंदुधर्माचें वैशिष्ट्य त्याची सर्वव्यापकता आणि सर्वसंग्राहकता यामध्यें आहे."

—हिं. न. जी. १७-९-२५ पृ. ३४.

## हिंदुधर्म.

"......हिंदुधर्म, जीवनधर्म आहे. त्यामध्यें भरतीओहोटी चालूच आहे. तें जगाच्या नियमाला अनुसरूनच आहे. मूळ रूपानें तर तो एक आहे. पण वृक्षरूपानें तो विविध प्रकारचा आहे. त्यावर ऋतूचा परिणाम घडतो. त्याला पालवी फुटते आणि तो गलितपर्णही होतो. त्याला शरदृतु आहे तसाच उष्णऋतुही आहे. वर्षाऋतूपासूनहि तो वंचित रहात नाहीं. त्याला शास्त्र आहेंहि आणि नाहींही. तो एकाच पुस्तकावर आधारलेला नाहीं. गीता सर्वमान्य आहे, पण ती केवळ मार्गदर्शक आहे......

......हिंदुधर्म गंगेचा प्रवाह आहे. उगमस्थानीं तो शुद्ध आहे. मार्गांत त्यावर मालीन्य चढतें, तरी सुद्धां ज्याप्रमाणें गंगेचें कार्य शेवटीं पोषक असतें त्याप्रमाणें हिंदुधर्मांहि आहे."

—हिं. न. जी. १२-२-२६, पृष्ठ २०८.

x x x

"......ज्याचा ईश्वरावर विश्वास आहे, आणि (त्याचप्रमाणें) आत्म्याचें अमरत्व, पुनर्जन्म, कर्मसिद्धांत, आणि मोक्ष यांवर विश्वास असून जो आपल्या दैनिक जीवनांत सत्य आणि अहिंसेचा अभ्यास करण्याचा प्रयत्न करीत आहे, आणि म्हणूनच अत्यंत व्यापक अर्थानें जो गोरक्षण करतो आणि वर्णाश्रमधर्म समजून त्याप्रमाणें वागण्याचा प्रयत्न करतो तो हिंदु होय."

—यं. इं. १४-१०-२७.

x x x

"......वर्णाश्रमधर्म ही जगाला हिंदुधर्माची अपूर्व भेट आहे. हिंदुधर्मानें आपल्याला भयापासून वांचविलें आहे. जर हिंदुधर्म माझ्या

सहाय्याला आला नसता, तर मला आत्महत्त्येशिवाय कांहीं उपाय नव्हता जगांत रहावयाला उपयुक्त बनविणारी अशी हिंदुधर्म ही एकच गोष्ट आहे आणि म्हणूनच मी हिंदु आहें."

हिं. न. जी. १-१२-२७, पृष्ठ १२०.

x x x

"......हिंदुधर्माची प्रतिष्ठा सत्य आणि अहिंसेवर अवलंबून आहे. आणि त्यामुळें हिंदुधर्म कोणत्याहि धर्माचा विरोधक होऊं शकत नाहीं. जगांतील सर्व प्रतिष्ठित धर्मांची उन्नति होईल आणि त्याद्वारा सर्व जगाची उन्नति होईल असें नित्य आचरण प्रत्येक हिंदुधर्मीयाचें झालें पाहिजे."

—ह. से. २५-३-३९, पृष्ठ ४१.

## ब्राह्मणधर्म-हिंदुधर्माचें दुसरें नांव आहे.

"माझ्या दृष्टीनें ब्राह्मणधर्माचें दुसरें नाव हिंदुधर्म आहे. ब्राह्मण धर्माचा अर्थ 'ब्रह्मज्ञान' आहे, आणि म्हणूनच ज्याच्या द्वारें मनुष्याला ईश्वरदर्शन अथवा आत्मदर्शन होते, त्या ज्ञानाला ब्राह्मणधर्म हें नांव आहे. जर माझा हा अर्थ नसता तर मीं हिंदुधर्माचा कधींच आश्रय केला नसता."

—ह. से. ७-४-३३.

## वर्णधर्म.

"......वर्णधर्मच मनुष्याचा जीवनधर्म आहे. हा विश्वास जसजशीं वर्षांवर वर्षे जात आहेत, तसा माझा वाढत वाढत जात आहे......"

—हिं. न. जी. ३-११-२७, पृष्ठ ८७.

## 'जन्मना' वर्णविभाग.

"माझा 'जन्मना' वर्णविभागांवर विश्वास आहे. जर असें नसतें, तर वर्णव्यवस्थेला कांहीं अर्थच राहिला नसता. वर्णव्यवस्थेचा कांहीं उपयोगहि झाला नसता. केवल शब्दजाल मात्र राहिलें असतें."

—ह. से. १४-४-३३.

## वर्णधर्माचा खरा अर्थ.

" वर्ण खऱ्या अर्थानें धर्म आहे, अधिकार नाहीं. म्हणूनच वर्णाचें अस्तित्व केवळ सेवेकरिताच असूं शकतें, स्वार्थाकरितां नव्हे. म्हणूनच कोणी श्रेष्ठही नाहीं नि कनिष्ठही नाहीं. ज्ञानी असूनहि जो स्वतःला दुसऱ्यापेक्षां श्रेष्ठ मानतो, तो मूर्खापेक्षांहि अतिशय वाईट होय. श्रेष्ठतेच्या अभिमानानें तो वर्णच्युत होतो. हें समजणें आवश्यक आहे कीं, वर्णधर्मांत अशी कांहीं गोष्ट नाहीं कीं, ज्यांत शूद्रांनीं ज्ञानाचा संचय अथवा राष्ट्राचें रक्षण करूं नये. मात्र शूद्रानें आपल्या ज्ञानविनिमयाला अथवा राष्ट्ररक्षण-कार्याला उपजीविकेचें साधन बनवूं नये. ब्राह्मण अथवा क्षत्रियानें सेवा-धर्म आचरूं नये, असेंही नव्हे. पण, सेवाधर्मद्वारें उपजीविका करूं नये. या सहज-स्वाभाविक धर्माचें जर सर्वकाल पालन झालें तर समाजामध्यें आज ( जो ) उपद्रव होत आहे, एकमेकांतली द्वेषपूर्ण प्रतिस्पर्धा वाढत आहे, धनसंचय करण्याकरितां जे कष्ट केले जात आहेत, असत्याचा जो प्रचार होत आहे, आणि जीं युद्धसाधनें तयार केलीं जात आहेत, या सर्व गोष्टी नाहींशा होतील. ह्या व्यवस्थेचें पालन सगळें जग करो अगर न करो, सर्व हिंदु करोत अगर न करोत, पण जितके लोक याप्रमाणें वागतील, त्याचा फायदा जगाला खात्रीनें होईल. माझा विश्वास वाढतच आहे कीं, वर्णधर्मानेंच जगाचा उद्धार होईल. वर्णधर्माचा खरा अर्थ सेवाधर्म आहे. जें कांहीं करावयाचें असेल तें सर्व सेवाभावांनींच केलें गेलें पाहिजे. सेवेंत सौदा कसला ! "

—ह. से २१-४-३३.

## धर्मवचनाची पारख.

" अशा प्रत्येक वचनाला, कीं जें धर्मशास्त्राचें वचन असल्याचें सांगितलें जातें, तें सत्याच्या ऐरणीवर, दयेच्या हातोडीनें ठोकून पाहून घेतलें पाहिजे. आणि जर तें अभंग ठरलें, भंग पावलें नाहीं, तरच तें योग्य समजलें पाहिजे. नाहींतर हजारों शास्त्रवादी असून सुद्धां ' नेति-नेति ' म्हणत रहावें लागेल. "

—ह. से. ९-६-३३.

## हिंदु धर्माची परीक्षा.

" मी या भूमींतील निर्वासितांना सांगतों कीं, हिंदुधर्म आज तराजूंत घातला आहे, आणि जगांतल्या सर्व धर्मांच्याबरोबर त्याची तुलना होत आहे. जी गोष्ट बुद्धीपलीकडे असेल, दयाधर्माच्या बाहेर असेल तिचा समावेश जर हिंदुधर्मात होईल, तर त्याचा ( हिंदुधर्माचा ) नाश निश्चित समजा. "

ह. से. २३-९-३३.

## भागवत धर्म.

"हृदयपरिवर्तन हें मात्र एक भागवतधर्मानेंच होऊं शकेल. हा धर्म संक्रामक आहे. ( हृदयांत ) प्रगट झाल्यावर तो ( धर्म ) कोणालाहि अस्पृष्ट सोडत नाहीं. जेव्हां तो आपल्यापैकीं कोणातहि खरोखर प्रगट होईल, तेव्हां हरिजन आणि सनातनी आपोआपच तो ( धर्म ) जाणतील."

—ह. से. ५-५-३३.

## शास्त्रार्थ हा अंधकूप आहे.

" शास्त्रार्थवाद्याचा पेशा वकीलासारखा आहे. शास्त्रार्थवादी काळयाचें पांढरें आणि पांढऱ्याचें काळें करून दाखवूं शकतात. कोणाला या गोष्टीचा अनुभव नाहीं? पुष्कळसे वेदविवेचक वेदांवरून अनेक गोष्टी सिद्ध करतात. आणि तीच पदवी धारण करणारे दुसरे कितीतरी लोक त्याच्याविरुद्ध गोष्टी तितक्याच जोरानें, त्याच ( वेदा ) पासून सिद्ध करतात. ( म्हणूनच ) मी माझ्यासारख्या सामान्य मनुष्याला सोपा मार्ग सांगतों कीं, जो मीं स्वतः अनुभविला आहे. मीं सर्व धर्मांचा विचार करून सर्वांचा एक लघुत्तम निष्कर्ष काढला आहे. ( मला ) कितीतरी सिद्धांत अचलवत् आढळून आले आहेत. भक्त तुलसीदासानें आपल्या अर्ध्या दोह्यांत सांगितलें आहे कीं—' दया धर्माचें मूळ आहे.' 'सत्याशिवाय दुसरा धर्म नाहीं.' ही सनातन वचनें आहेत. कोणत्याहि धर्मानें ह्या सूत्रांचा अस्वीकार केला नाहीं. अशा प्रत्येक वचनाला, कीं, जें धर्मशास्त्राचें असल्याचें सांगितलें जातें, तें सत्याच्या ऐरणीवर, दयेच्या हातोडीनें ठोकून पाहून घेतलें पाहिजे. आणि मग जर ते अभंग

ठरलें—भंग पावलें नाहीं, तर तें योग्य समजलें पाहिजे. नाहींतर हजारों शास्त्री असून सुद्धां ' नेति—नेति ' म्हणत राहिलें पाहिजे. " अखा " ( एक गुजराथी कवि ) आपल्या अनुभववाणींत म्हणतो, ' शास्त्रार्थ एक अंधकूप आहे. जो त्यांत पडतो तो मरतो. "

—हिं न. जी. २९–६–२४, पृष्ठ २६९.

## गीता.

" ......गीता माझ्या दृष्टीनें शाश्वत मार्ग-दर्शिका आहे. प्रत्येक कार्याकरितां मी गीतेमधून आधार शोधून काढतों. आणि जर (आधार) मिळाला नाहीं तर तें कार्य करीत असतां थांबतों किंवा अनिश्चित रहातों."

—नवजीवन, हिं. न. जी. ३०–७–२५ पृष्ठ, ४०३. देशबंधूंच्या प्रथम श्राद्ध-दिनादिवशीं दिलेल्या प्रवचनांतून.

× × ×

" ......आतां तर तत्त्वज्ञानाकरितां तिला ( गीतेला ) मी सर्वोत्तम ग्रंथ मानतों. "

—हिं. आत्मकथा भाग १, पृष्ठ ७७.

× × ×

" माझ्या बाबतींत तर गीता आचरणाची एक प्रौढ मार्ग-दर्शिका झाली आहे. "

—हिं. आ. क. भाग ४, पृष्ठ २९१.

× × ×

" गीता रत्नांची खाण आहे. "

—यं. इं., हिं. न. जी. २–२–२८.

× × ×

" माझ्या बाबतींत तर गीता जगांतील सर्व धर्मग्रंथांची गुरुकिल्ली झाली आहे. जगांतील सर्व धर्मग्रंथांत अत्यंत गूढतम रहस्यें भरलीं आहेत, तीं सर्व ती ( गीता ) माझ्याकरितां उघडीं करून ठेवीत आहे."

—ह. से. १८–४–४६, पृष्ठ ९३.

## गीता आणि रामायण.

" भगवद्‌गीता आणि तुळशीदासाच्या रामायणानें मला आत्यंतिक शांति मिळते. मी उघड उघड कबूल करतों कीं, कुराण, बायबल, तसेंच जगांतील अन्य धर्मांविषयीं अत्यंत आदरभाव असून सुद्धां श्रीकृष्णाच्या गीतेचा आणि तुळसीदासाच्या रामायणाचा जितका माझ्यावर प्रभाव पडतो, तितका त्यांचा ( कुराण, बायबलादिकांचा ) पडत नाहीं. "

—यं. इं. १९-९-२४.

## रामायण.

" आज मी तुळसीदासाच्या रामायणाला भक्तिमार्गाचा सर्वोत्तम ग्रंथ मानतों "

—हिं. आ. क., पृष्ठ ३६, भाग १ ला

× × ×

" ' रामचरित मानस ' ( तुळसीदास कृत ) हें विचाररत्नांचें भांडार आहे. "

—हिं. न. जी. ५-९-२९ पृष्ठ, २०.

"......रामचरित मानसाचे बाबतींत हें त्रिवार सत्य आहे कीं, त्यानें लाखों-मनुष्यांना शांति मिळाली आहे. जे ईश्वर-विमुख होते ते ईश्वराभिमुख झाले आहेत, आणि आजहि होत आहेत. ' मानसा ' चें प्रत्येक पान भक्तीनें भरलेलें आहे. ' मानस ' अनुभवजन्य ज्ञानाचें भांडार आहे. "

—हिं. न. जी. १०-१०-२९, पृष्ठ ६०.

## महाभारत.

"......माझ्या दृष्टीनें महाभारत मला एक गहन धार्मिक ग्रंथ वाटतों. तें ( महाभारत ) अधिकांशानें एक रूपक आहे. इतिहासाशीं त्याचा कांहीं संबंध नाहीं. त्यांत अशा शाश्वत युद्धाचें वर्णन आहे कीं, जें आपल्या अंतरांत निरंतर चालू असतें. "

—यं. इं., हिं न. जी. ८-१०-२५, पृष्ठ ६०.

"महाभारत तर रत्नांची खाण आहे, त्यांतील गीता एक केवळ सर्वांत अधिक दैदीप्यमान रत्न आहे."

× × ×

"मनुष्याला जर एक अमर प्राणी मानलें तर महाभारत हा त्याचा आध्यात्मिक इतिहास आहे."

× × ×

"आपल्या हृदयांत सत् आणि असत्मध्यें जो एक पुरातन संघर्ष चालू आहे, तो महाभारतकारांनीं या कथानकाच्या द्वारें, एका अमर काव्याच्या रूपात आपल्या समोर मांडला आहे."

—ह. से. ५-९-३६, पृष्ठ २२८.

## तुळसीदास: भारतीय संस्कृतीचे रक्षक.

"......भारताच्या संस्कृतीचें रक्षण करण्यांत तुलसीदासजींनीं अधिक भाग घेतला आहे. तुळसीदासाच्या चेतनामय 'रामचरितमानसा'च्या अभावीं किसानांचें जीवन जडवत् आणि शुष्क बनलें असतें...... तुळसीदासांच्या भाषेंत जी प्राणप्रद शक्ति आहे ती इतरांच्या भाषेंत सांपडत नाहीं."

—हिं. न. जी. ५-५-२९, पृष्ठ २०.

## रामायण आणि महाभारताचा प्रणेता.

"......रामायण आणि महाभारत कविकल्पनांनीं भरलेलीं आहेत. पण त्यांचे रचनाकार कोरे कवि नव्हते, तर खरे कवि अर्थात् ऋषि होते. ते शब्दाचे चित्रकार नव्हते, मानवी स्वभावाचे चित्रकार होते."

सेवाग्राम, २३-२-४२.

## अस्पृश्यता.

"ब्राह्मणधर्माला जें अद्वितीय स्थान प्राप्त झालें आहे, त्याचें कारण ज्ञानानें प्रदीप्त असलेली निःस्पृहता, अंतःकरणाची शुद्धि आणि तीव्र तपस्या......आपल्या आंतरिक परीक्षेची वेळ आहे. आपण मोहांत

मग्न आहोंत. अघोरांतील अघोर अशा अस्पृश्य आणि पापपूर्ण विचारांचे प्रवाह आपल्याला स्पर्श करीत आहेत आणि अपवित्र बनवीत आहेत. अशा स्थितींत आपण आपल्या पवित्रतेच्या घमेंडींत उन्मत्त होऊन, आपल्या बांधवांच्या स्पर्शप्रभावाला राईचा पर्वत बनवतां कामा नये. प्रायः आपण आपल्याच अज्ञानानें, आणि त्याहीपेक्षां आपल्या मोठेपणाच्या अभिमानानें, त्याना आपल्यापेक्षां कमी दर्जाचें समजतों."

—यं. इं., हि. न. जी. ८-१-२२.

## अंत्यज पंखविहीन आहेत.

......"अत्यंजांचे आपण पंख कापले आहेत, आणि त्यांच्या सद्भावना तुडवून टाकल्या आहेत."

—न. हिंदी. २५-५-२४

## 'अंत्यज आपले देव आहेत.'

"......गीता सांगते कीं, देवाला संतुष्ट ठेवलें पाहिजे...देवता कांहीं आकाशांत नाहींत. आपले देव अंत्यज आहेत. आपले देव दुसरे अस्पृश्य आहेत. हिंदुस्थानचे देव, दरिद्री लोक आहेत...दयाधर्माशिवाय असलेला धर्म पाखंड होय. दया, धर्माचें मूळ होय. आणि त्याचा त्याग करणारा ईश्वराचा त्याग करतो. गरिबाचा त्याग करणारा सर्वांचाच त्याग करतो."

—हिं. न. जी. ५-२-२५, पृष्ठ २०९.

## अस्पृश्यता.

"......ज्याप्रमाणें थोड्याशा विषानें लोटाभर दूध बिघडून जातें, त्याप्रमाणें, अस्पृश्यतेनें हिंदुधर्म नाश पावत आहे."

—हिं. न. जी. ३-११-२७, पृष्ठ ८३.

## 'धार्मिक संग्राम.'

"अस्पृश्यतेविरुद्ध संग्राम हा एक धार्मिक संग्राम आहे. हा संग्राम मानवी सन्मानाच्या रक्षणाकरितां आहे. हा संग्राम हिंदुधर्मात प्रभावी

सुधारणा करण्याकरितां आहे. हा संग्राम सनातन्यानी खोदून ठेवलेल्या खड्ड्यांच्या विरुद्ध आहे."

—ह. से. २६–५–३३.

## दलिताविषयींची आत्मीयता सोडणार नाहीं.

"हवे तर माझे तुकडे तुकडे होऊं देत, पण दलिताविषयींची आत्मीयता सोडणार नाहीं."

—ह. से. २–६–३३.

## असत्य पाखंडाची घाण.

"माझ्या अल्पबुद्धीप्रमाणें भंग्याच्या अंगावर जो मळ चढतो तो शारीरिक आहे, आणि तो लगेच साफ होऊं शकतो. पण ज्याच्यावर असला पाखंडाचा मळ चढतो, तो इतका सूक्ष्म आहे कीं, तो साफ करणें फार कठीण आहे. कोणाला अस्पृश्य म्हणावयाचें असेल तर असत्य आणि पाखंडपणा भरलेल्या लोकांना म्हणतां येईल."

—ह. से. २–६–३३.

× × ×

"ज्या प्रथेमुळें हिंदूंचा एक मोठा भाग पशूपेक्षां नीच अवस्थेला जाऊन पोहोंचला आहे, त्या (प्रथे) विषयीं माझ्या रोमारोमांत घृणा पसरत आहे."

— ह. से. ९–६–३३.

---

# ९ कला, काव्य, साहित्य आणि संस्कृति

## कला.

"...मी कलेचीं दोन अंगें मानतों—अंतरंग आणि बाह्यांग! आणि यांपैकी तुम्ही कशावर अधिक जोर देतां, हा प्रश्न आहे! माझ्या मतें

जोंपर्यंत आंतून विकास झाला नाहीं, तोंपर्यंत बाह्यांगाची कांहींच किंमत नाहीं."

× × ×

"सगळ्या कला अंतर्विकासाचा आविर्भावच होत."

× × ×

"......जी कला आत्म्याला आत्म-दर्शन करण्याचें शिक्षण देत नाहीं, ती कला नव्हे."

× × ×

"जो बाह्यांग न पाहतां अंतरंग पाहतो, तोच खरा कलाकार होय."

—नवजीवन. हिं. न. जी. २–११–२४, पृष्ठ ८९

## कलेचें स्वरूप.

"......सर्वोत्कृष्ट कला व्यक्तिभोग्य नसते, तर सर्वभोग्य असते. आणि जेव्हां कला बाह्य साधनापासून अधिकाधिक मुक्त होईल, तेव्हांच ती सर्वभोग्य बनूं शकेल.........ह्या निर्दोष, सर्वभोग्य कलेचें मनुष्याच्या आध्यात्मिक विकासांत फार मोठें स्थान आहे........."

× × ×

"बाह्य साधनावर अथवा इंद्रियज्ञानावर आधारलेल्या कलेंत, जितका आत्मा असतो, तितक्याच अंशानें ती अमृत-कलेसारखी बनते. जीमध्यें आत्म्याचा सर्वस्वी अभाव असेल, ती कला न होतां केवळ कृतिच बनेल, आणि अल्पजीवी ठरेल. अमृतकलेचा अंश ज्यामध्यें अधिक आहे ती मोक्षदायी होय."

-हिं. न. जी. ४–३–२६ पृष्ठ २२९–२३०.

## जीवन सगळ्या कलांपेक्षां श्रेष्ठ.

"......जीवन सगळ्या कलांपेक्षां श्रेष्ठ आहे. मी तर असें समजतों कीं, ज्याला चांगल्या तऱ्हेनें जगावें कसें हे समजतें तोच खरा कलाकार होय. उत्तम जीवनाच्या भूमिकेवांचून कलेचें चित्रण कसें करतां येईल? कलेच्या मूल्याचा आधार जीवन उन्नत बनविणें हा आहे. जीवन हीच

एक कला आहे. कला जीवनाची दासी आहे, आणि जीवनाची सेवा करणें हेंच तिचें काम आहे.......कला ही विश्वांत जाग्रत झाली पाहिजे."

—नवजीवन, हिं. न. जी. १०-२-२४, पृष्ठ २१२ दिलीप कुमार रॉय यांजबरोबर झालेल्या संभाषणामधून.

## कला.

"......माझें नेहमींचें ध्येय कल्याण आहे. ज्या प्रमाणांत कला कल्याणकारी आहे, मंगलकारी आहे, त्या प्रमाणांत ती मला स्वीकार्य आहे. मी तिच्याकडे यूरोपीय दृष्टिकोनांतून पाहूं शकत नाहीं."

× × ×

"......भारतीय कलाकारांनीं आपल्या कलेला मंदिरांत आणि गुहांत प्रकट करून, सार्वजनिक केली आहे."

× × ×

"कलाकार जेव्हा कलेला कल्याणकारी बनवतील, सर्वसाधारण जनतेला ( ती कला ) सुलभ करतील, तेव्हांच कलेला जीवनांत स्थान राहील. जेव्हां कला सर्व लोकांची न राहतां, थोड्याच लोकांची राहते, तेव्हां तिचें महत्त्व कमी होत जातें असें मी मानतों."

—हिं न. जी. २३--११--२४, पृष्ठ १२०.

## भारतीय आणि युरोपीय कला.

"भारतीय कला कल्पनापूर्ण असते, तर युरोपीय कलेंत प्रकृतीचें अनुकरण असतें. यामुळें बहुतेक पाश्चिमात्य कला समजण्याला सोपी असते, पण समजल्यावर ती आपल्याला पृथ्वीला ( ऐहिकतेला ) जखडून टाकील आणि पौर्वात्य कला जसजशी आकलन होईल तसतशी ती आम्हांला ऊर्ध्वगामी करील."

--येरवडा मंदिर. २५-१--३२.

## काव्य.

"......कालाच्या अंतापर्यंत कल्पनाशक्ति अर्थात् काव्य मानवी विकासाकरितां उपयोगी आणि आवश्यक काम जरूर करील."

—हिं न. जी १७-९-२५, पृष्ठ ३०

## कवि आणि काव्य.

"......कवि ज्या ग्रंथाची रचना करतो, त्याच्या सर्व अर्थांची तो कल्पना करीत नाहीं. काव्याची हीच खुबी आहे कीं, ती कवीपेक्षांहि श्रेष्ठ होते. ज्या सत्याचा तो ( कवि ) तन्मयतेमध्यें उच्चार करतो, तें सत्य त्याच्या जीवनांत प्रायः नसतें."

—हिं न जी १५-१०-२५, पृष्ठ ९६.

## कवि.

"......आपल्या अंतरस्थ सुप्त भावना जागृत करण्याचें सामर्थ्य ज्याच्यांत आहे तो कवि होय........."

हिं. आ. क भाग ४ था पृष्ठ ३३३.

## काव्य-साहित्य.

" ......तेंच काव्य आणि तेंच साहित्य अमर राहील कीं, जें लोकांना सुलभतेनें साध्य होऊं शकेल आणि जें तें ( काव्य-साहित्य ) सहज आत्मसात् करूं शकतील."

—हिं. न. जी. २३-११-२४ पृष्ठ १७०

## संगीत.

"..... संगीत जाणणें याचा अर्थ जीवन संगीतमय बनविणें होय. आपलें जीवन संगीतमय ( सुरेल ) नाहीं म्हणून तर आज आपली स्थिति दयाजनक झाली आहे."

हिं. न. जी. ८-४-२६, पृष्ठ २६५,अहमदाबाद येथील राष्ट्रीय संगीत मंडळाच्या दुसऱ्या वार्षिकोत्सव प्रसंगीं दिलेल्या भाषणांतून.

## घाणेरडें साहित्य.

"......कोणताहि देश आणि कोणतीहि भाषा घाणेरड्या साहित्यापासून मुक्त नाहीं. जोंपर्यंत स्वार्थी आणि व्यभिचारी लोक जगांत राहतील तोंपर्यंत घाणेरडें साहित्य लिहिणारे आणि वाचणारेहि राहतील. परंतु अशा साहित्याचा प्रचार जेव्हां प्रतिष्ठित समजल्या जाणाऱ्या

वृत्तपत्रद्वारा होतो, आणि त्याचा प्रचार कला या सेवेच्या नांवावर केला जातो, तेव्हा तें ( साहित्य ) भयंकर स्वरूप धारण करते."

— हिं. न. जी. ६–३–३०, पृष्ठ २२८.

## आधुनिक साहित्याची प्रवृत्ति.

"अत्यंत आधुनिक साहित्य विशेषतः हाच धडा देतें कीं, विषयभोग हेंच कर्तव्य आहे, आणि पूर्ण संयम एक पाप आहे."

—ह. से २१–३–३५ पृष्ठ ३७.

## वृत्तपत्रांचें कर्तव्य.

"......कोणत्याहि वृत्तपत्राचें पहिलें काम हें कीं, लोकांची भावना समजून त्या प्रकट करणें, दुसरें काम जनतेंत ज्या भावनांची जरुरी आहे त्या जागृत करणें, आणि तिसरें काम हें कीं, जनतेंत कांहीं दोष असले तर कोणत्याहि संकटाची पर्वा न करतां बेधडक सर्वांच्या समोर ठेवणें."

—१९०८-'हिंद स्वराज्य' मधून.

## समाचारपत्र.

"......वृत्तपत्राचें संचालन सेवाभावानेंच झालें पाहिजे. वृत्तपत्र ही एक प्रचंड शक्ति आहे. परंतु ज्याप्रमाणें बांध नसलेला जलप्रवाह गांवेंच्या गांवें बुडवितो आणि उत्पन्नांचा नाश करतो, त्याप्रमाणें संयम नसलेली लेखणी सुद्धां सत्यानाश करते. तें दडपण ( लिखाणावर ) जर बाहेरून असलें तर ती ( लेखणी ) संयम नसलेल्या ( लेखणी ) पेक्षां अधिक जहरी होते. आंतील संयमानेंच ती ( लेखणी ) लाभदायक होऊं शकते."

—हिं. आ. क. भा. ४ पृष्ठ ३१८.

## संस्कृतचें ज्ञान आवश्यक आहे.

"....उच्च दर्जाची गुजराथी, हिंदी, बंगाली, मराठी भाषा अवगत असलेल्यांना संस्कृतचें ज्ञान असणें जरूर आहे."

× × ×

## उर्दू ही स्वतंत्र भाषा नाहीं.

"......उर्दूला मीं स्वतंत्र भाषा मानली नाहीं, कारण तिच्या व्याकरणाचा समावेश हिंदीमध्यें होतो......"

—आत्मकथा, भाग १ ला, पृष्ठ २०.

## भारतीय विरोधी पाश्चात्य संस्कृति.

"जगातील कोणत्याहि देशांतील, कोणत्याहि संस्कृतींतील सर्व लोकांत संपूर्णता नाहीं. पण हें निश्चित आहे कीं, भारतीय संस्कृतींची प्रवृत्ति नैतिकतेच्या विकासाच्या बाजूला आहे, आणि पाश्चिमात्य संस्कृति अनैतिकतेला प्रोत्साहन देत आहे, आणि म्हणूनच मीं तिला असभ्यता म्हटलें आहे. पाश्चिमात्य संस्कृति नास्तिक आहे. भारतीय संस्कृति आस्तिक आहे. हिंदुस्थानच्या हितैषींनीं ही गोष्ट नीट समजून, तीवर श्रद्धा ठेवून, ज्याप्रमाणें मूल आईच्या छातीला बिलगून राहतें, त्याप्रमाणें त्यांनीं भारतीय संस्कृतीला सश्रद्ध राहावें."

—१९०८—हिंद स्वराज्य

## आपल्या संस्कृतीचें भांडार.

"माझें हें निश्चित मत आहे कीं, जगातील कोणत्याहि संस्कृतीचें भांडार आमच्या संस्कृतीइतकें भरलेलें नाहीं आणि आपण तें जाणलेलें नाहीं. आपल्याला तिच्या अध्ययनापासून दूर ठेवलेलें आहे. तिची मौलिकता जाणण्याची आणि मानण्याची संधि आपल्याला दिली गेलेली नाहीं. आपण तिच्याप्रमाणें वागण्याचेंहि सोडून दिलें आहे. आचारहीन कोरें बौद्धिक ज्ञान, नटविलेल्या मुडद्याप्रमाणें असतें."

—हिं. न. २–९–२१.

## भारतीय किसानांची संस्कृति.

"......सर्व इतिहासकारांनीं ग्वाही दिली आहे कीं, जी सभ्यता भारताच्या किसानांच्यांत दिसते, ती जगांतील कोणत्याहि शेतकऱ्यांत दिसत नाहीं."

—हिं. न. जी. ५–९–२९ पृष्ठ ३०.

## भारतीय संस्कृतीची गंगा.

" लोकमान्य टिळकांच्या मतें आपली संस्कृति दहा हजार वर्षां-इतकी जुनी आहे. नंतरच्या कांहीं पुरातत्त्वज्ञांनीं तिचा (संस्कृतीचा) अधिक जुनेपणा दाखविला आहे. ह्या संस्कृतींत अहिंसेला परम धर्म मानलें आहे. म्हणून त्याचा परिणाम हा झाला पाहिजे कीं, आपण कोणालाहि शत्रु मानतां कामा नये. वेदकालापासून ही आमची संस्कृति चालत आली आहे. ज्याप्रमाणें गंगेंत अनेक नद्या येऊन मिळतात, त्याप्रमाणें ह्या देशांच्या संस्कृति-गंगेंतही अनेक संस्कृतिरूपी सहाय्यक नद्या येऊन मिळाल्या आहेत. ह्या सगळ्यांचा आमच्याकरितां कांहीं संदेश असलाच तर तो हाच कीं, आपण साऱ्या जगाला आपलें मानावें आणि कोणालाहि आपले शत्रु समजूं नये. "

—ह. से. १-२-४२, पृष्ठ १९.

## आधुनिक तृष्णेचें मूळ.

" आधुनिक संस्कृतीचें सर्वांत मुख्य लक्षण माणसानें आपल्या गरजा अधिकाधिक वाढविणें हें आहे, तर प्राचीन पूर्व संस्कृतीचें लक्षण ह्या गरजा अथवा कामना रोखणें, म्हणजेच त्यावर कठोर नियंत्रण ठेवणें हें आहे. भविष्य आणि ईश्वरीय शक्तीवर सजीव श्रद्धेचा अभाव, हेंच आधुनिक म्हणजे पाश्चिमात्य तृष्णेचें मुख्य कारण होय. पूर्व आणि प्राचीन संस्कृतीच्या संयमाचें मूळ श्रद्धा आणि विश्वासामध्यें आहे. जो कित्येकदां लाचार होऊनही आपल्याला मांगल्य आणि ईश्वरीय शक्ति यांच्या अस्तित्वावर ठेवावा लागतो. "

हिं. न. जी. २-६-२७, पृष्ठ २३४.

---

# १० देशधर्म.

## राजनैतिक आदर्श.

" माझ्या मतें राजनैतिक सत्ता आपलें ध्येय होऊं शकणार नाहीं. ज्या साधनांच्यामुळें जीवनांतील प्रत्येक अंगांत, स्वतःची उन्नति करण्याची

शक्ति जनतेंत येते, त्यापैकीं एक राजनैतिक सत्ता आहे. राष्ट्राच्या प्रतिनिधींच्या द्वारें, राष्ट्रीय जीवनाचें नियमन करणाऱ्या शक्तीचें नांव राजनैतिक सत्ता होय. स्वनियंत्रित राहण्याइतकें राष्ट्रीय जीवन जर पूर्ण झालें तर प्रतिनिधींचीहि आवश्यकता राहणार नाहीं. ती एक सुसंस्कृत अराजकावस्था होईल. त्यामधील प्रत्येक व्यक्ति स्वतःची शासक होईल. तो स्वतः स्वतःचें असें नियमन करील कीं, त्यामुळें शेजाऱ्याच्या हितसंबंधाला बाध येणार नाहीं. या आदर्शावस्थेंत राज्य-संस्थाच राहाणार नाहीं, तर राजनैतिक सत्ता कोठून येणार? याकरिताच 'थोरो' नें म्हटलें आहे कीं, जें सरकार सर्वांत कमी शासन करतें तेंच श्रेष्ठ सरकार होय."

—सर्वोदय, जानेवारी १९३९.

## देशभक्ति.

"माझी देशभक्ति कांहीं अशी एकांतिक वस्तु नाही. ती सर्वव्यापी आहे. दुसऱ्या राष्ट्राला संकटात घालून, लुटून, मोठेपणा मिळवूं इच्छिणाऱ्या देशभक्तीचा त्याग केला पाहिजे. सर्व जीवनव्यापी नसणारा धर्म अगर देशभक्ति माझी नव्हे. मी केवळ मानवप्राण्यांतच बंधुत्व-भावना प्रस्थापित करूं इच्छितों असें नव्हे, तर सकल प्राणिमात्रांत ऐक्य निर्माण करूं इच्छितों. त्या अवस्थेचा अनुभव घेऊं इच्छितों."

—हिं न, जी. ४–४–२९, पृष्ठ २५८.

## प्रांतीयतेचें विष.

"......आपण प्रांतवाद मिटविला पाहिजे. जर आंध्रवासी म्हणूं लागले कीं, आंध्र, आंध्रवासियांकरितां आहे, उत्कलवासी म्हणूं लागले उत्कल, उत्कलवासियांकरितां आहे तर अशा तऱ्हेनें अधिक-प्रांतीयता येत राहील. सत्य तर हें आहे कीं, आंध्र आणि उत्कल या दोहोंनाहि देश आणि जगाकरिता आत्मदानास तयार व्हावयाचें आहे..."

—गांधीसेवासंघ संमेलन, डेलांग, २५ मार्च ३८.

## नीतिशून्य राजनीति.

"मी राष्ट्राच्या डोळ्यांत धूळ फेंकणार नाहीं. माझ्या मतें धर्म-विहीन राजनीति अशी कांहीं गोष्टच नाहीं. धर्माचा अर्थ अश्रद्धा अथवा

अंधश्रद्धा नव्हे. द्वेष करावयाला अथवा लढावयाला लावणारा धर्मच नव्हे, तर उलट विश्वव्यापी सहिष्णुता हाच धर्म. नीतिशून्य राजनीति नेहमींच त्याज्य होय."

—साबरमती आश्रम, २६-११-२४, यं. इं., हिं न. जी. ३०-११-२४, पृ. १२४

## धर्म आणि राजनीति.

"धर्मापासून भिन्न अशा राजनीतीची मी कल्पनाच करूं शकत नाहीं. वस्तुत: धर्म तर आपल्या प्रत्येक कार्यांत आला पाहिजे. येथें धर्म याचा अर्थ विशिष्ट धर्म नव्हे. त्याचा अर्थ—विश्वाच्या नैतिक सुव्यवस्थेवर श्रद्धा."

— ह. से. १०-२-४०, पृ. ४१५.

## खोटी राजनीति.

"......आपण तर तीस कोटींच्या बरोबर अद्वैत सिद्ध करूं इच्छित आहोंत. ज्या वेळीं आपण शून्यवत् बनूं त्याच वेळीं तें शक्य होईल. आपल्याला अधिकार कशाला? सत्तेचें राजकारण खोटें होय. आपण लोकांनां खरें राजकारण दाखविलें पाहिजे. जें काम दुसरे करीत नाहींत पण उलट तृणवत् दृष्टीनें पाहतात, तें रचनात्मक काम आपण करूं."

—गां. से. सं. संमेलन, मालिकांदा (बंगाल) २२-२-१९४० .

## समाजांतून धर्माचें उच्चाटन अशक्य.

"समाजांतून धर्माचें उच्चाटन करण्याचा प्रयत्न करणें म्हणजे वांझेपासून पुत्र निर्माण करण्याप्रमाणें निष्फळ होय आणि जर कधीं तो सफल झाला तर त्यांत समाजाचा नाश आहे."

—ह. से. २८-८-४०

## शरीरबल आणि आत्मबल यांपासून प्राप्त झालेली सत्ता.

"शरीरबलापासून प्राप्त झालेली सत्ता मानवदेहाप्रमाणें असेल तर,

आत्मबलापासून प्राप्त झालेली सत्ता आत्म्याप्रमाणें जरा-हीन आणि अमर राहील."

— सेवाग्राम, २५-१-४२ ह. से १-२-४२.

## खऱ्या स्वराज्याची साधना.

( १ ) खरें स्वराज्य म्हणजे आपल्या मनावर राज्य होय.

( २ ) त्याची चावी सत्याग्रह, आत्मबल अथवा दयाबल आहे.

( ३ ) हें बल उपयोगांत आणण्यासाठीं नेहमीं स्वदेशी वापरणें आवश्यक आहे.

—१९०८ हिंदी स्वराज्य.

## स्वराज्याची व्याख्या.

( १ ) "स्वराज्याचा अर्थ—स्वतः आपल्यावर प्राप्त करून घेतलेलें राज्य.

( २ ) परंतु आपण तर त्याच्या कांहीं लक्षणांची आणि स्वरूपाचीहि कल्पना करून ठेवली आहे. अतएव स्वराज्याचा अर्थ—देशांतील (वस्तूंच्या) आयात आणि निर्यातीवर, सैन्यावर आणि न्यायव्यवस्थेवर जनतेचें पूर्ण नियंत्रण."

( ३ ) परंतु व्यक्तिगत स्वराज्याचा उपभोग आजहि साधुसंत घेत असतील आणि आमचें पार्लमेंट स्थापन झाल्यावरहि कांहीं लोकांच्या मतें तें (खरें) स्वराज्य असणार नाहीं. याकरितां स्वराज्याचा अर्थ—अन्नवस्त्रांची विपुलता. ती इतकी झाली पाहिजे कीं, त्या ( अन्नवस्त्रा शिवाय उपाशी अगर उघडें रहावें लागणार नाहीं.

( ४ ) अशी स्थिति प्राप्त झाल्यावरहि एका श्रेणीचे लोक दुसऱ्यावर जुलूम करूं शकतील—तेव्हां स्वराज्याचा अर्थ असा आहे कीं, त्या अवस्थेंत एकहि बालिकासुद्धां घोर अंधकारांत निर्भयतेनें फिरूं शकेल.

( ५ )…….राष्ट्रीय स्वराज्यांत प्रत्येक गोष्ट सजीव आणि उन्नत असली पाहिजे आणि झाली पाहिजे. याप्रमाणें स्वराज्याचा अर्थ—अंत्यजता आणि अस्पृश्यतेचा पूर्ण नाश !

( ६ ) ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर वादाची पूर्ण समाप्ति.

( ७ ) हिंदु–मुसलमानातील मनोमालिन्याचा पूर्ण नाश. याचा अर्थ असा कीं, हिंदु मुसलमानाचा मान ठेवील आणि त्याच्याकरितां प्राणसुद्धा देईल. त्याचप्रमाणे मुसलमान हिंदूचा मान प्राण पणास लावून ठेवील. मुसलमान गोहत्या करून हिंदूचें अंतःकरण दुखविणार नाहीं, तर उलट आपण स्वतः होऊन गोवध बंद करील आणि हिंदूचें मन दुखविणार नाहीं. त्याचप्रमाणें हिंदु कसलाहि सूड घेणार नाहीं. मशिदीसमोर वाजंत्री वाजविणार नाहीं. आणि मुसलमानाचें हृदय दुखविणार नाहीं, तर उलट मशिदीवरून जात असतां वाजंत्रीं बंद ठेवण्यांत मोठेपणा मानील.

( ८ ) स्वराज्याचा अर्थ—हिंदु, मुसलमान, शीख, पारशी, ईसाई, यहुदी वगैरे सर्व धर्मांचे लोक आपापल्या धर्माचें पालन करूं शकतील आणि असें करीत असतां एक दुसऱ्याचें रक्षण करील आणि एक दुसऱ्याच्या धर्माविषयीं आदर दाखवील.

( ९ ) स्वराज्याचा अर्थ हा आहे कीं. प्रत्येक गाव चोर-डाकूपासून आपलें संरक्षण करण्यास समर्थ होईल आणि प्रत्येक गांव आपल्याकरितां आवश्यक अन्नवस्त्र निर्माण करील.

( १० ) स्वराज्याचा अर्थ—राज्यकर्ते,–जमीनदार आणि प्रजा यांच्यामध्यें मित्रभाव राहील. देशी राज्यकर्ते आणि जमीनदार प्रजेचा छळ करणार नाहींत आणि प्रजा, राजा अथवा जमीनदार यांना त्रास देणार नाहीं.

( ११ ) स्वराज्याचा अर्थ–धनवान् आणि श्रमजीवी याच्यांत परस्पर मित्रता. मजूर योग्य ती मजूरी घेऊन धनवानाकडे खुशीनें मजुरी करील.

( १२ ) स्वराज्य हेंच होय कीं, ज्यामध्यें स्त्रियाना माता आणि भगिनी मानण्यांत येईल. त्यांच्याविषयीं मान आदर प्रगट केला जाईल. त्याचप्रमाणें श्रेष्ठ-कनिष्ठ भेदभाव दूर होऊन सर्व बंधुभगिनी-भावनेनें वर्तन करतील.

—नवजीवन, हिं. न. जी १९–८–२१.

## चौमुखी राज्य.

“ स्वराज्यांत माझ्या मतें कांहीं घोटाळा असतां नये. माझ्या दृष्टीनें स्वराज्य म्हणजे परकीय शासनापासून पूर्ण सोडवणूक आणि पूर्ण

आर्थिक स्वातंत्र्य. ह्याप्रमाणें एका तऱ्हेनें राजकीय स्वातंत्र्य आणि दुसऱ्या तऱ्हेनें आर्थिक स्वातंत्र्य त्याच्या ( स्वराज्याच्या ) दोन बाजू आहेत. त्यापैकीं एक नैतिक आणि सामाजिक. त्याला योग्य अशी दुसरी बाजू धर्म. त्यामध्यें हिंदुधर्म, ईसाई धर्मादि सर्व ( धर्म ) आहेत. आपण याला स्वराज्याची चौकट म्हणूं आणि जर त्याच्यातला एकहि कोंपरा नसला तर तिचें रूप बिघडेल. ह्या राजकीय आणि आर्थिक स्वतंत्रतेला... आपण सत्य आणि अहिंसेशिवाय पोहचूं शकत नाहीं. अधिक स्पष्ट भाषेत सांगावयाचें म्हणजे ईश्वरावर जिवंत श्रद्धा आणि त्याकरितां नैतिक म्हणजे सामाजिक उत्थानाशिवाय पोहचूं शकणार नाहीं."

—— २१-३७.

## अहिंसक स्वराज्य.

"जनतेचें स्वराज्य याचा अर्थ प्रत्येक व्यक्तीच्या स्वराज्यातून निर्माण झालेलें जनसत्तात्मक राज्य. असें राज्य प्रत्येक व्यक्तीच्या एक-नागरिकत्वाच्या रूपात आपल्या धर्माचें पालन करण्यातच उत्पन्न होतें.

x x x

"स्वराज्यात राजापासून प्रजेपर्यंत एकहि गोष्ट अविकसित आहे, असें असतां नये. त्यामध्यें कोणी कोणाचा शत्रु नसेल, जो तो आपापलें काम करील, कोणी निरक्षर राहणार नाहीं. उत्तरोत्तर सर्वांच्या ज्ञानाची वृद्धि होत राहील. साऱ्या प्रजेत कमींत कमी रोगराई राहील, कोणीहि दरिद्री असणार नाहीं. परिश्रम करणाऱ्याला योग्य काम मिळेल. त्यामध्यें जुगार, चोरी, मद्यपान आणि व्यभिचार असणार नाहीं. वर्गकलह असणार नाहीं. धनिक आपल्या द्रव्याचा विवेकपूर्वक उपयोग करतील. भोगविलास वाढविणार नाहींत अगर अतिशय संचयहि करणार नाहींत. असें होतां नये कीं, मूठभर धनिक सजविलेल्या महालात राहतील आणि हजारों अथवा लाखों लोक हवा आणि प्रकाशविरहित कोठडींत राहतील."

x x x

"......अहिंसक स्वराज्यांत कोणीहि कोणाच्या योग्य अधिकारांत ढवळाढवळ करणार नाहीं. त्याच्या उलट कोणी अनुचित अधिकार

वापरूं शकणार नाहीं. जेथील राज्यव्यवस्था व्यवस्थित आहे, तेथें कोणीहि अनुचित अधिकार उपभोगूं शकत नाहीं."

—ह से. १८-३-३९, पृ. ३६.

## पाश्चिमात्य लोकशाही.

"माझ्या मतें पश्चिम देशांतील लोकशाही केवळ तथाकथित आहे. त्यांत खऱ्या लोकशाहीचे कांहीं अंश आणि तत्त्वें अवश्य आहेत. पण ती खऱ्या अर्थानें लोकशाही तेव्हांच होऊं शकेल कीं, जेव्हां ती अहिंसक होईल आणि तीमधील अंदाधुंदी आणि तंटे नाहींसे होतील."

—ह. से. ३-९-३८, पृ. २२८.

## स्वराज्य आणि मृत्युभय.

"स्वराज्याच्या पुष्कळशा व्याख्या मी एकत्र करीत आहें. त्यामध्यें एक व्याख्या ही सुद्धा आहे.—मृत्युभयाचा त्याग."

—हिं न जी. १९-८-२१.

## वज्रहृदयाची आवश्यकता.

"......जोंपर्यंत वज्रहृदय त्याच्या (स्वातंत्र्याच्या) रक्षणाकरितां तयार होणार नसेल तोंपर्यंत स्वातंत्र्य हें अत्यंत दूषित वस्तूप्रमाणें आहे."

—हिं. न. जी. २८-१२-२१.

## दगडाचें शरीर.

"जो आपलें शरीर दगडाप्रमाणे कणखर बनवितो तो एकाच जागेवर बसून सारें जग हालवूं शकतो. दगडाला कोण मारूं शकेल! ......ज्या मनुष्यानें आपल्या शरीराला अशाप्रकारें बनविलें आहे, त्याला ह्या जगांत कोण पराजित करूं शकेल? मनुष्यात दगड आणि देव या दोहोंचा मिलाफ होतो. मनुष्य कोण आहे?—चेतनामय दगड आहे. यामुळेंच आमचें शास्त्र आम्हांला शिकवीत आहे कीं, ज्यानें पूर्णपणे देहदमन केलें आहे—बस्—त्याचा पूर्णपणें विजय होय."

—हिं. न जी. १४-१०-२१

## स्वतंत्रता—अति चंचल स्त्री.

" आपल्या राष्ट्रीय इतिहासाच्या युगांत यांत्रिक बहुमताचें कांहीं काम नाहीं. स्वतंत्रता या जगांत सर्वांत अधिक चचल आणि स्वच्छंदी स्त्री आहे. या जगांत ती सर्वांत मोठी मोहिनी आहे. तिला प्रसन्न करणें अतिशय कठीण काम आहे. ती आपलें मंदिर तुरुंगांत म्हणजे इतक्या उच्चस्थानावर बांधते कीं, तेथें जातां जातां डोळ्यापुढें अंधारी येते, आणि आपण...हिमालयाच्या शिखराप्रमाणें उंचावर असलेल्या मंदिरापर्यंत जाण्याच्या आशेनें कांट्याकुट्यांच्या बिकट मार्गानें रक्तबंबाळ पायानें मजल मारीत असलेले पाहून खदखदा हंसतो. "

—हिं. न. जी १८-१२-२१.

## व्याख्यानबाजी करणाऱ्यांपासून जपून रहा.

" ......व्याख्यानांपासून आणि व्याख्यानबाजी करणाऱ्यांपासून सावध रहा. त्यांच्यापासून दूर रहाणें चांगलें होय. "

—हिं. न जी. २५-५-२४

## साम्राज्यवाद.

" जगावरचें आजचें सर्वांत मोठें संकट तर साम्राज्यवाद आहे. दिवसेंदिवस तो सर्वव्यापी होत आहे. "

—हिं. न जी. २४-८-२४.

## हल्लींच्या शासनप्रणालींची विशेषता.

" ......या प्रणालींचें सर्वांत मोठें वैशिष्ट्य काय आहे? ती परोपजीविनी आहे, आणि राष्ट्रीय जीवनाच्या अपवित्रतेवर पोसली जाते, त्यापासून स्वतःकरितां पोषणसामुग्री ग्रहण करते. "

—हिं. न. जी. १४-९-२४.

## अहिंसेची शुभ्र कला.

" कॉंग्रेसच जगांतील सर्व संस्थांत खऱ्या जीवनाचा एकच उत्तम मार्ग खात्रीनें दाखविणारी अत्यंत उपयुक्त संस्था आहे. हिंदुस्थानावरील

सद्यःसंकटानें सावध होऊन जर तिनें जगाला 'रक्त-क्रांती' पासून मुक्तीचा मार्ग दाखविला नाहीं तर तिचा अहिंसात्मक प्रयोग व्यर्थ ठरेल. मानवाचें महत्त्व सर्वनाशाचीं साधनें वाढविण्याच्या क्षमतेंत नसून उलटपक्षीं तें सूड उगविण्याचें नाकारण्यांत आहे. हें पाहून हिंदुस्थाननें जर आपली स्वाभाविक कामगिरी पार पाडली नाहीं तर आज होत असलेला जीवितवित्ताचा अक्षम्य सर्वनाश शेवटचा ठरणार नाहीं. जर पशुत्वपूर्ण अशा अहिंसेच्या काळ्या शक्तीनें लाखो माणसांना तयार करतां येणें शक्य आहे तर धर्मसंस्कारसंपन्न मानवी जीवनाचा दंडकच अशा अहिंसेच्या धवल शक्तींत अधिक (माणसें) तयार करण्याची संभाव्यता आहे, याविषयीं मला कांहींही संदेह नाहीं."

—ह. से. ३०-९-३९.

## लढाईनंतर गरिबांचें प्राधान्य.

"याविषयी बिलकुल संशय नाहीं कीं, या लढाईनंतर धनिकांची सत्ता नाहींशी होणार आणि गरिबाची सत्ता चालणार. पण हवें असलें तर ती शरीरबलानें चालेल अगर आत्मबलानें."

—ह से १-२-४२.

## महायुद्धाचा परिणाम.

"......माझें स्वतःचें असें मत आहे कीं, महाभारतीय प्राचीन युद्धाचा शेवट झाला त्याप्रमाणें या (दुसरें महायुद्ध) भीषण युद्धाचाहि अंत होईल. त्रावणकोरच्या एका विद्वानानें महाभारताला मानव जातीचा शाश्वत इतिहास असें संबोधिलें आहे तें योग्य आहे. त्या महाकाव्यांत जें कांहीं वर्णिलेलें आहे तें आपण आपल्या डोळ्यांसमोर पहात आहोत. युद्धांत सामील झालेलें राष्ट्र दुसऱ्या राष्ट्राला इतक्या अमानुष क्रूरतेनें नष्ट करीत आहे कीं, शेवटीं दोन्ही राष्ट्रें दुर्बल होऊन थकून जाणार आहेत. युद्धाच्या शेवटीं जो जिंकील त्याची, पांडवांची जी स्थिति झाली तशी अवस्था होणार. महाभारतकार सांगतात, अर्जुनासारख्या तोलाच्या गांडीवधारी महारथ्याला शेवटीं चोरांच्या छोट्याशा टोळीनें दिवसा ढवळ्या लुटलें! परंतु या महाप्रलयांतून एका नवविचाराचा उदय होईल

कीं, ज्याची प्रतीक्षा जगांतील कोट्यवधि शोषित स्त्री-पुरुष इतके दिवस करीत आहेत."

—ह. से. १५-२-४२.

## संस्थानिक.

"......संस्थानिकांना स्वतंत्र भारतात सुखाने राहंण्याचा एकच मार्ग आहे आणि तो म्हणजे त्यांनीं युगबल ओळखावें—वेळेच्या 'स्पिरिट'चा त्यांनीं स्वीकार करावा. पुढें होऊन त्याप्रमाणें वर्तन करावें."

—ह. से. २५-२-३९.

## राष्ट्रीय शिक्षा.

"माझें मत असें आहे कीं, शिक्षेची वर्तमान पद्धति खालील तीन महत्त्वपूर्ण गोष्टींत सदोष आहे :—

(१) जिच्यांत भारतीय संस्कृतीचा नामनिर्देश नाहीं अशा पाश्चिमात्य संस्कृतीवर ती आधारलेली आहे.

(२) ती हृदय आणि कृति जाणणारी संस्कृति नाहीं तर ती फक्त वरच्या भपक्याच्या पलीकडे जाऊं शकत नाहीं.

(३) विदेशी माध्यमाच्या द्वारा शिक्षा अयोग्य आहे.

—हिं. न. जी. २-९-२१.

## आमचें विश्वविद्यालय.

"......आपल्या देशाच्या विश्वविद्यालयाचें स्वतंत्र असें वैशिष्ट्य नाहीं, उलट पाश्चिमात्य विश्वविद्यालयाची निस्तेज आणि निष्प्राण नक्कल मात्र आहे आणि आपण जर त्याना पाश्चिमात्य संस्कृतीचा टीपकागद असें म्हटलें तर अयोग्य होणार नाहीं."

—ह. से. १-२-४२.

# ११ सर्वोदयाचा आर्थिक पक्ष

## सर्वोदय.

"......हे खरें आहे कीं, अहिंसेचा पुजारी "जास्तींत जास्त लोकांना जास्तींत जास्त सुख" हा उपयोगितावादी सिद्धांत मानूं शकत नाहीं. तो तर सर्वांचें अधिकाधिक हित साधण्याची कोशीस करील आणि आपलें ध्येय साधण्याच्या प्रयत्नात मृत्यु पत्करील. तो दुसऱ्याला वाचविण्याकरितां स्वतः मरण्यास नेहमी तत्पर राहील. अशा तऱ्हेनें मरण्यात तो दुसऱ्याचीच नव्हे तर स्वतःचीसुद्धा सेवा करील. सर्वांच्या सर्वोच्च हितांत जास्त लोकांचें अधिकतम सुख तर येतेंच. याकरितां एका ठराविक सीमेपर्यंत तो आणि उपयोगितावादी सह-यात्री फार तर राहतील पण एक दिवस असाही येणार आहे कीं, जेव्हां या दोहोंपैकीं एकाला दुसऱ्याची साथ सोडावी लागेल, हेंच नव्हे तर एकाला दुसऱ्याच्या विरुद्ध काम करावे लागेल.

"उपयोगितावादी सिद्धांतात स्वतः स्वतःची आहुति देण्याची सोय बिलकुल नाहीं. पण ब्रह्मवादी स्वतःचेंहि बलिदान करील."

—'सर्वोदय' सप्टेंबर १९३८

## "धनवान्" साम्राज्यशाहीचा खांब आहे.

"अमेरिकेच्या रॉकफेलरपेक्षां भारतीय रॉकफेलर चांगला असें मानणे चूक होईल. खरी गोष्ट अशी आहे कीं, गरीब हिंदुस्थान स्वतंत्र होणें शक्य आहे. पण धनवानांनीं भरलेला हिंदुस्थान स्वतंत्र होणें कठीण आहे."

"......ब्रिटिश राज्य कायम राखणारे हेच लोक होत, कारण त्यांचा स्वार्थ त्यामध्येंच आहे. पैसा माणसाला रंक बनवितो..."

—१९०८ हिंदी स्वराज्य

## 'स्वावलंबनाची मर्यादा.'

"प्रत्येक गोष्टींत आपण "अति सर्वत्र वर्जयेत्" सिद्धांताचा प्रयोग करून पाहिला पाहिजे; कारण मध्यम मार्गच खरा मार्ग आहे. स्वाव-

लंबन, स्व-मान आणि परमार्थाच्या पूर्तीच्या दृष्टीनें जरूर आहे. पण याच्या फार पुढें गेलों तर तें दोषरूप होईल. ईश्वराचें साम्राज्य कबूल करण्याकरितां माणसाला नम्रता आणि आत्महिताच्या साधनाकरितां सन्मानपूर्ण परावलंबन दोन्ही आवश्यक आहेत. हाच सुवर्ण-मध्यम मार्ग आहे. जो याला मोडतो तो "इतो भ्रष्टस्ततो भ्रष्ट" होतो."

—हिं. न. जी. ७-३-२९

## 'खरें अर्थशास्त्र.'

"......'अर्थ' दोन प्रकारचे आहेत. 'परम आणि स्व.' परम अर्थ योग्य आहे. धर्माच्या विरोधी नाहीं. स्व-अर्थ त्याज्य होय. तो धर्म-विरोधी आहे. खादीशास्त्र परमार्थाचें शास्त्र आहे. आणि म्हणूनच खरें अर्थशास्त्रहि आहे."

—हिं. न. जी. १२-९-२९.

## धंदा करण्याचा अधिकार. धनोपार्जनाचा नाहीं.

"......प्रत्येक उद्योगी माणसाला धंदा करण्याचा अधिकार आहे, पण धनोपार्जन करण्याचा अधिकार कोणालाहि नाहीं. खरें म्हटलें म्हणजे धनोपार्जन स्तेय आहे—चोरी आहे. जो आजीविकेपेक्षां अधिक धन घेतो तो कळत अगर नकळत, दुसऱ्याची आजीविका हरण करतो."

—हिं. न. जी. १२-९-२९.

## "दान नव्हे काम."

"जो भुकेला आणि बेकार आहे त्याला भगवान केवळ एकाच स्वरूपांत दर्शन देण्याची हिंमत करूं शकतो. तें स्वरूप काम आणि अन्नाच्या रूपांत वेतनाचें आश्वासन हें होय."

x x x

"उघड्या माणसाला ज्यांची जरूरी नाहीं, असे कपडे देऊन मी त्याचा अपमान करूं इच्छित नाहीं. मी त्याच्या ऐवजीं त्याला काम देईन, कारण त्याची त्याला फार जरूरी आहे. मी त्याचा आश्रयदाता बनण्याचें पाप कधींहि करणार नाहीं. मी त्यांना उष्टें अन्न अथवा वापरलेले कपडे

कधींहि देणार नाहीं. मी त्याला माझ्या चांगल्यांतल्या चांगल्या खाण्यांत आणि कपड्यांत भागीदार करीन आणि त्याच्या कामांत मदत करीन."

x x x

"प्रामाणिक परिश्रम केल्याशिवाय कोणत्याहि निरोगी मनुष्याला फुकट खावयाला देणें हें माझ्या अहिंसेला कधींहि सहन होणार नाहीं. आणि माझ्या हातांत अधिकार आला तर जेथें फुकट जेवण मिळतें असें प्रत्येक सदावर्त अथवा अन्नछत्र मी बंद करीन. त्यामुळें राष्ट्राचा अधःपात झाला आहे. त्यामुळें आळस, सुस्ती, दंभ, तसेंच गुन्हेगारी वाढली आहे."

—सर्वोदय, डिसेंबर १९३८.

## अन्नब्रह्म.

"......कोट्यवधि लोक बेकारीमुळें उत्तरोत्तर अधिकाधिक पतित होत आहेत. त्यांची आत्ममर्यादा नष्ट झाली आहे. आणि त्यांची ईश्वरावर कांहीं श्रद्धा राहिलेली नाहीं. कल्पना करा, किती भयानक संकट आहे! त्यांना ईश्वराचा संदेश ऐकविण्याची हिंमत मी करूं शकत नाहीं. समोर हा जो कुत्रा बसला आहे त्याला ईश्वराचा संदेश ऐकविणें आणि ज्यांच्या डोळ्यांत तेज नाहीं, भाकरीचा एक तुकडा ज्यांचें दैवत आहे, त्यांना ईश्वराचा संदेश ऐकविणें एकसारखेंच आहे. मी पवित्र परिश्रमाचा संदेश घेऊनच त्याना सांगावयाला जाऊं शकतों. सकाळीं मजेदार न्याहारी करून, सुग्रास भोजनाची प्रतीक्षा करीत, बसल्या बसल्या लोकांबरोबर ईश्वरविषयक चर्चा करणें सोपें आहे, पण ज्यांना दोन्ही वेळां उपाशी रहावें लागत आहे, त्यांच्याजवळ मी ईश्वराची चर्चा कशी करूं? त्यांच्या समोर परमात्मा केवळ डाळरोटीच्या रूपांत प्रकट होऊं शकतो."

—सर्वोदय, १५-१०-३१.

## आर्थिक संघटणा.

"माझ्या मतें हिंदुस्थानची आणि जगाची अर्थव्यवस्था अशी झाली पाहिजे कीं, ज्यांत अन्नवस्त्राशिवाय कोणीहि राहूं नये. दुसऱ्या

शब्दांत सागावयाचें म्हणजे प्रत्येकाला आपल्या चरितार्थाकरिता पुरेसें काम मिळालें पाहिजे. जेव्हां जीवनाच्या प्राथमिक आवश्यकता पुऱ्या करण्याच्या साधनांवर जनतेचा अधिकार राहील, तेव्हाच हा आदर्श साध्य होईल. ज्याप्रमाणें ईश्वरानें निर्माण केलेली हवा आणि पाणी सर्वांना सुलभतेनें मिळतात किंवा मिळालीं पाहिजेत, त्याप्रमाणें हीं साधनें सुद्धा सर्वांना सहज मिळालीं पाहिजेत."

—सर्वोदय, जानेवारी १९३९.

## "मागणी आणि पूर्ततेचा आर्थिक सिद्धांत."

"......स्वस्ताई महागाईचा प्रश्न खोटा आहे. मागणी आणि पूर्तीचा कायदा मानवी नाहीं, राक्षसी आहे."

× × ×

"जें नीतीनें चालतें तेंच खरें अर्थशास्त्र. त्यांत अयशस्वी झाळात तरी यशस्वी झालात म्हणूनच समजा."

—गां. से. सं., सावली, ५ मार्च ३६.

## पैशाची विषम विभागणी !

"......जनतेच्या आर्थिक स्थितींत समानता केली पाहिजे. सद्यः-स्थितींत जी एक भयंकर असमानता आहे ती एक अत्यंत वाईट सामाजिक गोष्ट समजून नाहींशी केली पाहिजे. कोणत्याहि स्वास्थ्य असलेल्या समाजांत धडधाकट माणसांजवळ पैसा केंद्रित होणें आणि लाखों बेकार होणें, हा एक महान् सामाजिक अपराधरोग आहे. त्यावर तात्कालिक उपाययोजना झाली पाहिजे."

—सेवाग्राम, ४–६–४०.

## वैभवाची मर्यादा.

".......कमींत कमी श्रम करून जगांतलीं सर्व माणसें समान आणि चांगलें जीवन जगतील या आदर्शाकरितां प्रयत्न करणें म्हणजे, असें समजा आकाशफूल तोडण्याप्रमाणें आहे. चागल्यांतलें चांगलें—जास्तींत जास्त चांगलें म्हणजे वैभवशाली जीवन. समाजाकरितां अशी अमर्याद

कल्पना करणें योग्य नाहीं. जर सर्व मर्यादा सोडल्या तर माणूस कोठें जाऊन थांबणार! याकरितांच याच्या उलट वेदवाक्य आहे.—उच्च विचार आणि साधें जीवन हाच खरा मंत्र. हिंदुस्थानच्या कोट्यवधि लोकांकरितां आपण उत्पन्नाची एक अशी मर्यादा घालूं शकतों कीं, सर्वांना कमींत कमी इतकें मिळालेंच पाहिजे. या आदर्शाप्रत जाण्याची कल्पना करणें शक्य आहे. पण हा आदर्श प्राप्त करण्याकरितां प्रयत्न करणें आवश्यक आहे."

—ह. से. १९-१०-४०.

## आर्थिक समानता.

"......ही गोष्ट अहिंसक स्वतंत्रतेची गुरुकिल्ली आहे. आर्थिक समानता याचा अर्थ पैसा आणि श्रम यांमधील शाश्वत विरोध नाहींसा करणें. याचा अर्थ एका बाजूनें ज्या मूठभर धनिकांच्या हातांत राष्ट्राच्या संपत्तीचा अधिकांश एकत्रित झाला आहे, तो खालच्या थरांत येईल आणि जे कोट्यवधि लोक उपाशी आणि नागडे उघडे आहेत, त्यांचा दर्जा वाढेल. जोंपर्यंत श्रीमंत आणि भुकी जनता या दोहोंतील अंतर अस्तित्वांत आहे, तोंपर्यंत अहिंसक राज्यपद्धति सर्वथा असंभवनीय आहे. नव्या दिल्लींतील राजमहाल आणि गरीब मजुराची झोंपडी यांमध्यें जी विषमता आहे ती स्वतंत्र भारतांत एक दिवसही टिकणें शक्य नाहीं. कारण धनवानांपेक्षां धनाढ्याला जे अधिकार आहेत ते त्या वेळीं गरीबांना असतील आणि संपत्ति अगर संपत्तीपासून प्राप्त होणाऱ्या सत्तेचा त्याग जर खुषीनें केला गेला नाहीं, आणि सार्वजनिक हिताकरितां तिचा (संपत्तीचा) उपयोग केला गेला नाहीं तर हिंसक क्रांति आणि रक्तपात अवश्य संभाव्य आहे. माझ्या 'ट्रस्टीशिप'च्या सिद्धांताची थट्टा केली गेली आहे, तरीसुद्धां माझें मत कायम आहे. हें खरें आहे कीं, ती प्रत्यक्षांत आणणें कठीण आहे, पण अहिंसेची सिद्धि तितकीच कठीण आहे."

—बारडोली १३-१२-४१.

## वर्गयुद्ध.

"......माझा वर्गयुद्धाच्या अस्तित्वावर विश्वास नाहीं हें म्हणणें योग्य नाहीं. ज्या गोष्टीवर मी विश्वास ठेवत नाहीं ती म्हणजे वर्गयुद्धाला उत्तेजन देणें आणि तें चालू ठेवणें. दिवसेंदिवस माझा हा विश्वास वाढतच जात आहे कीं, वर्गयुद्ध न होऊं देणें, पूर्णपणें संभवनीय आहे... श्रमजीविकांनीं आपल्या श्रमाची प्रतिष्ठा ओळखल्यानेंच रुपया-पैशाला योग्य तें स्थान मिळेल......कारण रुपया-पैशापेक्षा श्रमाचें मोल अधिक आहे."

—ह. से. ऑक्टोबर १९३५.

## समाजवाद आणि गांधीसिद्धांत.

[ **प्रश्न :**—आपल्या विचारांत आणि समाजवादांत कोणतें साम्य आणि भेद आहेत ? ]

"समानता पुष्कळ आहे. 'सर्वभूमि गोपाल की' झाली, तर ते मला हवेंच आहे. सर्व संपत्ति जनतेची आहे हें सुद्धां मला मान्य आहे. पण फरक इतकाच आहे कीं, ते लोक समाजसत्तावादाचा प्रारंभ एकसमयावच्छेदेंकरून होईल असें मानतात. मी म्हणतों आपल्या व्यक्तिगत आचारामध्यें लगेच त्याचा ( समाजसत्तावाद ) आरंभ केला पाहिजे. जर आमची श्रद्धा असली तर आपण कमींत कमी स्वतःची तरी संपत्ति समाजाला अर्पण करूं. एक कवडी कोणी स्वतःजवळ जोपर्यंत ठेवील तोंपर्यंत तो समाजवादी ह्या अभिधानास योग्य नाहीं. ते कायद्यानें कार्य साधूं इच्छितात. कायद्यांत अधिकार पाहिजे. आज ते ( समाजवादी ) सर्वांना सांगूं शकत नाहीत, याचें कारण त्यांच्या वाणींत अधिकार नाहीं, ते असमर्थ साधक आहेत. कम्युनिस्ट–समाजवादी–जबरदस्ती करूं इच्छितात, पण ते दुर्बळ आहेत. मी डेमोक्रॅट–जनसत्तावादी आहें."

—गां. से. सं., सांवली, ४ मार्च १९३६.

## समाजवाद आणि गांधीवाद यांतील अंतर.

"समाजवादी आणि मी यांत हा फार मोठा भेद आहे. त्याचा हा सिद्धांत आहे कीं, साऱ्या जगाला आपल्या विचाराचें बनवायचें आणि

सर्व लोक मिळून हें करावयाचें कीं, त्याच्या योजनेंत एकेकानें आपल्या आचरणांत (समाजवादाचें तत्त्व) आणावयाचें, असा प्रकार नाहीं. अहिंसेचा मार्ग हा नाहीं. त्याचा (समाजवादाचा) प्रारंभ व्यक्तिगत आचारानें होऊं शकतो......"

—गां. से. सं. डेलांग २६-३-३८.

[ **प्रश्न**:—आपण यंत्राच्या सर्वस्वी विरुद्ध आहात ना ? ]

" ......कसें होय म्हणूं ? माझें शरीरसुद्धां एक अत्यत नाजूक यंत्र आहे असें जोंपर्यंत मी समजतों, तोंपर्यंत मी यंत्राचा विरोधक होऊन कोठें राहूं शकतों ?......माझा विरोध यंत्राबरोबर फैलावलेल्या वेडेपणाला आहे, यंत्राला नाहीं. परिश्रम वाचविण्याच्या यंत्रांच्या संबंधात लोकांत जो वेडेपणा आहे, त्याला माझा विरोध आहे. परिश्रम वांचविण्याच्या प्रकाराची मर्यादा येथपर्यंत गेली आहे कीं, शेवटीं हजारोंना भुकें मरावें लागत आहे आणि त्यांना शरीर झांकावयालाही कांहीं मिळत नाहीं. मलाहि परिश्रम आणि वेळ यांचा बचाव अवश्य करावयाचा आहे, पण तो मूठभर लोकांकरिता नाहीं, तर सगळ्या मानवसमाजाकरितां हवा आहे.

वेळ आणि परिश्रमाचा बचाव करून, मूठभर माणसे धनाढ्य होऊन बसतात. हें मला असह्य होतें. मला तर हें हवें आहे कीं, प्रत्येकाच्या वेळेची आणि परिश्रमाची बचत होईल, सर्वांना खायला मिळेल आणि सर्वोदय होईल. हीच माझी महत् आकाक्षा आहे. आज यंत्रांमुळें लाखोंच्या पाठीवर मूठभर माणसें स्वार होऊन बसलीं आहेत आणि त्याना त्रास देत आहेत. कारण हीं यंत्रें चालण्याच्या मुळाशीं लोभ आहे, धनतृष्णा आहे, जनकल्याणाची भावना नाहीं."

x x x

[ **प्रश्न** :—तर, बापूजी, आपण यंत्राच्या दुरुपयोगाच्या विरुद्ध आहांत, सदुपयोगाच्या विरुद्ध नाहीं ? ]

......" हो, पण त्या बाबतींत सुद्धां आपण सर्व व्यवस्थित समजून घ्या. तें धनप्राप्तीचें साधन प्रथम दूर केलें पाहिजे, तरच यंत्राचा सदुपयोग होईल. आणि कामगारांच्यावर असह्य बोजा राहणार नाहीं. तर ते केवळ

काम करणारे न राहतां, माणूस बनतील. मग खुशाल यंत्र, कल्याण-साधक होऊं दे! मी त्याचा सर्वथा नाश करूं इच्छित नाहीं. मी केवळ मर्यादा घालूं इच्छितों."

× × ×

[प्रश्न:—काय? या विषयाच्या शेवटपर्यंत जाऊन सुद्धा सर्व यंत्रें अनिष्टकारी आहेत हें सांगावें लागणार नाहीं!]

"कदाचित् सांगावें लागेल. कारण जोंपर्यंत यंत्र माणसावर कुर-घोडी करीत नाही, तोंपर्यंत सहन करावयाला हरकत नाहीं. कांहीं यंत्रें उपयोगी राहतीलही. सिंगरची शिवण्याची मशीन कोणींहि घ्यावी, अत्यंत उपकारक वस्तूंपैकीं ती एक आहे. किती प्रेमशौर्यपूर्ण कथा तिच्या (सिंगर मशीनच्या) शोधाच्या मुळाशीं आहे! सिंगरनें ज्या वेळीं त्याची पत्नी सारा दिवस वाक-वाकून, डोळे ताणून, हळू हळू टांके देऊन, थकून जाते आहे हें पाहिलें तेव्हां त्याच्या हृदयाला तें दृश्य लागून राहिलें, आणि शेवटीं आपल्या प्रेमशक्तीच्या बलावर त्यानें शिवण्याची मशीन शोधून काढली. त्यामुळें त्यानें केवळ आपल्या पत्नीचीच मेहनत बचा-वली एवढेंच नव्हे, तर उलट जो जो ती विकत घेईल त्याचीहि मेहनत वाचेल."

[प्रश्न:—पण जर आपण अशा मशीनचा स्वीकार केला तर आपणास अशी मशीन तयार करणाऱ्या कारखान्याचाही स्वीकार करावा लागेल ना?]

"हो पण असे कारखाने कोणा एकाच्या मालकीचे असणार नाहींत. तर उलट सरकारी मालकीचे होतील इतका 'सोशालिस्ट' मी आहे."

× × ×

## पश्चिमेची स्पर्धा सर्वनाशी आहे.

"पाश्चिमात्य लोकांच्या साधनांच्या द्वारा पश्चिम देशाच्या बरोबर स्पर्धा करणें म्हणजे आपल्या हातानें आपला सर्वनाश करणें होय हें आपण जाणलें पाहिजे. याच्या उलट जर आपण हें ओळखलें कीं, या युगांत सुद्धां जगत् नैतिक बलावर टिकून राहिलें आहे, तर आपण अहिं-

सेच्या असीम शक्तीवर अढळ श्रद्धा ठेवूं शकूं आणि ती प्राप्त करण्याचा प्रयत्न करूं शकूं."

—हिं. न. जी. ५-९-२९.

## गांवांचा सर्वनाश.

"आपल्या समोर जें कांहीं होत आहे तें आपण पहात आहोंत. पिठाच्या छोट्या छोट्या गिरण्या, हातचक्क्या, तेलाच्या गिरण्या, गांवाच्या मुसळांना आणि ग्रामीण साधनादिकांना विलुप्त करीत आहेत. ग्रामीण श्रमजीविकेचीं साधनें अशा प्रकारें नाहींशीं होण्यानें ग्रामवासी कंगाल होत आहेत आणि धनवान् अधिक श्रीमंत होत आहेत. फार काल जर हा क्रम चालू राहिला तर आणखी दुसऱ्या कोणत्याहि प्रयत्नाखेरीज गांवाचा नाश होईल!"

—ह. से. २०-६-३६.

## मूळ ओत.

"साऱ्या गोष्टी चरख्यापासून निघाल्या आहेत. माझ्या प्रवृत्तीच्या ग्रहमालेंतील तो (चरखा) सूर्य आहे."

—२१-२-४०.

---

# १२ चरखा-खादी

## अपंग म्हणजे भगवंताचें दर्शन.

"......मला सर्व गोष्टींत चरखा दिसतो, कारण मी चोहों बाजूला निर्धनता आणि गरिबी पहात आहें. हिंदुस्थानांतील कंगालांना जोंपर्यंत अन्नवस्त्र मिळालें नाहीं, तोंपर्यंत त्यांना धर्म अशी कांहीं गोष्टच जगात नाहीं. ते आज पशूप्रमाणें जीवन कंठत आहेत, आणि त्याला आपण जबाबदार आहोंत. याकरितांच चरखा आपल्या प्रायश्चित्ताचें साधन आहे. भगवान् आपल्याला अपंगाच्या रूपांत नेहमीं दर्शन देतो."

—हिं. न. जी. १०-८-२४ पृ. १४.

## चरखा, माळ, रामनाम एकच.

" ......जेव्हां माळ मला रामनाम जपण्यांत मदत करते तेव्हां ती मी जपतों. आणि माळ जेव्हां विघ्नरूप वाटण्या इतका मी एकाग्र होतों, तेव्हां मी तिचा त्याग करतों. पडल्या पडल्या जर मला चरखा चालविता आला आणि रामनाम घेण्यासाठीं त्याची आवश्यकता वाटूं लागली, तर मी माळेच्या ऐवजीं चरखाच चालवीन. जर माळ आणि चरखा दोन्ही चालविण्याचें सामर्थ्य प्राप्त झालें आणि दोहोंपैकीं काहीं तरी एक पसंत करण्याचा प्रश्न आला, तर जोंपर्यंत भारतांत उपासमार आहे, तोंपर्यंत मी खात्रीनें चरखारूपी माळच पसंत करीन. मी अशा समयाची वाट पहात आहे कीं, जेव्हां रामनामाचा जप करणें सुद्धां एक अवश्य उपाधि होईल. आणि ज्या वेळीं असा अनुभव येईल कीं, ' राम ' उच्चाराच्या पलीकडे आहे, तेव्हां ' नाम ' घेण्याचीहि जरूर राहणार नाहीं. चरखा, माला आणि रामनाम ह्या माझ्या बाबतींत निरनिराळ्या गोष्टी नाहींत. मला तर हीं तिन्ही सेवाधर्माची दीक्षा देत आहेत. सेवाधर्माचें पालन केल्याशिवाय, मी अहिंसाधर्माचें पालन करूं शकत नाहीं, आणि अहिंसाधर्माचें पालन केल्याशिवाय मी सत्याचा शोध करूं शकत नाहीं.आणि सत्याशिवाय धर्म नाहीं. सत्यच राम आहे, ईश्वर आहे, खुदा आहे, अल्ला आहे, गॉड आहे. "

—हिं. न. जी. १०–८–२४.

## चरखा.

"......चरखा तर लंगड्याची काठी आहे. निर्धन, बायाबापड्यांच्या सतीत्वाचें रक्षण करणारा तो किल्ला आहे. "

—हिं. न. जी. १०–८–२४.

## खादी.

"......स्वराज्याप्रमाणें खादीहि राष्ट्रीय जीवनाला श्वासाइतकी आवश्यक आहे. ज्याप्रमाणें आपण स्वराज्याला सोडूं शकत नाहीं त्याप्रमाणें खादीलाहि सोडूं शकत नाहीं. **खादीचा त्याग करणें याचा अर्थ भारतीय जनता विकून टाकणें, भारतवर्षाचा आत्मा विकून टाकणें !** "

—हिं. न. जी. १९–१०–२८ पृष्ठ १७३.

## चरखा अहिंसेचा प्रतीक आहे.

"......महाभारतात एकलव्याची कथा आहे. तें नीरस काव्य नाहीं. त्यांत सत्य आहे. मृत्तिकेंत ( मातींत ) चैतन्य नसतें, मूर्तीत सामर्थ्य नसतें. पण एकलव्याला द्रोणाचार्यांची मूर्ति माती नव्हती. त्या ( मूर्ती ) मध्यें तो ( एकलव्य ) साक्षात् गुरु द्रोणाचार्यांना पहात होता. त्याची अखंड श्रद्धा कां फलभूत झाली नाहीं ? आणि आपण चरख्यावर अशी श्रद्धा ठेवूं शकलों तर आमच्या बाबतींतहि तो प्राणमय प्रतिमारूप बनेल. म्हणून आपण त्याकरितां सगळी संकल्पशक्ति आणि हृदय लावूं या. चरखा तर आपल्या बाबतींत अहिंसेचें प्रतीक आहे. खरी गोष्ट मूर्ति नाहीं तर दृष्टि आहे. एका दृष्टीनें संसार सत्य आहे, दुसऱ्या दृष्टीनें ईश्वरच एकमात्र सत्य आहे. आपापल्या दृष्टीनें दोन्ही गोष्टी सत्य आहेत. जर आपण आपल्या प्रतीकांत ईश्वरसाक्षात्कार अनुभवूं शकलों तर तेंहि सत्य होतें."

## चरखा माला आहे.

"......एकाग्रतेकरिता चरखाच माझी माला आहे."

—गांधीसेवासंमेलन, हुदली. २०-४-३७.

## खादीचें अर्थशास्त्र.

"......खादीचें अर्थशास्त्र सामान्य अर्थशास्त्रापेक्षा भिन्न आहे. सामान्य अर्थशास्त्राची रचना प्रतिस्पर्धेच्या तत्त्वावर झाली आहे. आणि त्यांत स्वदेशप्रेम, भावना आणि मानवता याचा फारच थोडा भाग आहे —नव्हे मुळींच नाहीं, तर खादीच्या अर्थशास्त्राची रचना स्वदेशप्रेम, भावना आणि मानवता या तत्त्वावर झाली आहे."

—ह. से. ३०-७-३८ पृ. १८९

## चरखा अहिंसेचें प्रतीक.

"मी तर सविनयभंगापेक्षां चरख्याला अहिंसेचें अधिक चांगलें प्रतीक मानतों."

x x x

## चरखा संकल्पाचें बल.

" चरखा तर जड वस्तु आहे. त्यामध्यें शक्ति संकल्पानें येते. आपण ती साध्य करूं. मातींत काय असतें? पण कोणी एक भक्त मातीची गोळी बनवितो आणि संकल्प करतो कीं, त्यांत भगवान् शंकर आहे. तेव्हां तीच माती कामधेनु बनते. नुसत्या मातींत काय आहे? दुसरा माणूस तिला उचलून फेकून देईल! मातींत शंकर नाहीं. श्रद्धाच शंकर आहे."

—गांधीसेवासंमेलन, वृन्दावन ३–५–३९.

## मंत्रांत शक्तीची भावना.

" माझ्या बाबतींत तर चरखा अहिंसेची प्रतिमा आहे. त्याचा आधार, मीं सांगितलेंच आहे कीं, संकल्प हा आहे. रामनामाची सुद्धां हीच गोष्ट आहे. रामनामांत कांहीं स्वतंत्र शक्ति नाहीं. ती कांहीं क्विनाईनची गोळी नाहीं. क्विनाईनच्या गोळीत स्वतंत्र शक्ति आहे. यावर कोणी विश्वास ठेवोत अगर न ठेवोत. ती (गोळी) 'अ' ला मलेरिआ झाला तरी उपयोगी आणि 'ब' ला झाला तरी काम देते......राम-नामांत अशी स्वतंत्र शक्ति नाहीं. मंत्रांत संकल्पानें शक्ति येते."

—गां. से. सं. सं. वृन्दावन ५–५–३९.

## चरखा.

" एका इंग्रज महाकवीनें पूर्ण आणि पश्चिम यांमधील विरोधाचें भव्य चित्र काढलें आहे. ज्या वेळीं रोमन साम्राज्य आपल्या सत्तेनें मदांध आणि उच्छृंखल होऊन पूर्वेवर झंझावाताप्रमाणें चढाई करून आलें, तेव्हां पूर्वेनें अप्रतिकार भावनेनें स्वागत केलें. ती (पूर्व) छोट्या रोपट्या प्रमाणें थोडी वांकली. झंझावात नाहींसा झाला आणि परत पूर्व डोकें उंच करून ध्यानावस्थित झाली. माझ्या जवळील चरखा अतीतकालिक पूर्वेच्या या शाश्वत ...... चिन्ह आहे."

— ह से. १३–१–४० पृष्ठ ३८६.

## चरख्याच्या शक्तीचें रहस्य

' ......एक माणूस आहे. तो माला तर जपत आहे, पण त्याचें चित्त वर खालीं चोहोंकडे फिरत आहे, तर ती माला त्याचा अधःपात

करील. तो खोटीच समजूत करून घेतो कीं, मी माला जपत आहें. त्या मालेपासून ईश्वराशीं अनुसंधान होत नाहीं. त्यानें कितीहि माला जपली तरी, तो कोरडाच राहील. त्याच्या अंगुलीला त्रास सुरू होऊं लागतो. त्याची माला नुसती निरुपयोगी नाहीं तर नुकसानकारकहि आहे. कारण तींत दंभ आहे. माला अनेक धर्मांत अनादि कालापासून नामस्मरणाचें साधन मानलें आहे. अशा तऱ्हेने माला जपणारा ईश्वराला फसवितो आणि जगालाहि."

"ही गोष्ट चरखालाहि लागू आहे. चरख्यांत मीं जी सिद्धि मिळविली आहे ती जर तुम्ही मिळवूं शकला नाहीं, जशी माझी श्रद्धा आहे, तशी आपली नसेल तर चरखाच आपला नाश करील......जर यंत्रवत् माला जपण्यात दंभ आहे तर यंत्रवत् चरखा चालविण्यातहि आत्मवंचना आहे."

## चरख्याचा महिमा.

"......ज्याच्या भोवतीं दुसरे सर्व तारे फिरतात त्या मध्यवर्ती सूर्याप्रमाणें चरखा आहे. ओक नांवाच्या वृक्षाचें बीज किती लहान असतें परंतु जेव्हां एकदां त्याचा विस्तार होतो, तेव्हां तो ( ओक वृक्ष ) कित्येक वनस्पतींना आश्रय देतो. जर चरख्याची वृत्ति सर्वत्र पसरली तर फक्त चरखाच तेवढा राहणार आहे. त्याच्या छायेंत असंख्य उद्योगांना स्थान मिळेल. त्याच्या सुगंधानें सारी दुनिया सुगंधित होईल."

"ही खरी गोष्ट आहे कीं, सगळ्या वस्तु चरख्यापासूनच निघाल्या आहेत. ग्रामोद्योगसंघ त्यामधूनच निघाला आहे. अस्पृश्यतानिवारण, आणि 'नई तालीम' त्याचेंच फळ आहे. माझ्या प्रवृत्तीच्या ग्रहमालेचा तोच सूर्य आहे."

—गां. से. सं. सं. मालिकान्दा २१-२-४०.

## अप्रमाणित खादी वि. मिलचा कपडा.

मला एक गुजराथी मित्र लिहितो:—"पुष्कळ राष्ट्रीय संस्थांचा असा आग्रह असतो कीं, त्यांच्या सभासदांनीं व नोकरांनीं खादी धारण केलीच

पाहिजे. एवढेंच नव्हे तर पुस्तकाची बाधणी सुद्धां खादीची पाहिजे. अमुक इतकें सूत दिल्यानंतरच ज्या अर्थी प्रमाणित भांडारांतून खादी मिळते, त्या अर्थी ते लोक साहजिकच अप्रमाणित खादीकडे वळतात. हें ठीक आहे काय? अप्रमाणित खादीपेक्षां गिरणीचा कपडा ठीक नाहीं काय? अप्रमाणित भांडारांतून खादी विकत घ्यावयास लावणारा खादीबद्दलचा आग्रह हें एक खोटेंच निमित्त नव्हे काय?"

"इतर वस्तूंप्रमाणें खादीची टंचाई असतांना पुस्तकबाधणी वगैरेंसाठीं खादीचा आग्रह धरणें अयोग्य आहे. जेव्हां खादी मुबलक होती तेव्हां सर्व बाबींत ती वापरली गेली पाहिजे असा मीच आग्रह धरीत होतों. १९२१ सालीं कॉंग्रेसची सर्व छावणी खादीच्या कपड्याची बनविलेली होती. आज तसा प्रयत्न करणें वेडगळपणाचें होईल. काळ आणि परिस्थिति बदलली कीं, मार्गांत फरक करावा लागतो.

पण अप्रमाणित खादी विरुद्ध गिरणीच्या कापडाचा लेखकानें घेतलेला कैवार माझ्या लक्षांत येत नाहीं. अप्रमाणित खादी म्हणजे काय? ती अप्रमाणित असली तरी हातानें कातलेली व विणलेली नाहीं काय? त्यांत लबाडी असते ही गोष्ट दुसरी. प्रमाणित खादी सुद्धां शंभर नंबरी शुद्ध असते अशी ग्वाही चरखासंघ देऊं शकत नाहीं. लबाडी-विरुद्ध रामबाण उपाय नाहीं ही गोष्ट सदा सर्वकाळ सारखीच सत्य आहे. अप्रमाणित खादीचे दोष जगजाहीर आहेत. तिच्यांत कांतणारांना किंवा मजुराना अमुक इतकी मजुरी दिली पाहिजे हें ठरलेलें नसतें. ती विकणारे वाटेल तितका नफा मारतात. चरखासंघाच्या भांडाराच्या केवळ दोषामुळें हीं अशीं पुष्कळशीं दुकानें काढण्यांत येतात. पण लबाडी नसेल तर हाताने कातलेल्या व हातानें विणलेल्या सर्व प्रकारच्या कपड्याला 'खादी' म्हटलें पाहिजे. स्वतःच्या हातानें सूत काढून स्वहस्तें विणलेला कपडाहि कायदेशीर भाषेंत प्रमाणित नाहीं; पण खादीच्या अत्युच्च व अतिशुद्ध अर्थानें ती खादी आहे. म्हणून स्वतःच्या श्रमानें तयार केलेला कपडा सोडून मनुष्य गिरणीचा कपडा वापरूं लागल्यास तो गुन्हा ठरेल.

मथितार्थ हा कीं, गिरणीच्या कपड्याचा त्याग कायम ठेवला पाहिजे. अप्रमाणित खादी शक्य तितकी टाळावी. पण प्रमाणित खादी

मिळत नसेल व गिरणीचा कपडा व हातसुताची अप्रमाणित खादी ह्यांच्यांतच निवड करण्याचा प्रसंग असेल तर अशा अप्रमाणित खादीला पसंती दिली पाहिजे. अर्थात् ती शुद्ध आहे हें येथें गृहीत आहे. आपल्या स्वतःच्या श्रमानें काढलेल्या खादीचा निषेध तुमची इच्छा असल्यास खुशाल करा. पण प्रमाणित खादीपेक्षांहि ती अधिक शुद्ध खादी आहे, ही जी वस्तुस्थिति आहे ती बदलूं शकत नाहीं. आणि सर्वच लोक जर आपल्या गरजांपुरतें कापड विणलें जाईल इतकें कांतूं लागतील तर चरखासंघाची आवश्यकता तरी काय? असा दिवस उजाडला तर आकाश आणि पृथ्वी चरखासंघाच्या जयजयकारानें दुमदुमून जातील."

—हरिजनबंधूवरून, नवी दिल्ली. १२-९-४६.

## खादी.

"सध्या लोकांचीं डोकीं ठिकाणावर नाहींत. अशा वेळीं खादीविषयीं कांहीं बोलणें अर्थहीन आहे असें 'हरिजन'च्या वाचकांना वाटलें तर तें ठीकच आहे. कारण, पुष्कळ खादीप्रेमी लोक शहरात राहात आहेत व देवाच्या दयेनें दंगेधोपे अजून तरी शहरापुरते मर्यादित आहेत. सर्वच शहरवासी लोकांचा ह्या मूर्खपणाच्या झगड्यात भाग असतो असें नाहीं आणि खादीप्रेमी लोकांच्या मनात तर शांति कशी स्थापन होईल अशा प्रकारचे विचार आल्याखेरीज राहाणारच नाहींत. खादीला एक तर बहुजनसमाजांत आपण सार्वत्रिक केली पाहिजे किंवा अहिंसात्मक स्वराज्याच्या स्वप्नाला तिलांजलि दिली पाहिजे. म्हणून ज्याचें शांतीवर प्रेम आणि श्रद्धा आहे असे लोक सभोवार केवढेहि जातीय झगडे चालले असले तरी चरख्याला आणि खादीला विसरणार नाहींत. ते आपलें जेवण सोडतील पण चरख्याला सोडणार नाहींत.

म्हणून पुढें दिलेली चरखा-संघातर्फें आलेली विनंति अगदीं योग्य आहे. अशा प्रकारची विनंति खादीप्रेमी संस्थांकडूनहि करण्यांत आलेली आहे. उपयुक्त दृष्टीनें खादीकडे पाहणारे लोक अ. भा. चरखा संघाच्या पुढें दिलेल्या ठरावाप्रमाणें वागतील."

( १ ) चरखा संघाच्या ट्रस्टींची खादीभांडारांना आणि खादी-प्रेमी लोकांनां अशी विनंति आहे कीं, येणाऱ्या ७८ व्या खादीजयंती-साठीं ७८००० साधारण सहकारी मिळविण्याचा आटोकाट प्रयत्न करावा. ह्या सहकाऱ्यांपैकीं अर्धे स्वावलंबी असावे.

( २ ) '**साधारण सहकारी**' म्हणजे सतत खादी वापरणारा व चरखा संघाला आपल्या हाताच्या सुताच्या कमींत कमी ६ गुंड्या वार्षिक देणारा.

( ३ ) '**स्वावलंबी**' म्हणजे केवळ सूत काढून ७॥ गुंड्या किंवा सरकी काढून, पिंजून व पेळू करून ५ गुंड्या नियमितपणें मासिक उत्पन्न करणारा. हें सूत कुटुंबांतील मंडळीचें किंवा मित्रांचें असलें तरी चालूं शकेल. अपवाद—आजारीपण किंवा इतर पुरेसें व अनिवार्य कारण.

( ४ ) चरखा-संघानें असाहि ठराव केला आहे कीं, खादीनिर्माण-केन्द्रांत येथील लोकवस्तीच्या मानानें आणखी एक चौरस वार खादी लोकांनीं वापरली पाहिजे. कमींत कमी इतकें तरी काम झालेंच पाहिजे.

—ह. से. नवी दिल्ली ४–५–४६.

## स्वावलंबी वि. व्यापारी खादी.

"हा प्रश्न निर्माण होण्यास आपण स्वतःच कारणीभूत झालों आहोंत. खादीच्या शास्त्राचें ज्ञान आपल्याला नव्हतें. आजहि आपल्याला त्या शास्त्राचें पूर्ण ज्ञान झालें आहे असें नाहीं. त्यामुळें लहान मुलाप्रमाणें पुनः पुनः पडतझडत आपण चालावयाला शिकत आहोंत. पडलों तरी पुनः उठतांच येणार नाहीं असें तरी पडूं नये, म्हणून आम्ही एक पांगुळ-गाडी मदतीस घेतली आणि अजूनहि तिची मदत आम्ही घेत आहोंत. 'अखिल-भारत-चरखा-संघा'ला ह्या गोष्टीची जाणीव झाली, असल्यानें त्यानें आपलें अस्तित्व सफल करून दाखविण्यासाठीं भगीरथ प्रयत्न केला पाहिजे किंवा नामशेष झालें पाहिजे. अखिल भारत चरखा संघ म्हणजे त्यांतील सर्व कार्यकर्ते—कांतणारे सुद्धां त्यात आले. यांनी ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, कांतणाऱ्याना स्वाश्रयी बनविणें आणि त्यांच्या प्रवृत्तीच्या द्वारें हिंदुस्थानचें स्वातंत्र्य मिळविणें, हें उद्दिष्ट कदा-

चित् आपण साध्य करूं शकणार नाहीं. अशी व्यर्थ चिंता करण्याचें कारण नाहीं. आपलें उद्दिष्ट बरोबर आहे इतकी खात्री असली म्हणजे पुरेसें आहे. एक वेळ काम सुरू करून दिल्यावर चुका होतील, त्या दुरुस्त करीत आपण एक एक पाऊल पुढें टाकत गेलें पाहिजे. हेंच शास्त्रीय पद्धतींतील सारभूत तत्त्व आहे. कोणचेंहि शास्त्र घेतलें तरी तें कांहीं संपूर्ण स्वरूपांत आधीं तयार होऊन आकाशांतून खालीं टपकत नाहीं. सर्व शास्त्रें अनुभवानें विकसित होत होत रचलीं जातात. शास्त्र म्हटलें म्हणजे तें परिपूर्णच असलें पाहिजे असा कांहीं नियम नाहीं. मनुष्य काय किंवा त्यानें निर्माण केलेलें शास्त्र काय—सर्व संपूर्ण असणें केव्हांहि शक्य नाहीं.

हें जर बुद्धीला पटलें व त्याप्रमाणें निर्भयपणें आचरण घडूं लागलें तर पुनः ज्या शंकाकुशंका उत्पन्न केल्या जातात त्यांचें निराकरण करणें सोपें जाईल. कांतणाऱ्याला सुरवातीपासून तों अखेरपर्यंतच्या, म्हणजे विणण्याच्या सुद्धां, सर्व क्रियांचें संपूर्ण ज्ञान असावयास पाहिजे. ह्यांतच स्वराज्याचा मार्ग आहे. समजून म्हणा किंवा न समजून म्हणा, आतांपर्यंत आपण फक्त व्यापारी दृष्टीनें खादीची उत्पत्ति करीत आलों आहोंत. परंतु ह्या खादीचा संबंधहि नेहमीं स्वराज्याच्या ध्येयाशीं जोडला गेला आहे. असें जर नसतें तर व्यापारी खादीहि अयशस्वी झाली असती आणि बहुतेक संभव असाच होता कीं, स्वराज्यासाठीं खादी हें एक नुसतें स्वप्नच राहिलें असतें."

x x x

व्यापारी खादी आमचा पांगुळगाडा होता व आजहि आहे असें म्हणतां येईल. कांतणाऱ्यांनीं दुसऱ्याकडून आपला कापूस पिंजून घेणें हा पांगुळगाड्याच्या जोडीला आणखी एक आधार आतांपर्यंत होता व आजहि आहे. हे असले आधार उत्तरोत्तर आपण जितके सोडून देऊं तितक्या प्रमाणांत स्वराज्याची खादी अस्तित्वांत येईल. ज्या शाखांतून व्यापारी खादी उत्पन्न करण्याचें काम चालतें आणि पिंजण्याचें काम एक स्वतंत्र प्रवृत्ति म्हणून चालविण्यांत येतें, त्या शाखा शक्य तर बंद करून टाकाव्या. परंतु जीवन म्हटलें म्हणजे तेथें व्यवहाराची मुरड

आलीच. म्हणून इतके तरी म्हणण्यास हरकत नसावी कीं, हे आधार लवकरांत लवकर सोडून दिले जावेत. ज्यांचेपाशीं श्रद्धा व ज्ञान आहे ते ह्या कामीं पुढाकार घेतील. जेथें मनःपूर्वक व जोमानें प्रयत्न केले जातील तेथें चढाओढीचा प्रश्नच निर्माण होऊं नये.

जे पोटासाठीं मजूरीनें कातणारे आहेत ते नवीन क्रिया खुशीनें शिकून घेतील कारण त्यामुळें त्यांची कमाई करण्याची शक्ति वाढणार आहे. मजूरीनें कांतणाऱ्यांची संख्या आतां कमी कमी होत चालली आहे. कारण कमाई करण्याचीं इतर व अधिक सुलभ साधनें आज त्यांना उपलब्ध आहेत. ते नैतिक दृष्टीनें ह्या गोष्टीचा विचार करीत नाहींत. सोपा दिसेल तो मार्ग अनुसरतात.

—हरिजनबंधूवरून, नवी दिल्ली ३-४-४६.

## चरखा-जयंती.

"माझा जन्मदिवस व चरखाजयंतीचा दिवस जरी नेहमीं एक असला तरी चरखा-जयंती म्हणजे गांधी-जयंती नव्हे. त्याचे कारण स्पष्ट आहे. प्राचीन काळीं चरख्याचा स्वातंत्र्याशीं कांहींएक संबंध नव्हता. उलट असलाच तर त्याची पार्श्वभूमि गुलामगिरीची होती. गरीब बायांना कोरड्या भाकरीचा तुकडा मिळविण्यासाठीं नाइलाज म्हणून कांतावें लागे. त्या वेळचें सरकार ज्या काहीं कवड्या त्यांच्या अंगावर फेंकी तेवढ्याच त्यांना मिळत! एका विशिष्ट दिवशीं ठाकूर साहेबांनां अक्षरशः गरिबांच्या अंगावर पैसे फेकतांना मीं माझ्या लहानपणीं पाहिलेलें आहे.

सन १९०८ सालीं दक्षिण आफ्रिकेंत मला ही कल्पना सुचली कीं, हिंदुस्थानला परकीयाच्या गुलामगिरीचें जूं फेकून द्यावयाचें असल्यास त्यानें चरख्याला गुलामगिरीचें नव्हे तर स्वातंत्र्याचें प्रतीक मानण्यास शिकलें पाहिजे. त्याचप्रमाणें चरखा हा भाकरीवरील लोण्याप्रमाणें झाला पाहिजे. ज्या दिवशीं स्वातंत्र्याचें व अहिंसेचें प्रतीक असलेल्या चरख्याचें गुंजन हिंदुस्थानांतील प्रत्येक घरांत ऐकूं येईल, त्याच दिवशीं खराखुरा

समारंभ माझ्या मतें साजरा होईल. कांहीं थोड्या किंबहुना एक कोटी स्त्रिया सुद्धां जर अल्पशा द्रव्यप्राप्तीसाठीं सूत कातीत असतील तर त्याना हा समारंभ काय होय? इतकी गोष्ट तर जुलमी सत्तेखालीं सुद्धा होऊं शकेल व जेथें भांडवलवाल्याचें प्रभुत्व तेथें ती घडगत असल्याचे आपण पाहतों. मजुरीच्या रूपानें का होईना जी खैरात मजुरांना वाटली जाते, तिच्या बळावर आज लक्षाधीश टिकून आहेत.

हा उत्सव तेव्हांच खरोखरी करण्याजोगा ठरेल कीं, जेव्हां श्रीमंत आणि गरीब दोघेहि आपण ईश्वराच्या दृष्टीनें समान आहोंत, प्रत्येकानें आपापल्या स्थानीं राहून शरीरश्रमानें भाकरी मिळविली पाहिजे आणि आपल्या स्वातंत्र्याचें रक्षण दारूगोळ्यांनीं किंवा तोफांनीं होणार नसून हातसुतानें काढलेल्या शंकूच्या आकाराच्या कोकड्यांनीं म्हणजेच हिंसेनें नव्हे तर अहिंसेनें—होईल असें समजूं लागतील.

सध्यांच्या जगांतील वातावरणाचा विचार केल्यास हें हास्यास्पद वाटेल. पण आपण जर अंतर्मुख होऊन पाहूं तर हेच सत्य, सनातन सत्य आहे असें आपणास दिसेल. ज्या भावनेनें हे एकनिष्ठ भक्त भारलेले आहेत, तिची जाणीव सर्वांना होवो; त्याच भावनेनें लोक ती साजरी करोत.

—हरिजन २२-९-४६.

## चरख्याचें मधुर गुंजन.

"......चरख्याचें गुंजन मधुर आवाजानें आपणास सांगतें कीं, आम्ही सर्व एक आहोंत, जगांतील पदार्थांचा उपभोग घेण्याचा सर्वांना जन्मतःच सारखा हक्क आहे, कोणी उच्च किंवा कोणी श्रीमंत नाहीं. तरी पण आजचें जग संपत्तिविषयक व उच्च-नीचतेच्या अभद्र विषमतेनें भरलेलें आहे, ही मोठी चूक आहे. गर्वानें ताठर झाल्यामुळें आम्ही सर्व एक आहोंत, भेदभाव माहीत नाहीं, अशा मृत्यूच्या वरवंट्याखालीं एकाच मातींत मिसळणार आहोंत, ही गोष्ट आम्ही विसरतों."

x x x

## चरख्याचा धडा.

"......चरख्याचा दुसरा धडा आपल्या निढळाच्या घामानें आपली भाकरी मिळविणें हा आहे. ह्यालाच 'भाकरीचे शरीरपरिश्रम' असें नांव रशियाच्या एका मोठ्या विद्वानानें दिलें आहे. तिसरा धडा हा कीं, जर आम्ही लोकांतले व त्यांच्याशीं तादात्म्य पावलेले असूं तर ज्यांना अन्नाची गरज नाहीं अशा लोकांना अन्न देण्याचें आपण नाकारलें पाहिजे. आपण असें करूं तर देशांत अन्नाचा तुटवडा पडणार नाहीं व आपणांस पुढें अन्नपदार्थांसाठीं परदेशाच्या तोंडाकडे पहावें लागणारच नाहीं. जे लोक आज खरोखर कांहीं भुकेनें मरत नाहींत अशा लोकांना वीस माणसांचें पोट भरेल इतकें अन्न वांटण्यापेक्षां उपासमारीनें मरणाऱ्या लोकांना तें दिलेलें इष्ट नाहीं काय?"

## चरखाच जगास उद्धरील.

"जगाचा उद्धार करण्याचें सामर्थ्य इतर यंत्रांत नसून साध्या वाटणाऱ्या चरख्यांत आहे.......चरखा चालविणें ही आर्थिक स्वातंत्र्य, समता आणि शांतता यांची सुरवात आहे. सध्या हिंदुस्थानमध्यें पाश्चात्यांकडून यंत्रांची नको इतकी आयात होत असते. अमेरिका, इंग्लंड किंवा रशिया यांचें जर अनुकरण हिंदुस्थानमध्यें सर्वत्र झालें तर परमेश्वर जगाचें रक्षण करो. अहिंसा, चरखा, ग्रामोद्योग, यांच्यावाटे साऱ्या जगांतील मानवी जीवनांत उदात्तपणानें शांतता निर्माण करण्याची कामगिरी हिंदुस्थानला बजवावयाची आहे."

—रॉयटर, न्यूयॉर्क, ता. ३०, 'न्यूयॉर्क पोस्ट' पत्राच्या बातमीदाराला दिलेली मुलाखत.

## सुखमय ध्येय.

"१९१८ सालीं जेव्हां मीं चरख्याचें पुनरुज्जीवन केलें त्या वेळीं गिरणीचा कपडा सोडून विलायती कपडा ६० कोटींचा येत होता. कपड्याची आयातच सर्वांत जास्त होती. त्याच्या खालोखाल साखर १८ कोटी रुपयांची व लोखंडी सामान ७ कोटी रुपयांचें येत होतें. आजच्या वाढत्या किंमतींत सध्यांच्या देशी व विदेशी कपड्याची किंमत ३०० कोटी रुपयांची असावी. एवढा सर्व कपडा आपण हातानें खेड्यांत

काढला तर हिंदुस्थानच्या संपत्तींत ह्या तीनशें कोटी रुपयांची केवढी मोठी भर पडेल! असें झाल्यास खरीखुरी सोन्याची खाण आपल्या हातीं आल्यासारखी होईल व खेड्यांची अभूतपूर्व उन्नति होईल. आज आमचा बहुजनसमाज दारिद्र्यानें गांजलेला आहे व त्याच्या डोळयांत आशेचे किरण किंवा बुद्धीचा प्रकाश दिसत नाहीं. गरीब कातणारे ही जादू करून दाखवितील. त्या कामीं सर्वांना मदत करतां येईल. खादी ओबडधोबड दिसत असली तरी तिच्यांतलें सौंदर्य पाहाण्यासाठीं जाणणारें हृदय व डोळस डोळे पाहिजेत. गिरणीच्या कापडाच्या भपक्याला भुलून जाऊं नका. कारण हिंदुस्थानचें नागवेपण खऱ्या अर्थानें तो केव्हांच झांकूं शकणार नाहीं. आपला नागवेपणा झांकण्याचा एकच उपाय आहे. तो म्हणजे आपलें अन्न आपण उत्पन्न करणें व आपला कपडा आपण निर्माण करणें. हें सुखमय ध्येय जर आपण प्रत्यक्षांत आणूं शकलों तर सर्व जगाचे डोळे तुमच्याकडे लागतील."

—हरिजन २९-९-१९४६.

## हातकताईचें वि. गिरणीचें कापड.

"मद्रासच्या पंत-प्रधानावर (खादी योजनेसंबंधीं) होणारी टीका स्वार्थी आणि अज्ञान-मूलक आहे, असें मला खेदानें म्हणावें लागत आहे.

.........खेडेगांवच्या लोकाचा बिनकामाचा वेळ स्वतःच्या कपड्याला पुरेसें सूत काढण्यासाठीं उपयोगांत आणला जावा हा ह्या योजनेचा निःसंशय हेतु आहे. आपल्या बिनकामाचा वेळ लोकांनीं राष्ट्रीय, उपयोगी व प्रामाणिक काम करण्यांत खर्च करावा ह्यासाठीं त्यांचीं मनें वळविणें किंवा त्यांच्यापासून तशी अपेक्षा राखणें केवळ कल्पनेचा खेळ आहे काय?

......राष्ट्राच्या प्रामाणिक सेवकाना कल्पना-तरंगांत वाहवणारे, हवेंत किल्ले बांधणारे, तत्त्वांध व छांदिष्ट अशीं नांवें ठेवून वाटेस लावणें अशा प्रकारची गंमत सन्मान्य म्हणतां येणार नाहीं. भांडवलवाल्यांनीं व दुसऱ्या सुरक्षित जागा व्यापणारांनीं गरीब खेडवळांच्या विरुद्ध मोर्चेबंदी करून, त्यांना सन्मान्य अशा श्रमानें आपली खराब आर्थिक स्थिति सुधारण्याला प्रतिबंध करूं नये.......लोकशाही सरकारनें लोकशाहीसाठीं हें कार्य हातीं घेतलेलें आहे.

म्हणून जेथें त्याचा प्रयोग होईल तेथें तरी तें लोकप्रिय झालें पाहिजे.

ती एका गृहस्थाची योजना राहतां कामा नये, पूर्ण सरकारची ती योजना पाहिजे.

कायदेमंडळाचा तिला पाठिंबा पाहिजे. तींत सक्तीचा गंध सुद्धां नको.

ती बहुजनसमाजाच्या हिताची व मूलतः व्यवहार्य असली पाहिजे.

......ही योजना वणव्यासारखी पसरली—व मला उमेद आहे, ती तशी केव्हां तरी पसरणारच—तर गिरण्यांवर त्याचा परिणाम होईल ही गोष्ट उघड आहे. असा दिवस जेव्हां केव्हां उजाडेल तेव्हां सर्वांत मोठ्या भांडवलवाल्यानें सुद्धां त्याबद्दल वाईट वाटून घेतां कामा नये."

—नवी दिल्ली, १७-१०-४६.

x x x

## खादी-कार्यकर्ता.

"आम्हाला खेड्यांत पसरून जावयाचें आहे. खादीच्या कार्यकर्त्यांच्या मागचें बळ म्हणजे सेवा व समजावून सांगण्याची शक्ति. त्यापेक्षां दुसऱ्या बळाची गरज त्याला नाहीं. दुसरें बळ मिळविण्याच्या तो नादीं लागला तर खादी मेल्याखेरीज राहणार नाहीं."

x x x

"खादी-कार्यकर्त्यांनीं लोकांचे पूर्ण सेवक असलें पाहिजे अशी अपेक्षा आहे. त्यांची जर योग्यता असेल तर ते आपल्या बाजूला लोकमत वळवून घेतील. त्यासाठीं सभासदांच्या कमिटीची जरूर नाहीं. त्यांची मदत होण्याऐवजीं अडथळाच होण्याचा संभव आहे. आणखी कार्यकर्त्यांच्या सेवेमुळें ते मदतगार तयार होतील."

x x x

## खादी-विकेन्द्रीकरणानंतर.

"(खादीचें विकेन्द्रीकरण झाल्यानंतर) चरखासंघाचा अधिकार नैतिक राहील व त्यामुळेंच तो अधिक प्रभावी राहील. पैसा किंवा साधनें

पुरविणें त्याचें काम राहणार नाहीं. नैतिक शक्ति उत्पन्न करून खादी-कार्याचा मार्ग सुगम करणें हें त्याचें काम राहील. खादी-कार्यकर्त्यांना तो आपल्या नांवाचा उपयोग करूं देईल, पण आपली इच्छा त्यांच्यावर लादणार नाहीं."

—नवी दिल्ली, १८-१०-४६.

## सुताच्या धाग्यावर राम नाचतो.

"......उत्तम प्रकारें चाललेल्या चरख्याच्या वर्गासमोर इतर सर्व गोष्टी मला कंटाळवाण्या आणि निष्प्राण वाटतात. कारण काढलेल्या प्रत्येक सुताच्या धाग्यावर माझा राम नाचत असलेला मला दिसतो. मला त्यांत स्वराज्य दिसतें. ४० कोटी हातानीं काढलेल्या सुतांत केवढी अजब शक्ति आहे ह्याचा मी विचार करतों तेव्हां माझें अंतःकरण आनंदानें भरून जातें. 'अहो पण २० कोटी लोक चरखा कांतणार नाहींत.' असें तुम्ही म्हणतां! हें शक्य नाहीं असें म्हणणें आपल्या अज्ञानाचें व श्रद्धेच्या अभावाचें द्योतक नाहीं काय?"

—नवी दिल्ली, १६-९-४६.

---

# १३ हिंदु-मुस्लिम समस्या.

## भारतवर्ष एक पक्षी आहे.

"......भारतवर्ष एक पक्षी आहे. हिंदु आणि मुसलमान हे त्याचे दोन पंख आहेत. आज हे दोन पंख अपंग झाले आहेत आणि पक्षी आकाशांत उडून स्वातंत्र्याची आरोग्यप्रद आणि शुद्ध हवा भोगण्याला असमर्थ बनला आहे."

—हिं. न. जी २-११-२४, पृष्ठ ९५.

## हृदयमंदिर प्रथम उभारा.

"......वीट-चुन्याच्या इमारती बांधण्यापूर्वी हृदय-मंदिर उभारणें अतिशय जरूरीचें आहे आणि जर तें झालें तर सर्वच झाल्यासारखें आहे."

—हिं. न. जी. १९-९-२९, पृष्ठ ३३.

## हिंदु-मुसलमान.

"......माझा अनुभव ही गोष्ट अधिक पक्की करीत आहे कीं, मुसलमान प्रायः गुंड असतात आणि हिंदु साधारणतः नामर्द असतात."

—हिं. न. जी. १-६-२४ पृष्ठ ३३६.

## हिंदुधर्म आणि मुसलमान.

"हिंदु-धर्माचें दुसरें नांव कमजोरी, आणि इस्लामचें दुसरें नांव शारीरिक बल झालें आहे."

—ह. से. ६-१-४०, पृष्ठ ३७५.

## हिंदु-मुस्लिम मैत्री.

"......हिंदु-मुस्लिम मित्रतेचा हेतु हा आहे कीं, भारतांत आणि साऱ्या जगांत मंगलमय प्रसन्नता निर्माण होणें. कारण या कल्पनेच्या मुळाशीं शांति आणि सर्वभूत-हिताचा समावेश केला गेला आहे. तिनें भारतांत, स्वराज्य प्राप्त करण्याचें अनिवार्य साधन म्हणून सत्य आणि अहिंसेचा स्वीकार केला आहे. त्याचें प्रतीक चरखा आहे—तो निष्कपटता, स्वावलंबन, आत्मसंयमन, कोट्यवधि लोकांतील स्वेच्छापूर्वक सहकार्य, यांचें प्रतीक आहे."

—हिं. न. जी. २४-८-२४ पृष्ठ १२.

## हिंदु-मुस्लिम ऐक्याची समस्या.

"......जोंपर्यंत हिंदु घाबरत राहतील तोंपर्यंत भांडणें होत राहतील. जेथें घाबरणारा असतो, तेथें घाबरविणाराहि नेहमीं असतो. हिंदूंनीं हें समजलें पाहिजे कीं, जोंपर्यंत ते भ्याड राहतील तोंपर्यंत त्यांचें रक्षण कोणीहि करणार नाहीं. मनुष्याला घाबरणें हेंच सूचित करतें कीं, आपला

ईश्वरावर अविश्वास आहे. ईश्वर आपल्या चारी बाजूंला आहे, सर्वव्यापी आहे, यावर ज्याचा विश्वास नाहीं, अगर विशेष विश्वास नसेल, तर तो आपल्या बाहुबलावर विश्वासून असतो. हिंदूंनीं दोहोंपैकीं एक गोष्ट प्राप्त केलीच पाहिजे. जर असें केलें नाहीं तर हिंदुसमाज नष्ट होण्याचाच संभव आहे."

## दोन मार्ग.

"पहिला मार्ग हा कीं, केवळ ईश्वरावर विश्वास ठेवून माणसाचें भय सोडलें पाहिजे. हा अहिंसेचा रस्ता आहे आणि उत्तम आहे. दुसरा बाहुबलाचा अर्थात् हिंसेचा मार्ग. दोन्ही मार्ग जगात प्रचलित आहेत. आणि आपल्याला दोहोंमधील कोणत्याहि एकाचें ग्रहण करण्याचा अधिकार आहे. पण एकच माणूस एकाच वेळेला दोहोंचा उपयोग करूं शकणार नाहीं.

जर हिंदु आणि मुसलमान दोघेहि बाहुबलाचा रस्ता ग्रहण करूं इच्छित असतील तर या वेळीं लगेच स्वराज्य मिळविण्याची आशा सोडून देणें उचित आहे. तलवारीनें जर मिलाफ-तडजोड-करावयाची असेल तर दोघांनाहि प्रथम खूप लढलें पाहिजे. रक्ताच्या नद्या वाहल्या पाहिजेत. दोनचार खून होण्यानें अगर पांचपंचवीस मंदिरें फोडण्यानें निर्णय होऊं शकणार नाहीं."

## तपश्चर्येचा मार्ग.

"जर आपल्याला मुसलमानांचें हृदय जिंकावयाचें असेल तर आपल्याला तपश्चर्या केली पाहिजे. आम्हांला पवित्र बनलें पाहिजे. आपल्याला आपल्या खोटेपणाला दूर केलें पाहिजे. आणि जरी ते आपल्या बरोबर लढले तरी आपण उलटून प्रहार न करतांसुद्धां धैर्यानें मरण्याची विद्या शिकली पाहिजे. घाबरून बायका-मुलें आणि घरदार सोडून पळून जाणें आणि पळत असतां मरणें, याला मरणें म्हणत नाहींत. उलट प्रहार होत असतां समोर उभें राहून आणि हंसत हंसत मरावयाला आपल्याला शिकलें पाहिजे."

## वाद्यांचा प्रश्न.

"......हिंदुधर्मांतील कोणताहि विधि असा नाहीं कीं, जो वाद्य वाजविल्याशिवाय होऊं शकतो. कित्येक विधि असे आहेत कीं, ज्यांत सुरवातीपासून शेवटपर्यंत वाद्य वाजविणें जरूर आहे. होय, ह्यांत सुद्धां हिंदूंनीं इतकी काळजी जरूर घेतली पाहिजे कीं, मुसलमानांचें हृदय दुखवणार नाहीं. वाद्य हळू वाजविलें पाहिजे, कमी वाजविलें पाहिजे. ह्या सर्व (गोष्टी) देवाण-घेवाण नीति अनुसार होऊं शकतील आणि झाल्या पाहिजेत. किती तरी मुसलमानांच्या बरोबर विचारविनिमय केल्यावर मला असें आढळून आलें आहे कीं, इस्लाममध्यें असें कांहीं आज्ञा-पत्रक नाहीं कीं, ज्याप्रमाणें दुसऱ्याचें वाद्य बंद करणें आवश्यक आहे. म्हणून मशिदी-समोर विधर्मीयानें वाद्य वाजविण्यानें इस्लामला कांहीं धक्का पोहचणार नाहीं. याकरितांच, वाद्याचा प्रश्न भांडणाचें मूळ होतां नये.

× × ×

"......किती तरी ठिकाणीं मुसलमान भाई जबरदस्तीनें वाद्यें बंद करूं इच्छितात हें अप्रिय आहे. जी गोष्ट विनयानें होऊं शकते ती जबरदस्तीनें होऊं शकत नाहीं. विनयासमोर नमणें धर्म आहे, जबरदस्तीसमोर नमणें अधर्म आहे. माराच्या भीतीनें जर हिंदु वाद्य वाजविणें सोडतील तर ते हिंदु राहणार नाहींत. याकरितां सामान्य नियम हाच सांगतां येईल कीं, जेथें हिंदूंनीं समजून अनेक वेळ मशिदीसमोर वाद्य वाजविणें बंद करण्याचा रिवाज ठेवला आहे, तेथें त्यांनीं त्याचें पालन अवश्य केलें पाहिजे. जेथें ते नेहमीं वाद्य वाजवीत आले आहेत, तेथें त्यांना वाजविण्याचा अधिकार असला पाहिजे......जेथें हिंदु बिल-कुल मानणार नाहींत, अथवा जेथें हिंदूंवर जबरदस्ती होण्याचा संभव असेल, आणि जेथें न्यायालयानें वाद्य वाजविणें बंद केलें गेलें नसेल, तेथें हिंदूंनीं निर्भय होऊन वाद्य वाजवीत गेलें पाहिजे. आणि मुसल-मानांनीं कितीहि मारपीट केली तरी ती सहन केली पाहिजे. अशा तऱ्हेनें जितके वाद्य वाजविणारे जेथें मिळतील तेथें त्या सर्वांनीं आपलें बलिदान केलें पाहिजे—त्यांतच धर्म आणि आत्म-सन्मान या दोहोंचेंहि रक्षण होईल."

—हिं. न. जी. १४-९-२४, पृष्ठ ३४.

## " हिंदु-मुस्लिम समस्या. "

" ......मला ठाऊक आहे कीं, बरेचसे मुसलमान असे आहेत कीं ते हिंदूंना नास्तिक मानतात आणि त्यांच्या बरोबर समेट करूं इच्छित नाहींत. पण सर्वच मुसलमानांच्या हृदयांत कटुता नाहीं. बरेच असेंहि मानणारे आहेत कीं, हिंदु आमचे देशभाई आहेत, आणि त्यांच्या बरोबर मिळून मिसळून राहण्यांतच दोहोंचें चांगलें आणि उन्नति होणार आहे. पण आपण ज्यांच्या हातांत सुरा आहे आणि हृदयांत शत्रुभावना आहे अशा मुसलमानांनाहि भितां नये. आपण त्यांचें अंतःकरणहि जिंकूं. त्या-करितां तरी आपल्यावर त्यांना सुरी चालविणें अशक्य होईल. आपणच काय तीं माणसें आहोंत आणि ते नाहींत ? एक दिवशीं तेहि मानवतेची प्रतिष्ठा राखतील. आमची उपाययोजना कोणत्या ना कोणत्या दिवशीं त्यांच्या लक्षांत जरूर येईल. हा प्रश्न हृदयाच्या एकतेचा आहे. राजकारणाच्या सौद्याकरतां जरी झगडे बंद झाले, तरी त्यानें हृदय एक होणार नाही."

—गांधीसेवासंघसंमेलन, डेलांग २६–३–३८.

x x x

"......अहिंसेच्या दृष्टीनें भलें, स्वराज्य येवो वा न येवो, पण हिंदु-मुस्लिम एकता तर होणारच आहे. हिंदु-मुस्लिम एकता आपल्या करितां स्वराज्याचें साधन नाहीं. ......मी ज्या तऱ्हेनें ही गोष्ट जाणतों त्या तऱ्हेनें हजार माणसें सुद्धां आज जाणत नाहींत. ज्याप्रमाणें मी हें सांगतों कीं, असत्य अगर हिंसेनें मिळालेलें स्वराज्य मला नको आहे, त्याप्रमाणेच मी आज हें सुद्धां सांगूं इच्छितों कीं, जर हिंदु-मुस्लिम ऐक्याशिवाय स्वराज्य मिळालें तर मला असें स्वराज्य नको आहे..."

—गांधीसेवासंमेलन, डेलांग, २८–३–३७.

## हिंदु-मुस्लिम वैमनस्य.

" .......हें खरें आहे कीं, हिंदु–मुसलमानांच्या झगड्याचें विशेष कारण तिसऱ्या शक्तीचा हस्तक्षेप......पण मला हें मान्य नाहीं कीं, केवळ त्या तिसऱ्या शक्तीला पराजित करण्यानें झगडा संपेल......माझ्या

जवळ स्वराज्य प्राप्त करण्याचा आणि हिंदु-मुस्लिम ऐक्य साधण्याचा एकच इलाज आहे, तो म्हणजे सत्याग्रह......"

—गांधीसेवासंघसंमेलन, डेलांग, २६-३-३८.

## हिंदु आणि मुसलमानांचें दुःस्वप्न.

"......इस्लाम, ईसाई धर्म आणि पारसी धर्म हिंदुस्थानांतून घालवून दिला जाईल अशी हिंदूंनीं आशा करणें हें एक निरर्थक स्वप्न आहे. त्याप्रमाणेंच एक दिवशीं फक्त त्यांचें कल्पनामय इस्लामचें राज्य साऱ्या जगावर पसरेल अशी मुसलमानांनीं आशा धरणें शुद्ध चूक आहे. पण जर इस्लामकरितां एकाच ईश्वराला (खुदाला) तसेंच त्याच्या पैगंबराच्या अनंत परंपरेला मानणें पुरेसें असलें तर आपण सर्व मुसलमान आहोंत, त्याचप्रमाणे आपण सर्व हिंदु आणि ईसाईहि आहोंत. सत्य हें एकाच धर्मग्रंथाची एकांतिक संपत्ति नाहीं."

—१९-९-२४ यं. इं.

## सांप्रदायिक वातावरण.

"......आज तर आकाश काळ्या ढगांनीं भरलें आहे. पण हें वादळ नाहींसें होईल आणि आपल्या अभागी देशांत सांप्रदायिक ऐक्य जरूर होईल, ही उमेद मी सोडणार नाहीं. जर मला कोणीं विचारलें कीं, याचा पुरावा द्या, तर माझें उत्तर हेंच असेल कीं, माझ्या आशेचें मूळ श्रद्धा आहे, आणि श्रद्धेला प्रमाणाची कांहीं जरूरी नाहीं."

—ह. से. २७-४-४०, पृष्ठ ८७.

## मुसलमानांत असत्य प्रचार.

"......धर्म तर माणसाचा ईश्वराशीं संबंध जोडतो, आणि माणसाचा माणसाबरोबर संबंध जोडतो. मग इस्लाम मुसलमानाचा फक्त मुसलमानाबरोबर संबंध जोडतो आणि हिंदूंबरोबर शत्रुत्व निर्माण करतो काय? पैगंबर साहेबांचा शांतीचा संदेश केवळ मुसलमानां पुरताच होता आणि हिंदु आणि मुसलमानेतरांच्या बाबतींत उलट होता काय? आठ कोटी मुसलमानांना हाच खुराक द्यावयाचा आहे काय कीं, ज्याला केवळ

विषच म्हणावें लागेल ? जे लोक हें विष मुसलमानाच्या हृदयांत भरत आहेत ते इस्लामची मोठी कुसेवा करीत आहेत. मला ठाऊक आहे कीं, हा इस्लाम धर्म नव्हे...... ”

—ह. से. ४-५-४०, पृष्ठ १००.

## पाकिस्तान.

“......मीं तर सांगितलेंच आहे कीं, पाकिस्तान हें एक असें ‘असत्य’ आहे कीं, तें टिकणें शक्य नाहीं. ज्यांनीं ही योजना तयार केली आहे, ते ती अमलांत आणूं लागतील तेव्हां त्यांना कळेल कीं, ती अमलांत आणण्यासारखी गोष्टच नाहीं.”

—ह. से. १८-५-४०, पृष्ठ ११३.

## हिंदु-मुस्लिम झगडे.

“......कायदे-आजम आणि त्यांचे साथीदार......सारखे म्हणत आहेत कीं, आम्हांला जें पाहिजे आहे तें आम्ही जबरदस्तीनें घेतल्याशिवाय राहणार नाहीं. अशा स्थितींत आपल्या राज्याची नौका कोठें जाणार ? कॉंग्रेसच्या लोकांच्या हातांत राज्याचीं सूत्रें असतील; पण त्यामुळें त्यांचीं कर्तव्यें व जबाबदारी शंभरपटीनें वाढलीं आहेत. .......कॉंग्रेसनें हिंसेचा आश्रय घेतला असता तर ती आज पतित झाली असती. ......खेड्यांत राहणारे ४० कोटी लोक हिंसेच्या विचाराचे नाहींत. ते गुलाम आहेत. शहरच्या मूठभर लोकांच्या मनांत आज हिंसा भरलेली आहे. खेडेगांवचा रहिवाशी ह्या नात्यानें ह्या मानवाच्या महासागराशीं मी एकरूप झालेलों आहें. कॉंग्रेसनें ह्या दुःखी मानवसमाजासाठींच सत्ता ग्रहण केली आहे. कॉंग्रेसमध्यें येण्यापूर्वींच मीं हिंदु-मुसलमान ऐक्याचा पुरस्कार केलेला आहे. हिंदु-मुसलमानांचें ऐक्य हें माझ्या जीवनाचें साक्षात् अंग आहे. त्या वेळचीं ( आफ्रिकेंतील लढ्याचीं ) स्मरणें अजूनहि माझ्या जीवनाला सुगंधित करीत आहेत. मी मुसलमान नाहीं, पण इस्लामी धर्म कोणाचेंहि शत्रुत्व करण्यास शिकवीत नाहीं असा माझा दावा आहे. जर मी मानतों त्याप्रमाणें स्वतः खरा हिंदु असेन, तर तितकाच मी खरा ख्रिश्चन, शीख किंवा जैनहि आहें. आपल्यापेक्षां निराळ्या धर्माचा आहे,

किंवा निराळ्या मताचा आहे म्हणून आपल्या दुसऱ्या मानवबंधूला मारावें असा कोणताच धर्म सांगत नाहीं; पण आज तसें वर्तन होत आहे. आधीं मनुष्य स्वतःच स्वतःचा शत्रु झाल्याखेरीज दुसऱ्याला शत्रुरूपानें पाहूं शकत नाहीं. खिलाफतीच्या चळवळीचें व अलीबंधूंच्या आनंदाश्रूंचें स्वाभिमान स्मरण अजूनहि मला आहे. मी हिंदूंच्या सभेंत म्हटलें, 'गायीची सेवा करावयाची असल्यास खिलाफतीचें रक्षण करा व जरूर तर तिच्या प्रीत्यर्थ प्राण अर्पण करा.' माझ्या ह्या उद्‌गारांनीं अलीबंधूंच्या डोळ्यांत आनंदाचे अश्रु आले. आज केवढें दुःखद परिवर्तन झालेलें आहे! दुसऱ्या जातीला आपला शत्रु मानणें म्हणजे केवळ आपल्या धर्माशीं बेइमान होणेंच नव्हे, तर तो मूर्खपणाचाहि प्रकार आहे. आम्ही हिंदु आणि मुसलमान हे सर्व एकाच भूमीचे, एकाच रक्ताचे, एकच अन्न खाणारे, एकच पाणी पिणारे व एकच भाषा बोलणारे भाऊ भाऊ आहोंत, आम्हांला एकत्र राहणें भाग आहे."

x x x

## 'इस्लाम म्हणजे शांति.'

"......तलवारीच्या जोरावर आपण इस्लामी धर्माला जिवंत राखूं अशी मुस्लिम लीगची कल्पना आहे काय? असें असेल तर त्यांचा तो समज फार चुकीचा आहे. 'इस्लाम' ह्या शब्दाचाच अर्थ मुळीं 'शांति' आणि धर्म म्हटला कीं, शांती शिवाय त्याचें अस्तित्व राहूंच शकत नाहीं."

—नवी दिल्ली, १०-९-४६.

## नौखाली अत्याचार.

"ह्या क्षणीं लोकांना हेंच सांगण्याची मला प्रेरणा होत आहे कीं, बंगालमध्यें नौखाली व इतरत्र जे प्रकार चालले आहेत त्यांचा बदला घ्यावयाची बुद्धि मनांत ठेवणें योग्य होणार नाहीं. अहिंसा हें कॉंग्रेसचें धोरण आहे. ह्या धोरणामुळेंच आज तुमच्या ठिकाणीं इतकी शक्ति दिसत आहे."

x x x

### मुस्लिम-लीगला दोन शब्द.

" मुस्लिम-लीगलाहि तिनें किंचित् आत्मपरीक्षण करावें अशी माझी आग्रहाची विनंति आहे......मुस्लीम लीगला ही माझी कळकळीची विनंति आहे कीं, पाकिस्तानासाठीं लढावयाचें असल्यास लढा, पण शुद्ध मार्गानें लढा......हिंदूंना आपल्या सख्या भावाप्रमाणें त्यांनीं वागवावें. पुढें होणाऱ्या गोष्टींचे हे ( नौखाली अत्याचार ) प्रकार जर दर्शक असतील तर पाकिस्तानला तें दुश्चिन्हच आहे. हिंदु-मुसलमान परस्परांना जामीन राहतील व अल्पसंख्याकांच्या केसाला धक्काहि लागूं न देण्याची प्रतिज्ञा घेतील, अशी मला आशा आहे."

—हरिजन ३-११-१९४६

---

# १४ स्त्रिया आणि त्यांचे प्रश्न

### स्त्री.

" स्त्री काय आहे? साक्षात् त्यागमूर्ति आहे. ज्या वेळीं स्त्री मनापासून एकादें काम हातात घेते, त्या वेळीं ती पर्वतसुद्धां हलवूं शकते."

—हिं. न. जी. २५-१२-२१.

### " स्त्री पुरुषापेक्षां श्रेष्ठ आहे."

" ......स्त्रीला अबला म्हणणें म्हणजे तिचा अपमान करणें होय. तिला अबला म्हणून पुरुष तिच्यावर अन्याय करीत आहे. शक्ति याचा अर्थ पाशवी शक्ति असला तर निःसंदेह पुरुषापेक्षां स्त्रीमध्यें कमी पशुता आहे. पण जर तिचा ( शक्ति ) अर्थ नैतिक शक्ति असला तर खात्रीनें पुरुषापेक्षां स्त्री किती तरी अधिक शक्तिशालिनी आहे. काय स्त्रींत पुरुषापेक्षां अधिक प्रतिभा नाहीं? काय तिचा आत्मत्याग पुरुषापेक्षां अधिक नाहीं? तिच्यांत सहनशक्ति कमी आहे? साहसाचा अभाव आहे? स्त्रीशिवाय पुरुष निर्माण होऊं शकत नाहीं. आणि जर अहिंसा आपल्या

जीवनाचा ध्यानमंत्र असला तर असें म्हटलें पाहिजे कीं, आपल्या देशाचें भविष्य स्त्रियांच्या हातांत आहे."

—हिं. न. जी. १०-४-३०, पृष्ठ ३७७.

## स्त्री, धर्माचा अवतार.

"सहनशक्ति आणि धैर्याशिवाय धर्माचें रक्षण असंभवनीय आहे. स्त्री सहनशक्तीची साक्षात् प्रतिमूर्ति आहे, धैर्याचा अवतार आहे. धर्माच्या मुळांत श्रद्धा आहे. जेथें श्रद्धा नाहीं, तेथें धर्म नाहीं. स्त्रीश्रद्धेबरोबर पुरुषाच्या श्रद्धेची कोणतीहि तुलना होऊं शकत नाहीं."

—ह. से. ७-४-३३.

## स्त्री पुरुषाची बाहुली नाहीं.

"स्त्रीमध्यें ज्याप्रमाणें वाईट करण्याची, लोकांचा नाश करण्याची शक्ति आहे, त्याप्रमाणें चागलें करण्याची, लोकहित साध्य करण्याची शक्ति सुद्धां सुप्तावस्थेंत आहे. ही गोष्ट जर स्त्रीला कळली तर किती चागलें होईल, आणि तिनें असें विचार करण्याचें सोडून दिलें कीं, ती स्वत: अबला आहे आणि पुरुषाच्या खेळण्याची बाहुली होण्यालाच योग्य आहे, तर ती स्वत: आपलें आणि पुरुषाचें ( मग तो तिचा पिता असो, पुत्र असो, वा पति असो ) जीवन सुधारूं शकते. आणि दोहों-करितां या जगांत अधिक सुखदायिनी होऊं शकते."

× × ×

"अधिकांशतः कोणत्याहि कारणाशिवायच मानवप्राण्याचा संहार करण्याची जी शक्ति पुरुषांत आहे, त्या शक्तीशीं बरोबरी ( अनुकरण ) करण्यानें स्त्री मानवजातीला सुधारूं शकणार नाहीं. पुरुषाच्या ज्या प्रमादानें पुरुषाबरोबर स्त्रीचा नाश होणार आहे, त्या चुकींतून पुरुषाला वांचविणें आपलें परम कर्तव्य आहे, हे तिनें जाणलें पाहिजे."

—ह. से. २१-११-३६.

## स्त्री.

"......स्त्री अहिंसेची मूर्ति आहे. अहिंसेचा अर्थ अनंत प्रेम, आणि त्याचा अर्थ आहे कष्ट सहन करण्याची अनंत शक्ति. .......युद्धांत

सांपडलेली दुनिया आज शांतीच्या अमृतपानाकरितां तडफडत आहे. ही शांति-कला शिकविण्याचें काम ईश्वरानें स्त्रीलाच दिलें आहे."......

—ह. से. २४-२-४०, पृष्ठ ३६

## स्त्रीचें स्वातंत्र्य.

"......स्त्री पुरुषाची गुलाम नाहीं. ती अर्धांगिनी आहे, सहधर्मिणी आहे. तिला मित्र समजलें पाहिजे."

—हिं. न. जी. ४-३-२६, पृष्ठ २३१. श्री रामेश्वर प्रसाद नेवटिया यांबरोबर जमनालालजींची ज्येष्ठ कन्या श्री कमलाबाई हिच्या झालेल्या विवाहप्रसंगीं केलेल्या आशीर्वादात्मक भाषणांतून.

## विषयेच्छा.

"विषयेच्छा ही सुंदर आणि श्रेष्ठ गोष्ट आहे. तिच्यांत शरमेची अशीं कोणतीच गोष्ट नाहीं. कारण ती संतति निर्माण करण्यासाठीं आहे. याच्याशिवाय जर तिचा दुसरा उपयोग केला गेला तर तो परमेश्वराचा आणि मानवतेचा गुन्हा होईल."

—हं. से. २८-३-३६ पृष्ठ ४६.

## कृत्रिम सन्तति-निग्रह. (नियमन)

"सन्ततिनिग्रहाचे (नियमनाचे) कृत्रिम उपाय कोणत्या ना कोणत्या रूपांत पूर्वींहि होते आणि नंतरहि राहतील. परंतु पूर्वी त्यांचा उपयोग करणें पाप मानलें जात होतें आणि व्यभिचाराला सद्गुण बोलून त्याची प्रशंसा करण्याचें काम आपल्या युगाकरितां सुरक्षित ठेवलें होतें."

× × ×

"जे विद्वान् स्त्री-पुरुष सन्ततिनियमनाच्या कृत्रिम साधनांच्या बाजूनें मोठ्या तत्परतेनें प्रचार-कार्य करीत आहेत ते अशाच खोट्या समजुतीनें कीं, ज्यांनां आपल्या इच्छेच्या विरुद्ध मुलांचा भार संभाळणें भाग पडत आहे अशा बिचाऱ्या स्त्रियांचें त्यामुळें रक्षण होईल. ते (विद्वान्) देशाच्या युवकांची इतकी हानि करीत आहेत कीं, त्याची भरपाई कधींहि होऊं शकणार नाहीं, या विषयीं मला कांहीं संदेह नाहीं."

"ह्या प्रचारकार्यानें अत्यंत हानि होत आहे, ती म्हणजे पुरातन आदर्श सोडून त्याचे जागीं असा आदर्श ठेऊन, आत्मसात् करावयाचा कीं, जर तो प्रत्यक्षांत आणला गेला तर समाजाचा नैतिक तसेंच शारीरिक सर्वनाश निश्चित आहे."

—ह. से. २८-३-३६, पृष्ठ ४५.

## संततिनियमन आणि स्त्री.

[**प्रश्न**:—संततिनियमनाकरितां स्त्रिया संयम करतील, पण पुरुषांनीं बलात्कार केला तर काय करावयाचें ?]

"हा तर खऱ्या स्त्रीधर्माचा सवाल आहे......सतींना मी पुजतों, पण मी त्यांचा अधःपात करूं इच्छीत नाहीं. स्त्रीचा खरा धर्म तर द्रौपदीनें दाखविला आहे. पति जरी अधःपतित होत असला तरी स्त्रीनें तसे होतां नये. स्त्रीच्या संयमा आड येणें शुद्ध व्यभिचार आहे. जर कधीं तो बलात्कार करूं लागला, तर त्याला थप्पड मारून सरळ करणें तिचा धर्म आहे. व्यभिचारी पतीला, ती दरवाजा बंद ठेवील. अधर्मी पतीची पत्नी होण्याला तिनें नकार दिला पाहिजे. आपण स्त्रियांमध्येंही हिंमत उत्पन्न केली पाहिजे."

—गां. से. सं. सम्मेलन, सावली, ४ मार्च ३६.

## कृत्रिम संततिनियमन.

"......कृत्रिम साधनांच्या साहाय्यानें भोगलेल्या भोगांमुळें मूल होणार नाहीं, पण (कृत्रिम साधनें) पुरुष आणि स्त्री ह्या दोहोंची—स्त्री-पेक्षां पुरुषांची अधिक—जीवनशक्ति शोषून घेतील. आसुरी वृत्ती-विरुद्ध युद्ध न करणें म्हणजे नामर्दपणा आहे."

—ह. से. २४-४-३७, पृष्ठ ८०.

## 'आजकालच्या मुली आणि आत्मरक्षण'

"......मला वाटतें कीं, आजकालच्या मुलींना सुद्धां अनेक 'मजनुं' ची (प्रियकरांची) लैला (प्रेयसी) होणें आवडतें! तीं भलतेंच धाडस करण्यास प्रवृत्त होत आहेत......पाऊस अगर ऊन यांपासून रक्षण करण्याच्या उद्देशानें नव्हे तर उलट लोकांचें लक्ष आपल्याकडे

वेधण्यासाठीं तऱ्हतऱ्हेचे भडक कपडे आजकालची तरुणी वापरते. ती रंगरंगोटी करून, निसर्गावर मात करण्याचा आणि असाधारण सुंदर दिसण्याचा प्रयत्न करीत आहे. अशा तरुणींच्या करितां कोणताही अहिंसात्मक मार्ग नाहीं......आपल्या हृदयांत अहिंसेच्या भावनेचा विकास होण्याचे सुद्धां कांहीं निश्चित नियम असतात. अहिंसेची भावना हा एक फारच महान् प्रयत्न आहे. विचार आणि जीवनप्रणालीमध्यें ती (भावना) क्रांति घडवून आणते. जर मला आलेल्या पत्राची लेखिका आणि त्या तऱ्हेचे विचार असणाऱ्या तरुणी वर सांगितल्याप्रमाणें आपलें जीवन साफ बदलून टाकतील, तर त्यांना तत्काळच हा अनुभव येऊं लागेल कीं, त्यांच्या सान्निध्यांत येणारे तरुण त्यांच्याशीं आदरानें वागण्याचें आणि त्यांच्या समोर असतांना व्यवस्थित वागण्याचें शिकूं लागले आहेत. पण जर त्यांनां असें आढळलें कीं त्यांच्या अब्रूवर अगर धर्मावर घाला पडण्याचा प्रसंग आला आहे, तर त्यांच्यांत त्या पशुतुल्य माणसाच्या समोर आत्मसमर्पण करण्या ऐवजीं मरून जाण्याइतकें सामर्थ्य पाहिजे."

—ह. से. ३१-१२-३८, पृष्ठ १७.

## स्त्रियांनीं निर्भय होण्याची आवश्यकता.

".......पण खरी गोष्ट तर ही आहे कीं, स्त्रियांनीं निर्भय बनावयाला शिकलें पाहिजे. माझा असा दृढ विश्वास आहे कीं, कोणतीहि स्त्री—जी निर्भय आहे, आणि जी तिचें पावित्र्य हें तिच्या सतीत्वाचें रक्षण करणारी उत्कृष्ट ढाल आहे असें मानते, तिचें शील सर्वथा सुरक्षित राहतें. अशा स्त्रीच्या तेजानें पशुपुरुष दिपून जाईल आणि लज्जेनें चूर होऊन जाईल."

—ह. से. १-३-४२, पृष्ठ ६०.

## पतिकर्तव्य.

"......तुम्हीं तुमच्या पत्नीच्या अब्रूचे रक्षण करून तिचे मालक होऊन बसूं नका. तिचे खरे मित्र बना. तुम्ही तिचें, शरीर आणि आत्मा, तुमच्या इतकाच पवित्र माना."

—यं. इं; हिं. न. जी. २-२-२८, पृष्ठ १०२. आपल पुत्र रामदास गांधी यांच्या विवाहप्रसंगीं दिलेला आशिर्वाद.

## स्त्रीबरोबर पतीची वागणूक.

[प्रश्न :—मी २३ वर्षांचा नवयुवक आहें. मागील दोन वर्षांपासून मी शुद्ध खादीधारी आहे. गेले २८ दिवस मी फुरसतीच्या वेळीं नियमानें सूत कांतीत आहें पण माझी पत्नी खादी वापरावयाला नकार देत आहे. "ती म्हणते, ती (खादी) फार जड आहे." मी तिला अनिच्छापूर्वक खादी वापरावयाला भाग पाडूं कीं काय? मी हें सुद्धां सांगतों कीं, आमचे स्वभाव जुळत नाहींत!]

"भारतीय जीवनांत सर्व ठिकाणीं हीच रूढ आहे. मी पुष्कळ वेळां म्हटलें आहे कीं पति जास्त बलवान् आणि शिक्षित असतो म्हणून त्यानें पत्नीचा गुरु बनलें पाहिजे. आणि तिच्यांत जर कांहीं दोष असले तर सहन केले पाहिजेत. आपल्या बाबतींत हीच गोष्ट आहे कीं, आपण आपल्या पत्नीचा आपल्याशीं न जुळणारा स्वभाव सहन केलाच पाहिजे. आपल्या पत्नीला प्रेमानेंच वश केलें पाहिजे. जबरदस्तीनें खास नाहीं. यापासून हेंच निश्चित होतें कीं आपण आपल्या पत्नीवर खादी वापरण्याबाबत जोर करूं शकत नाहीं. हें लक्षांत ठेवा कीं ज्याप्रमाणें तुम्ही तिची मालमत्ता नाहीं, त्याप्रमाणें ती सुद्धा तुमची मालमत्ता नाहीं. ती तुमची अर्धांगी आहे. हेंच समजून घेऊन तुम्हांला तिच्याशीं वर्तन केलें पाहिजे. आपल्याला ह्या प्रयोगानें पश्चात्ताप होणार नाहीं."

—ह. से. १७--२--४०.

## स्त्री-पुरुषसमस्या.

**(क)** मुळांत एक आहे.

"......माझ्या मतें ज्याप्रमाणें मुळांत स्त्री आणि पुरुष एक आहेत, त्याप्रमाणेंच त्यांच्या समस्येचें तत्त्वही वस्तुतः एक आहे. दोहोंत एकच आत्मा आहे. दोघेंही एकच तऱ्हेचें जीवन कंठत आहेत. दोहोंची एकाच तऱ्हेची भावना आहे. एक दुसऱ्याची पूरक आहे. एकाच्या खऱ्या सहाय्या शिवाय दुसरा विजयी होऊं शकत नाहीं."

x x x

**(ख)** पण भिन्नहि आहे.

"पण यांतही शंका नाहीं कीं, ठराविक मर्यादेनंतर दोहोंचें कार्य वेगवेगळें होतें. हें जरी खरें आहे कीं, मुळांत दोघेंही (स्त्री पुरुष) एक

आहेत तरी हेंही सत्य आहे कीं, दोघांची शरीररचना फारच भिन्न आहे. याकरितांच दोघांचीं कामेंहि निरनिराळीं असलीं पाहिजेत. मातृत्वच असें आहे कीं, त्यांत अधिक जबाबदारी नेहमीं स्त्रीवर असते. तेव्हां त्या करिता आवश्यक असणाऱ्या गुणांची पुरुषाला जरुरी नाहीं. ती स्वभावतःच घराची मालकीण आहे. तो कमावणारा आहे. ती कमाई सांभाळते, आणि तिचा विनियोग करते. ती खऱ्या अर्थानें पालक आहे. मानव जातीच्या छबकड्यांचें पालनपोषण करून मोठें करण्याची कला हें तिचें विशेष कार्य, आणि अधिकार आहे. त्याचें (कलेचें) पालन न झालें तर मानवजात नष्ट होईल."

—ह. से. २४--२--४०, पृष्ठ १०.

## स्त्रियांचें आर्थिक स्वातंत्र्य.

[**प्रश्नः**—जमीनजुमल्यावर विवाहित स्त्रियांच्या अधिकारासंबंधीं कायद्यांच्या सुधारणेवर बरेच लोक असा विरोध करतात कीं, आर्थिक स्वातंत्र्यानें त्यांच्यांत दुराचार माजेल आणि कौटुंबिक जीवन बिघडेल. या प्रश्नाबाबत आपलें काय म्हणणें आहे ?]

"मी ह्या प्रश्नाचें उत्तर एक दुसरा प्रश्न विचारून देईन. पुरुषाला असलेल्या स्वातंत्र्यामुळें, आणि मिळकतीवर असलेल्या अधिकारामुळें, पुरुषांत दुराचार वाढला नाहीं का ? आणि जर तुम्ही त्याचें उत्तर हो देत असलांत तर स्त्रियांच्या बाबतींत सुद्धां तसेंच आहे. आणि जर स्त्रियांना सुद्धां मिळकतीवर अधिकार आणि पुरुषांना जसे इतर बाबतींत हक्क आहेत, ते मिळाले कीं, मग असें आढळून येईल कीं, अशा अधिकारांवर त्यांचें पाप-पुण्य अवलंबून नाहीं. जें सदाचरण स्त्री-पुरुषांच्या सुस्थितीवर अवलंबून असतें, त्यांत प्रशंसेला योग्य अशी कांहीं गोष्टच नाहीं. सदाचरण आपल्या हृदयाच्या शुद्धतेंत-निर्मलतेंत आहे."

—सेवाग्राम, ४-६-४०, ह. से. ८-६-४०.

## सतीत्वभंग व बलात्कार.

"........ज्या वेळीं तिची संमति असते तेव्हांच स्त्रीचा खरा सतीत्वभंग होतो, परंतु जी विरोध करीत असतां सुद्धां बळी पडते, तिच्या

बाबतींत सतीत्वभंगापेक्षां हेंच म्हणणें योग्य होईल कीं, तिच्यावर बलात्कार झाला! 'सतीत्वभंग' म्हणजे व्यभिचार हा शब्द बदनामीचा सूचक आहे, म्हणून तो बलात्काराचा पर्यायवाची मानतां येणार नाहीं."

ह. से. १-३-४२, पृष्ठ ६०.

## मातृजीवन धर्म आहे.

".........साधारणतः भगिनींनां मातृधर्माचें शिक्षण मिळत नाहीं, पण जर गृहस्थजीवन धर्म आहे, तर मातृजीवन सुद्धा धर्म आहे. मातेचा धर्म हा एक अत्यंत कठिण धर्म आहे......जी स्त्री राष्ट्राला तेजस्वी, निरोगी आणि सुसंस्कृत मुलांची भेट देते, ती सुद्धा (देश) सेवा करते..."

—सेवाग्राम, ३-३-४२, ह. से. ८-३-४२.

## हिंदु विधवा.

"......हिंदु विधवा दुःखाची प्रतिमा आहे. तिनें जगाच्या दुःखाचा भार आपल्या मस्तकावर घेतला आहे. तिनें दुःखाला सुख बनविलें आहे. दुःखाला धर्म बनविला आहे."

—हिं. न. जी. २-७-२५, पृष्ठ ३७३.

## वैधव्य.

"........वैधव्य हिंदुधर्माचें वैभव आहे. धर्माचें भूषण वैराग्य आहे, वैभव नाहीं."

× × ×

"परंतु हिंदुधर्मशास्त्र कोणत्या वैधव्याची स्तुति आणि स्वागत करतें? पंधरा वर्षांच्या मुग्ध (बालेच्या) वैधव्याची नाहीं, कीं जिला विवाहाचा अर्थ सुद्धां ठाऊक नाहीं......वैधव्य, सर्वांप्रमाणें, सर्व ठिकाणीं, सर्व वेळीं अनिवार्य सिद्धात नाहीं. जी त्याचें (सिद्धांत) पालन करते, त्या स्त्रीच्या बाबतींतच तो धर्म आहे."

× × ×

"सतींनों, आपलें दुःख संभाळून ठेवा. तें दुःख नाहीं, सुख आहे. तुमच्या नामोच्चारानें कितीतरी लोक तरून गेले आहेत आणि जातील."

—हिं. न. जी. २-७-२५, पृष्ठ ३७३.

## हिंदु विधवा.

"......हिंदु विधवा निर्माण करून, विधात्यानें कमाल केली आहे. ज्या ज्या वेळीं पुरुष आपलें दुःख निवेदन करतांना मी ऐकतों, त्या त्या वेळीं विधवा भगिनीची प्रतिमा माझ्या दृष्टीसमोर उभी राहते. आपल्या दुःखांच्या नांवानें रडणाऱ्या त्या पुरुषांनां पाहून मला हसूं येतें."

"हिंदुधर्मानें संयमाला उच्चतम कोटीला नेलें आहे आणि वैधव्य त्याची परिसीमा आहे."

"......अनेक विधवा दुःखाला दुःख मानत नाहींत, त्याग त्यांच्या बाबतींत एक स्वाभाविक गोष्ट झाली आहे. त्यागाचा त्याग करणें त्यांना दुःखद होतें. वैधव्याचें दुःख त्यांना सुखदायक वाटतें."

"ही स्थिति वाईट नाहीं. चांगली आहे. त्यांत हिंदुधर्माची श्रेष्ठता आहे. वैधव्याला मी हिंदुधर्माचें भूषण मानतों. ज्या वेळीं मी विधवा भगिनीला पहातों, त्या वेळीं माझें मस्तक आपोआप तिच्या चरणीं नम्र होतें. विधवेचें दर्शन माझ्या मतें अपशकुन नाहीं. प्रातःकाळीं तिचें दर्शन घेऊन मी स्वतःला कृतार्थ मानतों. तिचा आशीर्वाद हा एक मी मोठा अनुग्रह मानतों. तिला पाहून मी सर्व दुःख विसरून जातों. विधवेसमोर पुरुष एक पामर प्राणी आहे. विधवेच्या धैर्याचें अनुकरण करतां येणें असंभवनीय आहे. प्राचीन कालापासून विधवेला मिळालेल्या देणगीसमोर पुरुषाच्या क्षणिक त्यागाच्या ठेवीची काय किंमत होऊं शकणार?"

"जर ह्या विधवाधर्माचा लोप झाला, जर कोणीं अज्ञान अथवा वासना यांना बळी पडून या सेवेच्या साक्षात् मूर्तीचा भंग केला तर हिंदुधर्माची मोठी हानि होईल."

## वैधव्य.

"......माझें हें दृढ मत होत आहे कीं, जगांत बालविधवेसारखी अनैसर्गिक गोष्टच असतां नये. वैधव्य, धर्म नाहीं; धर्म तर संयम आहे. बल-प्रयोग आणि संयम हीं एकमेकांच्या परस्पर विरोधी आहेत......"

x x x

"अनिच्छेनें पालन केलें जाणारें वैधव्य पाप आहे. स्वेच्छेनें पाळलेलें वैधव्य धर्म आहे, आत्म्याची शोभा आहे, समाजाच्या पावित्र्याची ढाल आहे."

—हिं. न. जी. १०-७-२५

## खरी विधवा आणि बालविधवा.

"......माझी श्रद्धा आहे कीं, खरी विधवा एक रत्न आहे. पण बालविधवेचें अस्तित्व हा हिंदुधर्मावरील एक कलंक आहे......"

—हिं. न. जी. १९-८-२६.

## वेश्यावृत्ति.

"......जोंपर्यंत स्त्रियांमधूनच असाधारण चारित्र्यवान् स्त्री निर्माण होऊन ह्या पतित भगिनींचा उद्धार करण्याचें कार्य आपल्या हातीं घेणार नाहीं, तोंपर्यंत वेश्यावृत्तीचा प्रश्न सुटणार नाहीं.........वेश्यावृत्ति इतकी पुराणी आहे कीं, या जगाइतकी ! आजच्या प्रमाणें ती ( वेश्यावृत्ति ) नागर-जीवनांचें बहुतेक आवश्यक अंग बनली आहे. कोणत्याही परिस्थितींत ही वेळ आल्याशिवाय राहणार नाहीं कीं, ज्या वेळीं सर्व मानवजात ह्या पापाच्या विरुद्ध एक आवाज काढील आणि वेश्यावृत्तीला भूतकाळांत जमा करील."

—हिं न. जी. २८-५-२५, पृष्ठ ३३८.

× × ×

"......वेश्यावृत्ति हें एक अत्यंत महाभीषण आणि वाढत जाणारें संकट ( दुर्गुण ) आहे. दुर्गुणांत गुण पाहण्याची, आणि कलेच्या पवित्र नांवावर अथवा दुसऱ्या कोणत्या तरी खोट्या कल्पनेनें, वाईटाला चांगलें मानण्याच्या प्रवृत्तीनें, अधःपतनकारी पाप-विलासाला एक प्रकारच्या सूक्ष्म आदरभावनेचें अधिष्ठान मिळालें आहे आणि तेंच या नैतिक पापाला जबाबदार आहे."

—हिं. न. जी. ९-७-२५.

## समाजसुधारणा अधिक कठिण आहे.

"........राजकारणापेक्षां, समाजसुधारणेचें कार्य ज्यास्त कठिण आहे."

—हिं. न. जी. ६-९-२८.

## हुंडा.

"......ज्या वेळीं वर, मुलीच्या बापाकडून विवाह करण्याच्या मेहेरबानीबद्दल हुंडा घेतो, तेव्हा नीचतेची कमाल होते......पैशाच्या लोभानें केलेला विवाह, विवाह नव्हे, तर तो एक नीच सौदा आहे."

—हिं. न. जी. ६-९-२८.

## पडदा (बुरखा) आणि पावित्र्य.

"......पावित्र्य बुरख्याच्या आड ठेवून चालत नाहीं. बाहेरून तें लादतां येत नाहीं. पडद्याच्या भीतीनें त्याचें रक्षण होऊं शकत नाहीं. ती (पवित्रता) आंतूनच निर्माण झाली पाहिजे. आणि जर तें (पावित्र्य) खरें असलें तर सर्व तऱ्हेच्या अनाहूत आकर्षणांशीं सामना करण्याच्या योग्यतेचें असलें पाहिजे. ती (पवित्रता) सीतेच्या पवित्रतेसारखी श्रेष्ठ नसेल, आणि जर ती पुरुषाची नजर सहन करूं शकली नाहीं तर ती (पवित्रता) अगदीं साधारण म्हणावी लागेल."

—हिं. न. जी. ३-२-२७.

## पडदा.

"......पडद्याच्या वाईटपणाविषयीं मीं पुष्कळच लिहिलें आहे. ती प्रथा सर्व तऱ्हेनें अकल्याणकारी आहे. अनुभवानें हें सिद्ध झालें आहे कीं, ही प्रथा स्त्रीचें रक्षण करण्याच्या ऐवजीं, स्त्रीच्या शरीराला आणि मनाला हानिकारक होते."

हिं. न. जी. १२-९-२९.

## अलंकार.

"......अलंकारांच्या उत्पत्तीबद्दल माझी जी कल्पना आहे, ती जर योग्य असेल, तर भले दागिने खरे असोत किंवा खोटे असोत, कोणत्याही

परिस्थितींत ते त्याज्य आहेत. बेडी सोन्याची असो अगर हिऱ्यामोत्यांचें ज़डावकाम केलेली असो, पण ती शेवटी बेडीच! अंधेऱ्या कोठडींत बंद केलेले असोत अगर महालांत ठेवलेले असोत, दोहोंतहि स्त्री-पुरुष कैदी, असेंच म्हणणार."

हिं. न. जी. ५-१-३०

## शौर्य.

"......मुसलमानांनीं भरलेल्या खेड्यांत एकट्या हिंदु निराश्रिताला जरी परत जाण्याची वेळ आली तरीहि त्यानें निःसंकोच मनानें परत जावें असें मी म्हणेन. मग ही व्यक्ति पुरुष असो कीं स्त्री असो. जर त्याला शूर बनावयाचें असेल तर त्यानें असें धैर्य अंगीं बाणून घेतलेंच पाहिजे. शौर्य हा कांहीं पुरुषांचा मक्ता नाहीं, स्त्रियाही पुरुषां इतक्याच स्वावलंबी असूं शकतात."

सायंप्रार्थना, श्रीरामपूर, २८-११-१९४६.

---

# १५ सहकाऱ्यांना इषारा

## मानव-पूजा नाहीं, आदर्श-पूजा.

".......मीं एक मार्ग दाखवून दिला आहे. आपण तो मानला आहे. परंतु मानव-पूजा करणें हें आपलें काम नाहीं. पूजा आदर्श आणि सिद्धांताचीच होऊं शकते......तुम्ही माझे पुजारी होऊं नका. सत्य आहे, अहिंसा आहे, त्याचे पुजारी व्हा. आपण जी गोष्ट आत्मसात् केली, ती स्वतंत्र रूपानें आपली झाली आणि जी स्वतंत्र रूपानें आपली आहे, ती आपलीच आहे."

## विचारांचें अपचन.

"......एखाद्या माणसाचे विचार आपण ग्रहण केले—पण आत्मसात् केले नाहींत, बुद्धीनें ग्रहण केलेत—पण हृदयापर्यंत गेले नाहींत,

ते (विचार) आत्मसात् केले नाहींत, तर तें एक प्रकारचें विचारांचें अपचन आहे; बुद्धीचा विलास आहे. विचारांचें अपचन—अन्नाच्या अपचनापेक्षां अधिक वाईट होय. अन्नाच्या अपचनाला औषध आहे, पण विचारांच्या अपचनानें आत्म्यावर वाईट परिणाम होतात."

—तृतीय गां. से. सं. संमेलन, हुदली १६-४-३५.

## खोटा गांधीवाद.

"......जर गांधीवादांत असत्याची घाण असेल तर त्याचा अवश्य नाश झाला पाहिजे. पण जर त्यांत सत्य असलें तर त्याच्या नाशासाठीं लाखों—कोटी शक्ति एकत्र झाल्या तरी सुद्धां नाश होणार नाहीं."

— गां. से. सं. संमेलन, मालिकांदा (बंगाल) २०-२-४०.

× × ×

"......जो आपल्या हृदयाच्या ऐवजीं माझ्या सल्ल्याप्रमाणें वागतो, अगर माझ्या दडपणानें काम करतो, तो खरा गांधी-वादी नाहीं."

—मालिकांदा (बंगाल) २१-२-४०.

× × ×

"खरी गोष्ट अशी आहे कीं, तुम्हांला 'गांधीवाद' ह्या नांवाचाच त्याग केला पाहिजे, नाहीं तर तुम्ही अज्ञानाधःकारांत जाल. गांधीवादाचा नाश झाला पाहिजे......'वादा' चा नाश होणेंच योग्य होय. 'वाद' तर निरुपयोगी गोष्ट आहे. खरी गोष्ट अहिंसा आहे. ती अमर आहे. ......आपण सांप्रदायिक होऊं नका. मी तर कोणाचाही सांप्रदायी बनलों नाहीं. कोणताहि सांप्रदाय कायम करण्याचें माझ्या मनातच आलें नाहीं. माझ्या मृत्यूनंतर जर माझ्या नांवावर सांप्रदाय निघाला तर माझा आत्मा रडेल."

मालिकांदा (बंगाल) २२-२-४०.

## माझा कोणीहि अनुयायी नाहीं.

"लोकांना वाटेल तें ते म्हणोत, सेवेचा कांहीं संप्रदाय होऊं शकणार नाहीं. ती तर सर्वांकरितां आहे. मी सर्वांचा स्वीकार करीन. सर्वांच्या बरोबर चालण्याचा प्रयत्न करीन. तोच अहिंसेचा रस्ता आहे

आणि जर माझा कोणता " वाद " असला तर हाच आहे......माझा कोणी अनुयायी नाहीं, मी माझाच अनुयायी आहें. नाहीं, नाहीं, मी तरी माझा पूर्ण अनुयायी केव्हां झालों आहें ? माझ्या विचारांवर मी तरी कोठें अंमल करूं शकतों ? मग दुसरे माझे अनुयायी कसे होऊं शकतात ? दुसऱ्यांनीं माझ्या बरोबर येणें, माझे सहाध्यायी होणें, हें तर मला प्रिय आहे. पण कोण पुढें चालत आहे, कोण मागें आहे, तें मला कुठें ठाऊक आहे ? आपण माझे सहाध्यायी, सहकारी, सहसेवक, सहसंशोधक आहांत ! अनुयायी होण्याची गोष्टच आपण सोडून द्या. कोणी पुढें नाहीं, कोणी मागें नाहीं. कोणी नेता नाहीं, कोणी अनुयायी नाहीं. आपण सर्व एकसमयावच्छेदें जात आहोंत."

—गां. से. सं. संमेलन, मालिकांदा २२–२–४०.

## गांधी-सेवासंघाचें विसर्जन.

"......जी सीता गुप्त ( पृथ्वीच्या पोटांत ) झाली ती अमर झाली. आतांपर्यंत आपण तिचें नांव घेऊन पावन होत आहोंत. ती सीता जिवंत आहे. छायामय सीता मृत्यु पावली. जर आपण खरोखरच शक्तिमान् होण्याची इच्छा करीत असलों तर संघ विसर्जन करूं. हें सुद्धां शक्तीचेंच काम आहे. त्या करितां सुद्धां धाडस आणि बल पाहिजे."

—गां से. सं. संमेलन, मालिकांदा ( बंगाल ) २१–२–४०.

## गांधी-सेवासंघ आणि कॉंग्रेस.

"......कॉंग्रेस एक तुफानी समुद्र आहे. तेथें ( कॉंग्रेसमध्यें ) जाऊन जर आपण रागलोभादि आवरूं शकतों तर असें समजा कीं, आपलें जहाज ( कार्य ) व्यवस्थित चालू आहे. संघ हें बंदर आहे. येथें शक्ति-प्रयोगाला स्थान नाहीं."

—गां. से. सं. मालिकांदा ( बंगाल ) २१–२–४०.

## गांधीवादाचा नाश होवो !

"......जर गांधीवाद हें संप्रदायाचें दुसरें नांव असलें, तर तो संपणें हेंच योग्य होय. मेल्यानंतर जर मला असें आढळून आलें कीं,

मी ज्या गोष्टीची शिकवण दिली होती तिचा विपर्यास होऊन संप्रदाय बनला आहे, तर माझ्या आत्म्याला अत्यंत दुःख होईल. मला तर (सर्व कांहीं) गाजावाजा न करितां करावयाचें आहे. कोणी असें म्हणतां कामा नये कीं, मी गांधींचा अनुयायी आहे. मला पूर्ण जाणीव आहे कीं मी माझा स्वतःचा किती अपूर्ण अनुयायी आहें."

—ह. से. १६–३–४० पृष्ठ ३३·

# १६ विधायक कार्यक्रम

## स्वराज्यनिर्मितीची प्रक्रिया.

"......दुसऱ्या आणि अधिक योग्य शब्दांत, विधायक कार्यक्रमाला, सत्य आणि अहिंसक साधनांच्या द्वारा पूर्ण स्वराज्या......ची रचना अथवा निर्मितीची प्रक्रिया म्हणता येईल."

## १ सांप्रदायिक ऐक्य.

"......या ऐक्याचा अर्थ केवळ राजनैतिक एकता असा नाहीं. कारण राजनैतिक एकता जबरदस्तीनें लादली जाणें शक्य आहे. सांप्रदायिक एकतेचा अर्थ हृदयांची एकता, कीं जी तोडूनहि तुटणार नाहीं. ह्या ऐक्याची पहिली अट ही आहे कीं, प्रत्येक कॉंग्रेसजन, मग तो कोणत्याहि धर्माचा कां असेना, आपापसांत हिंदु, मुसलमान, ईसाई, पारशी, यहुदी इत्यादींचें, म्हणजे एका शब्दांत, प्रत्येक हिंदु अगर इतर धर्मीयांचें प्रतिनिधित्व करील......या करितां प्रत्येक कॉंग्रेसजनाला दुसऱ्या परधर्मीयांच्या बरोबर व्यक्तिगत मित्रता कायम केली पाहिजे आणि वाढविली पाहिजे. त्यानें दुसऱ्यांच्या धर्माविषयीं स्वतःच्या धर्माइतकाच आदर बाळगला पाहिजे......"

## २ अस्पृश्यतानिवारण.

"......कांहीं कॉंग्रेसजन तर या कार्याची केवळ राजकारणाच्या दृष्टीनें गरज आहे असें समजतात. त्यांना असें वाटत नाहीं कीं, हिंदूंना

आपल्या धर्मांचें रक्षण करण्याकरितां त्याची आवश्यकता आहे. कॉंग्रेस-वाला हिंदु जर हें काम शुद्ध भावनेनें आपल्या हातीं घेईल, तर सनातनी म्हणणाऱ्या लोकांवर जो आजपर्यंत परिणाम झाला आहे, त्याच्यापेक्षां अधिक परिणाम होईल......प्रत्येक हिंदूनें हरिजनांना जवळ केलें पाहिजे, त्यांच्या सुखदुःखांत भाग घेतला पाहिजे आणि त्यांच्यांत जाऊन त्यांच्याशीं मैत्री केली पाहिजे."

## ३ दारूबंदी.

"......आणि जर आपल्याला अहिंसात्मक प्रयत्नद्वारा आपलें ध्येय गाठावयाचें असेल, तर जे लाखों स्त्रीपुरुष दारु, अफू वगैरे नशा आणणाऱ्या व्यसनांना बळी पडले आहेत, त्यांचें भवितव्य आपल्याला सरकारच्या हातीं सोपवितां येणार नाहीं. ज्या ठिकाणीं थकल्या भागलेल्या मजुरांना विश्रांति मिळेल, त्यांना स्वास्थ्यपूर्ण आणि स्वस्त फराळाचे पदार्थ मिळतील, आणि त्यांनां योग्य अशा खेळांची व्यवस्था असेल अशीं विश्रांति-गृहें कॉंग्रेस कमिट्यांनीं उघडावीं......हें सारें कार्य चित्ताकर्षक आणि उन्नतिकारक आहे. स्वराज्याच्या बाबतींत अहिंसक दृष्टि, नेहमींच नावीन्यपूर्ण आहे. त्यांत पुराण्या मूल्यांच्या ठिकाणीं नवीं मूल्यें येतात."

## ४ खादी.

"......खादी देशांतल्या सर्व प्रजाजनांच्या आर्थिक स्वातंत्र्याची आणि समानतेच्या आरंभाची सूचक आहे......खादीचा स्वीकार होण्या-बरोबरच तींत अंतर्भूत होणाऱ्या सर्व गोष्टींचा स्वीकार झाला पाहिजे. खादीचा अर्थ सर्वव्यापी स्वदेशी भावना. जीवनाच्या साऱ्या आवश्यकता हिंदुस्थानांतूनच, आणि त्यापेक्षांहि ग्रामवासियांच्या कष्ट आणि बुद्धिद्वारें प्राप्त करण्याचा निश्चय........याकरितां बऱ्याच लोकांच्या मनोवृत्ति आणि अभिरुचीमध्यें क्रांतिकारी परिवर्तन होणें जरूर आहे. अहिंसक मार्ग कांहीं बाबतींत सोपा आहे, पण दुसऱ्या पुष्कळ गोष्टींत फार बिकटहि आहे. ती ( खादी ) प्रत्येक भारतवासीयाच्या जीवनाला स्पर्श करते, त्यांत

(जीवनांत) सुप्त असलेल्या शक्तीचें तेज प्रज्वलित करते, आणि भारतीय महामानव-सागरांतील थेंबाथेंबाशीं तादात्म्य पावल्याचा अभिमान हृदयांत जागृत करते. ती निष्प्राण नाहीं, तर उलट मानवी जीवन ज्यावर अवलंबून आहे, त्या आजपर्यंतच्या सर्व ज्ञात शक्तीपेक्षां अधिक प्रभावशाली शक्ति आहे. मीं काँग्रेसला, आणि तिच्या संबंधित जगाला हीच भेट देण्याचा प्रयत्न केला आहे. मला, खादी भारतीय मानवतेच्या ऐक्याची, तिच्या आर्थिक स्वातंत्र्य आणि समानतेची प्रतीक वाटते...... खादी मनोवृत्ति याचा अर्थ जीवनाच्या गरजांच्या उत्पादनाचें आणि विभाजनाचें विकेन्द्रीकरण होय......"

## ५ दुसरे ग्रामोद्योग.

"हे उद्योग खादीचे अनुचर आहेत. ते (ग्रामोद्योग) खादीशिवाय भरभराटीस येणार नाहींत. आणि त्यांच्या शिवाय खादीचें महत्त्व नष्ट होईल. हात-दळण, हात-सडणें, साबण तयार करणें, आगकाड्या बनविणें, चामडें कमावणें, तेल गाळणें वगैरे आवश्यक ग्रामोद्योगांशिवाय ग्रामीण अर्थव्यवस्था पूर्ण होऊं शकत नाहीं......जेथें जेथें आणि जेव्हां जेव्हां खेडेगांवांत तयार झालेल्या वस्तु मिळूं शकतात, तेव्हां त्यांचा तेथें उपयोग करणें प्रत्येकानें आपलें कर्तव्य मानलें पाहिजे."

## ६ गांवसफाई.

"बुद्धि आणि श्रम यांच्या फारकतीमुळें खेडेगांवांच्या अवहेलनेचा अपराध आपल्या हातून झाला आहे, आणि त्यामुळें साऱ्या देशांत जेथें तेथें रमणीय गांवा ऐवजीं उकिरडे दिसत आहेत! आणि जर काँग्रेसजन खेडेगांवांतून अधिक आले आहेत......तर त्यांच्यांत त्यांच्या गांवांनां प्रत्येक बाबतींत स्वच्छतेचा आदर्श बनविण्याची समर्थता पाहिजे. पण खेडेगांवाच्या दैनंदिन जीवनांत समरस होणें, हें त्यांनीं कधीं कर्तव्य मानलें आहे?......आपण कसेंबसें स्नान करतों, पण आपण ज्या विहिरीवर, तलावावर अगर नदीवर आंघोळ करतों, धुतों, त्यामुळें होणारी घाण आपण वाईट समजत नाहीं! मी ह्या दोषाला एक महान् दुर्गुण मानतों......"

## ७ नीति अर्थात खरें शिक्षण.

"हा नवा विषय आहे......ह्या शिक्षणाचा उद्देश खेडेगांवांतील बालकांना आदर्श ग्रामवासी बनवणें. त्याचें प्रयोजन या करितांच आहे. त्याची प्रेरणा खेड्यांतून मिळाली आहे......प्रचलित प्राथमिक शिक्षण हा एक देखावा आहे. त्यात ग्रामीण भारताच्या आवश्यकतांची गरज मुख्यतः राखलेली नाहीं वा शहरी गरजांचीहि नाहीं. अस्सल शिक्षण शहरांतील आणि खेड्यांतील बालकांना भारतांतील उत्कृष्ट आणि चिरस्थायी तत्त्वें आत्मसात् करावयाला लावतें .. ."

## ८ प्रौढ-शिक्षण.

"......जर प्रौढ शिक्षण माझ्याकडे सोपविलें तर मी माझ्या प्रौढ विद्यार्थ्यांत पहिल्या प्रथम आपल्या देशाच्या मोठेपणाची आणि विशालतेची भावना जागृत करेन. खेडवळांचा हिंदुस्थान त्यांच्या गांवाच्या सीमेपर्यंत असतो......त्यांच्या बाबतींत हिंदुस्थान एक भौगोलिक संज्ञा आहे. खेड्यांत जें अज्ञान पसरलें आहे, त्याची आपल्याला कल्पना नाहीं......माझ्या मतें प्रौढ शिक्षणाचा अर्थ, पहिल्या प्रथम, प्रौढांना, खरें राजनैतिक शिक्षण तोंडीं दिलें जाईल......."

## ९ स्त्रियांची उन्नति.

"स्त्री अशा कायद्यांनीं आणि रूढींनीं दबलेली आहे कीं, त्याला पुरुष जबाबदार आहेत. त्यांत स्त्रीची कसूर नाहीं. जितका पुरुषाला अधिकार आहे, तितकाच अहिंसेच्या पायावर रचलेल्या समाजव्यवस्थेंत, स्वतःचें भविष्य ठरविण्याचा अधिकार स्त्रीला आहे. परंतु अहिंसक समाजांत प्रत्येक अधिकार कर्तव्यपालनांतून उत्पन्न होतो. याकरितां, सामाजिक व्यवहाराचे नियम परस्पर-सहकार्य आणि विचार-विनिमयानें ठरविलें जाणें क्रमप्राप्त आहे. ते कधीं बाहेरून लादले जाऊं शकत नाहींत. स्त्रियांच्या बाबतींतील व्यवहारांत पुरुषांनीं हें सत्य पूर्णपणें जाणलेलें नाहीं. स्त्रियांना आपला मित्र आणि सहकारी समजण्याच्या ऐवजीं त्यांनीं (पुरुषांनीं) स्वतःला त्यांचा (स्त्रियांचा) स्वामी आणि शासक मानलें

आहे. भारतांतील स्त्रीजातीच्या प्रगतीला मदत करणें, हें कॉंग्रेसजनांचें विशेष कर्तव्य आहे......"

## १० आरोग्य आणि स्वच्छतेचें शिक्षण.

"...... ही गोष्ट निःसंदिग्ध खरी आहे कीं, मनुष्यजातीला होणारे बरेचसे रोग, आरोग्य आणि स्वच्छतेचे नियम न पाळल्यामुळें होतात. आपल्या येथील मृत्युसंख्येच्या सर्वांत मोठ्या प्रमाणाला आम्हांला चिकटलेलें दारिद्र्य कारणीभूत आहे, पण जर जनतेला स्वच्छता आणि आरोग्य यांचें योग्य शिक्षण दिलें जाईल, तर हें प्रमाण घटणें शक्य आहे...... 'निरोगी शरीर, निरोगी मन' हा मानवतेचा पहिला कायदा आहे...... शरीर आणि मन यांचा अनिवार्य संबंध आहे......स्वच्छता आणि आरोग्य यांचे मूलभूत नियम साधे व सरळ आहेत......नियम असे आहेत:—

> अत्यंत शुद्ध विचार ठेवा. सारे नष्ट आणि अपवित्र विचार काढून टाका.
>
> रात्रंदिवस अत्यंत ताज्या हवेंत रहा.
>
> शारीरिक आणि मानसिक श्रमांची समतोलता ठेवा.
>
> सरळ उभे रहा, सरळ बसा, आपल्या कामांत नीटनेटके रहा. या सर्व गोष्टींत आपलें व्यक्तित्व दिसलें पाहिजे.
>
> आपल्या बांधवांची सेवा करण्याकरितां खा. भोग-विलासांकरितां जगूं नका. आपला आहार इतकाच असूं दे कीं, आपलें मन आणि शरीर व्यवस्थित राहील. माणूस जसा खातो तसा बनतो.
>
> आपलें पाणी, अन्न आणि हवा स्वच्छ असलीं पाहिजेत. आणि आपल्या फक्त व्यक्तिगत स्वच्छतेनें संतोष मानतां कामा नये. उलट जी त्रिविध स्वच्छता आपल्याला पाहिजे, तिनें आपलें सभोवतालचें वातावरण भरलें पाहिजे."

### ११ राष्ट्रभाषा-प्रचार.

"......इंग्रजीनें आमच्यावर जी मोहिनी घातली आहे, ती अजून नष्ट झाली नाहीं. त्यामुळें आपण हिंदुस्थानच्या, त्याच्या ध्येयाच्या—प्रगतीच्या मार्गांत अडथळा आणत आहोंत. आपण इंग्रजी शिकण्यांत जितकीं वर्षें घालवितों तितके महिने जर हिंदी शिकण्यांत घालविण्याचे कष्ट घेतले नाहींत, तर जनतेवरील आपलें प्रेम वरकरणी ठरेल."

### १२ स्वभाषाप्रेम.

"......आपल्या मातृभाषेपेक्षां इंग्रजीवरील विशेष प्रेमानें सुशिक्षित आणि राजकारणी वृत्तीच्या वर्गांत म्हणजे जनतेंत एक अत्यंत खोल फट पडली आहे. हिंदुस्थानांतील भाषा श्रीहीन झाल्या आहेत...... जोंपर्यंत आपण ह्या अनर्थाचें निराकरण केलें नाहीं, तोंपर्यंत जनतेची बुद्धि परावलंबी राहील."

### १३ आर्थिक समानतेकरितां प्रयत्न.

"ही शेवटची गोष्ट अहिंसक स्वतंत्रतेची गुरुकिल्ली आहे, असें मानावयाला हरकत नाहीं. आर्थिक समानतेचा प्रयत्न म्हणजे संचित धन आणि श्रम यांतील शाश्वत विरोधाचा परिहार करणें. याचा अर्थ हा कीं, एका बाजूनें ज्या मूठभर धनाढ्य लोकांच्या हातांत राष्ट्राच्या संपत्तीचा मोठा भाग एकत्र झाला आहे तो गरिबांत विभागला जाईल, आणि जे कोट्यवधि लोक पुरेशा अन्नवस्त्राशिवाय आहेत, त्यांची स्थिति उन्नत होईल......प्रत्येक काँग्रेसजनानें स्वतःला असा प्रश्न केला पाहिजे कीं, त्यानें आर्थिक समानतेच्या संस्थापनेकरितां काय केलें ?"

—बारडोली १३-१२-४१.

---

# १७ माझ्याविषयीं

## ( आत्मदर्शन )

### आत्मदर्शन आवश्यक आहे.

"......जी गोष्ट मला करावयाची आहे—आज ३० वर्षें ज्या करितां मी प्रयत्न करीत आहें, ती म्हणजे—आत्मदर्शन, ईश्वराचा साक्षा

त्कार, मोक्ष. माझ्या जीवनातली प्रत्येक गोष्ट, या दृष्टीनून होते. मी जें जें कांहीं लिहितों, तें सुद्धां याच उद्देशानें. आणि राजकारणाच्या क्षेत्रांत जें कांहीं मीं केलें, तें सुद्धां ही गोष्ट समोर ठेऊनच."

साबरमती, मार्गशीर्ष शुक्र ११ सं. १९८२.

## माझी महत्त्वाकांक्षा.

"मी भारतमाता आणि मनुष्य-जाति यांचा एक नम्र सेवक आहें, आणि अशी सेवा करतां करतां मृत्यु पावणें मी पसंत करीन."

"पण मला संप्रदाय स्थापन करण्याची कांहीं इच्छा नाहीं. खरें विचाराल तर, माझी महत्त्वाकांक्षा इतकी विशाल आहे कीं, कांहीं अनुयायांचा एखादा संप्रदाय स्थापन करण्यानें ती तृप्त होऊं शकणार नाहीं. मीं कोणत्याहि नवीन सत्याचा आविष्कार केला नाहीं; उलट मी सत्य ज्या स्वरूपांत ओळखतों, त्याप्रमाणें वागण्याचा आणि लोकांना दाखविण्याचा प्रयत्न करीत आहें. हो, प्राचीन सत्य-सिद्धांतावर नवा प्रकाश पाडण्याचा माझा हेतु जरूर आहे."

—हिं. न. जी. २६-८-२१.

## मी कोण आहें?

"मी तर एक विनम्र सत्यशोधक आहें. मी अधीर झालों आहें. या जन्मांत आत्म-साक्षात्काराची, मोक्ष प्राप्त करण्याची मी इच्छा करीत आहें. मी माझ्या देशाची सेवा करीत आहें. ती सेवा तर त्या साधनेचें एक अंग आहे. तिच्या द्वारा मी ह्या पञ्चभौतिक शरीरापासून माझ्या आत्म्याची मुक्ति इच्छीत आहें. या दृष्टीनें माझी देशसेवा केवळ स्वार्थ-साधना आहे. मला ह्या नाशवान् ऐहिक राज्याची कांहीं अभिलाषा नाहीं. मी तर ईश्वरीय राज्य प्राप्त करण्याचा प्रयत्न करीत आहें. तोच मोक्ष. आपल्या ह्या ध्येयाच्या सिद्धीकरतां मला गुहेचा आश्रय घेण्याची आवश्यकता वाटत नाहीं. सांगावयाचेंच झालें, तर गुहा मी बरोबर घेऊन फिरत आहें! गुहा-निवासी मनांत महालहि निर्माण करूं शकतो, पण जनकाप्रमाणें महालांत राहाणाऱ्याला महालाची जरुरी रहात नाहीं. जो

गुहा-निवासी, विचारांच्या पंखावर बसून जगांत फिरत आहे, त्याला शांति कसली ? पण जनक राजमहालांत आमोद-प्रमोदमय जीवन व्यतीत करत असतांना सुद्धा कल्पनातीत शांति प्राप्त करूं शकला. माझ्या मतें, आपल्या देशाची आणि त्याच्या द्वारा मनुष्यजातीची सेवा करण्याकरितां सतत प्रयत्न करणें, हाच मुक्ति-मार्ग. मी जगांतल्या भूतमात्रांशीं तादात्म्य पावूं इच्छितों. मी '**समः शत्रौ च मित्रे च**' होऊं इच्छितों. अशा प्रकारें, माझी देशभक्ति दुसरें कांहीं नसून, चिरमुक्ति आणि शांति-स्थानाच्या टप्प्यांतील एक विश्रामस्थान आहे. माझ्या मतें, धर्मशून्य राजकारण अशी कांहीं गोष्टच नाहीं. राजकारण धर्मामागून जातें. धर्महीन राजकारण हा एक फांस आहे. तें ( राजकारण ) आत्म्याचा नाश करतें."

—हिं. न. जी. ६–४–२४.

## माझा धर्म.

"माझा धर्म म्हणजे मी आणि ईश्वर यांमधली गोष्ट आहे. जर मी हिंदु असलों तर सारें जग सोडून जाण्यानेंहि माझें हिंदुपण नाहींसें होणार नाहीं."

## माझी इच्छा.

"मी गरिबांतल्या गरीब हिंदी जीवनामध्यें माझें जीवन मिळवूं इच्छितों. दुसऱ्या तऱ्हेनें मला ईश्वराचें दर्शन होणार नाहीं हें मला माहिती आहे. मला त्याला प्रत्यक्ष पाहावयाचें आहे, म्हणून मी अधीर झालों आहें. जोंपर्यंत गरिबांहून गरीब झालों नाहीं, तोंपर्यंत मला साक्षात्कार होणार नाहीं."

—हिं. न. जी. ३१–८–२४.

## मी मूर्तिपूजक आहें आणि मूर्तिभंजकहि आहें !

"......मी मूर्तिपूजकहि आहें, आणि मूर्तिभंजकहि आहें...... मूर्तिपूजेंत जी भावना आहे, तिच्या विषयीं मला आदर आहे. मानव-जातीच्या प्रगतीला तिचें अत्यंत सहाय्य होत आहे. आणि जीं ( देवालयें ) आपल्या ह्या जन्मभूमीला पवित्र करीत आहेत, त्या सहस्र देवालयांचें रक्षण, माझे प्राण अर्पण करूनहि करण्याचें मी पसंत करीन. जी

( मूर्तिपूजा ) आपल्या ईश्वरपूजेच्या विधीशिवाय दुसऱ्या लोकांच्या पूजाविधीमध्यें सुद्धां कांहीं पावित्र्य, मांगल्य आहे हें मानावयाचें नाकारते, तिच्यांत धर्मान्धतेच्या रूपांत सूक्ष्मतेनें लपून असलेल्या मूर्तिपूजेचें मी खंडन करतों. या अर्थानें मी मूर्तिभंजक आहें."

—हिं. न. जी. ३१–८–२४, पृष्ठ २०.

## स्वातंत्र्याची सीमा.

"......मला ठाऊक आहे कीं, मी परिस्थितीच्या अधीन आहें—देश आणि कालाच्या अधीन आहें. तरी सुद्धां परमेश्वरानें मला कांहीं स्वातंत्र्य दिलें आहे, आणि मी त्याचें रक्षण करीत आहें. मला असें वाटतें कीं, धर्म आणि अधर्म यांची परीक्षा करून, त्यांतील मला जें पसंत आहे, तें ग्रहण करण्याचें स्वातंत्र्य मला आहे. मला असें कधींच वाटलें नाहीं कीं, मी स्वतंत्र नाहीं. पण हें निश्चित करणें कठीण आहे कीं, कोणतें कार्य करण्याचें स्वातंत्र्य, आपलें रूप बदलून कर्तव्य केव्हां होतें. अवशता आणि परवशता यांची सीमा फारच सूक्ष्म आहे."

—हिं. न. जी. १४–१२–२४, पृष्ठ १४२, मानस शास्त्राच्या एका अमेरिकन अध्यापकाशीं चर्चा करीत असतांना.

## माझें क्षेत्र.

"......माझें क्षेत्र निर्माण झालें आहे. तें मला प्रियहि आहे. मी अहिंसेच्या मंत्रावर मुग्ध झालों आहें. माझा तो परिस आहे. दुःखी भारताला अहिंसेचा मंत्रच शांति देईल, हें मला ठाऊक आहे. माझ्या मतें अहिंसेचा मार्ग भ्याड अगर नामर्दांचा नाहीं. अहिंसा क्षत्रिय धर्माची परिसीमा आहे, कारण तीमध्यें अभयाच्या सोळाहि कला, सोळा आणे विकसतात. अहिंसा-धर्मपालनांत, पलायन अथवा पराभव यांना जागाहि नाहीं. तो आत्म्याचा धर्म आहे, आणि म्हणून दुःसाध्य नाहीं. जो जाणतो, त्याच्यांत सहज स्फुरित होतो......"

—हिं. न. जी. ८–१–२५.

## मी तिरस्कार करूं शकत नाहीं.

"......मीं अनेक वेळा हें पाहण्याचा प्रयत्न केला आहे कीं, मी शत्रूचा तिरस्कार करूं शकतों कीं नाहीं—आपण हें पाहावयाचें नाहीं कीं, मी प्रेम करूं शकतों कीं नाहीं. हें पाहावयाचें कीं, मी तिरस्कार करूं शकतों कीं नाहीं—आणि मला प्रामाणिकपणें पण पूर्ण नम्रतेनें सांगितलें पाहिजे कीं, मी त्याचा ( शत्रूचा ) तिरस्कार करतों हें ( मला ) कळलें नाहीं. ही अवस्था कशा तऱ्हेनें प्राप्त झाली आहे, हें मी समजूं शकलों नाहीं. आपल्याला हें सांगतों कीं, आयुष्यभर मी असेंच आचरण करत आलों आहें."

—हिं. न. जी. २७-८-२५, पृष्ठ ९.

## माझ्या नांवाचा दुरुपयोग.

" ......माझ्या नांवाच्या दुरुपयोगाची हकिगत फार मोठी आहे. माझ्या नांवावर माणसांचे वध झाले आहेत, माझ्या नांवावर असत्याचा प्रचार झाला आहे. माझ्या नांवावर विड्या विकल्या जातात, कीं ज्यांचा मी शत्रु आहें. माझ्या नांवावर औषधें विकलीं जातात......एका इंग्रज लेखकानें म्हटलें आहे कीं, जेथें मूर्खांची, अडाण्यांची संख्या अधिक असते, तेथें धूर्त, धोकेबाज उपाशी मरत नाहीं. या सत्य गोष्टीचा कोणाला अनुभव नाहीं ? मीं अनेक वेळा सांगितलें आहे कीं, माझ्या नांवाच्या उपयोगानें कोणी संकटांत पडतां नये. प्रत्येक गोष्टीच्या गुण-दोषाचा विचार स्वातंत्र्य-पूर्वक करा."

—नवजीवन, हिं. न. जी. २४-९-२५ पृष्ठ ४२

[ एक चहा कंपनी गांधीजींच्या नांवाचा आपल्या प्रचारामध्यें दुरुपयोग करीत होती, त्याला उद्देशून गांधीजींनीं हें लिहिलें. ]

## "मी तर ईश्वराची वाट पाहात आहें."

"जर भारतवर्ष आणि त्याचे नेते मला कंटाळले असतील, तर आतां मला फक्त हिमालयाचाच मार्ग मोकळा आहे. हिमालय म्हणजे धवलगिरि नव्हे. तर माझ्या हृदयाचा हिमालय. त्याच्या गुहेंत बसणें

मला तर अगदीं सोपें आहे. त्याला सुद्धा मी शोधावयाला जाणार नाहीं, तो माझा शोध काढील. जो भक्त आहे, तो ईश्वराजवळ जात नाहीं. आणि जर गेला तर त्याला त्याचें (ईश्वराचें) तेज सहन होऊं शकत नाहीं. म्हणून ईश्वरच भक्ताजवळ जातो, आणि त्याची (भक्ताची) जशी भावना असते, तसें त्याला दर्शन देतो. माझ्या देवाला ठाऊक आहे कीं, मी त्याची वाट पाहात आहें. मला तर त्याचा आदेशच पुरे आहे.

कश्या धाग्यानें मला हरीनें बाधलें आहे, ज्या तऱ्हेनें पाहिजे त्या तऱ्हेनें मी त्याला खेंचेन."

—हिं. न. जी. २४-१२-२५, पृष्ठ १४७.

## माझें अविभाज्य अंग.

"...... माझें माहात्म्य खोटें आहे. तें तर माझें, माझ्या बाह्य प्रवृत्तीनें—माझ्या राजकारणामुळें प्राप्त झालें आहे. तें क्षणिक आहे, माझा सत्य, अहिंसा. आणि ब्रह्मचर्य यांच्याविषयीं असलेला आग्रह, हेंच माझें अविभाज्य आणि सर्वांत मूल्यवान अंग आहे. त्यांतील मला जें कांहीं ईश्वरदत्त प्राप्त झालें आहे, त्याची चुकूनहि अवज्ञा होतां नये, त्याच्यांत माझें सर्वस्व आहे. त्याच्यांत दिसणारी निष्फलता सफलतेची पायरी आहे. या करितांच निष्फलता मला प्रिय आहे."

—हिं. न. जी. १८-२-२५, पृष्ठ २१५.

## ईश्वराची साक्ष.

"........ छातीवर हात ठेऊन मी सांगूं शकतों कीं, एक मिनिट सुद्धां मी ईश्वराला विसरत नाहीं. गेलीं वीस वर्षें मीं सर्व कामें अशीं केलीं आहेत कीं, साक्षात् ईश्वर माझ्या समोर उभा आहे."

—हिं. न. जी. १०-२-२७.

## "भक्ति आणि प्रार्थना माझा आधार आहे."

"........ मी निश्चयपूर्वक सांगतों कीं, माझा एक मात्र आधार भक्ति आणि प्रार्थना आहे, आणि जरी माझे तुकडे तुकडे केले तरी सुद्धां

परमात्मा मला अशी शक्ति देईल कीं, ती ( भक्ति—प्रार्थना ) करणें, मी नाकारणार नाहीं—हेंच जोरानें सांगेन कीं भक्ति—प्रार्थनाच माझा आधार आहे."

—हिं. न. जी. १५–१२–२९, पृष्ठ १३३.

## माझ्या जीवनाचा नियम.

"......माझ्या बाबतींत अहिंसा हा केवळ दार्शनिक सिद्धांत नाहीं. तो तर माझ्या जीवनाचा नियम आहे. त्याच्याशिवाय मी जगूं शकत नाहीं. अनेक वेळां चेतनावस्थेमध्यें, त्याच्यापेक्षां अनेक वेळां अचेतनावस्थेमध्यें, माझा तोल जातो, हें मी जाणतों. हा प्रश्न बुद्धीचा नाहीं, तर हृदयाचा आहे. सन्मार्ग तर, परमात्म्याच्या सतत प्रार्थनेनें, अतिशय नम्रतेनें, आत्मविलोचनानें, आत्मत्याग करण्यास नेहमीं तयार राहण्यानें मिळतो. त्याच्या साधनेकरितां, अत्यंत श्रेष्ठ प्रकारची निर्भयता आणि साहस यांची आवश्यकता आहे. माझी निर्बलता मी ओळखतों, आणि मला त्याचें दुःख होतें."

—हिं. न. जी. २९–९–२८, पृष्ठ ३६.

## 'संप्रदायप्रवर्तक नाहीं.'

"......गांधीवाद अशी कांहीं गोष्ट माझ्या डोक्यांतच नाहीं. मी कांहीं संप्रदाय-प्रवर्तक नाहीं. तत्त्वज्ञानी होण्याचा मीं कधीं आग्रहहि धरला नाहीं. माझा तो प्रयत्नहि नाहीं. कांहीं लोकांनीं मला सांगितलें कीं, तुम्ही "गांधी-विचार" म्हणून एक स्मृति लिहा. मीं म्हटलें, स्मृतिकार कोठें आणि मीं कोठें?......स्मृति लिहिण्याचा अधिकार माझा नाहीं. जें होईल, तें माझ्या मृत्यूनंतर होईल."

—गां. से. सं. संमेलन, सावली, ३–३–३६.

## 'ईश्वराच्या मांडीवर.'

"......मीं माझीं अनेक पापें अत्यंत स्पष्ट रूपांत मान्य केलीं आहेत. पण नेहमीं त्यांचा बोजा खांद्यावर घेऊन फिरत नाहीं......मी

असें मानतों कीं, मी ईश्वराकडे जात आहें, म्हणून मी सुरक्षित आहें. कारण त्याच्या अस्तित्वाच्या प्रखर प्रकाशाचा मी अनुभव घेत आहें. मला ठाऊक आहे, कीं जर मी आत्म-सुधारणेकरितां आत्मदमन, उपवास आणि प्रार्थना यांवर अवलंबून राहिलों तर फायदा होणार नाहीं. पण अशी माझी खात्री आहे कीं, ह्या गोष्टी माझ्या ईश्वराच्या मांडीवर माझें चिंताकुल मस्तक ठेवण्याची आत्म्याची आकांक्षा व्यक्त करतात, तेव्हां त्यांचेंहि महत्त्व आहे."

—ह. से. १८-४-३६, पृ. ६९.

## माझा विकास होत आहे.

"......माझे विचार सुधारले आहेत कीं, बिघडले आहेत, याचा आपल्याला स्वतंत्रपणें विचार केला पाहिजे......मी दररोज विकास पावत आहें आणि माझें विचारक्षेत्र रोज विस्तृत होत आहे. आपल्याला हें पाहिलें पाहिजे कीं, विकास योग्य तऱ्हेनें होत आहे कीं नाहीं. स्वतंत्रपणें आपण विचार केला नाहीं तर आपण हें सर्व करूं शकणार नाहीं. आपण माझ्या नांवाला अशा तऱ्हेनें चिकटून राहिलांत तर जग आपल्याला हंसेल......."

"सत्य आणि अहिंसेवर माझी श्रद्धा वाढत आहे. आणि माझ्या आयुष्यांत मी जसजशी ती अमलांत आणीत आहें तस-तसा माझा विकास होत आहे. त्या बरोबरच विचारांत नावीन्य येत आहे......माझ्या बुद्धीचा विकास होत आहे. सत्य आणि अहिंसेविषयीं तिच्या समोर नव्या नव्या गोष्टी येत आहेत. त्यांतून मी नवा प्रकाश पहात आहें. रोज नवा अर्थ दिसत आहे. यामुळेंच मी चरखासंघ, हरिजनसेवकसंघ आणि ग्रामोद्योगसंघ या संस्थांसमोर नवे नवे विचार ठेवत आलों आहें. याचा अर्थ हा कीं, त्या संस्था आणि त्यांचे संचालक जिवंत आहेत. आणि वृक्षाप्रमाणें त्या नेहमीं बदलत राहतील. नव्या नव्या होतील. त्यांचा गुण हाच आहे कीं, त्या प्रगत होतील, गतिमान होतील, नाहीं तर

त्या कोसळतील. मला असें वाटतच नाहीं कीं, मी कोसळत आहें. माझी इच्छा आहे कीं, आपणहि माझ्या बरोबर विकास पावाल."

—तृतीय गां. से. सं. संमेलन, हुदली, १६-४-३७.

## ईश्वराचें अनेकविध दर्शन.

"......माझा देव माझ्या जवळ सहस्र रूपानें आहे. कधीं मी त्याचें दर्शन चरख्यात घेतों, कधीं हिंदु-मुस्लिम ऐक्यामध्यें, कधीं अस्पृश्यता-निवारणांमध्यें घेतों. माझी भावना मला जेव्हां ज्या रूपाकडे खेंचते, तेव्हां त्या रूपाकडे मी जातों. जेथें जावेंसें वाटतें तेथें जातों. आणि तेथें माझ्या देवाचें सांन्निध्य मिळवतों."

—गां. से. सं. संमेलन, हुदली २०-४-३७.

## एक प्रयत्नशील क्षुद्र जीव आहें.

"विचार, उच्चार आणि आचार यांमध्यें अत्यंत शुद्ध, सत्यानिष्ठ आणि अहिंसक बनण्याकरितां तळमळणाऱ्यांपैकीं मी एक प्रयत्नशील क्षुद्र जीव आहें. मी त्या आदर्शाला सत्य मानतों. पण तेथपर्यंत पोहोंचण्यांत निरंतर अयशस्वी होत आहें. ही फारच बिकट चढाई आहे, पण या चढाईत होणाऱ्या कष्टांत मी खरा अनुभव अनुभवीत आहें. प्रत्येक पावलाला, जसा मी वर जात आहें, तसें मला अधिकाधिक सामर्थ्याचा आणि योग्यतेचा प्रत्यय होत आहे.

—सर्वोदय, ऑक्टोबर ३८.

## प्रेमाचा वाडगा.

"तलवार उपयोगात आणण्याविषयीं जे मला विरोध करतात त्यांच्याकरितां माझ्याजवळ प्रेमाच्या वाडग्याशिवाय कांहीं नाहीं. तो वाडगा त्यांच्या समोर ठेवूनच मी त्यांना माझ्या जवळ खेंचूं शकतों. माणसा-माणसांत मी कायम वैराची कल्पनाच करूं शकत नाहीं. माझा पुनर्जन्मावर विश्वास आहे. आणि मी अशा आशेनें जगत आहें कीं, या जन्मीं नाहीं तरी दुसऱ्या कोणत्या तरी जन्मीं, मी आपल्या प्रेमपूर्ण आलिंगनांत साऱ्या मानवतेला जवळ करीन."

—सर्वोदय, सप्टेंबर १९३८.

## मी सर्वांचा आहें आणि कोणाचाही नाहीं.

" मी समाजवाद मानतों, आणि साम्यवाद सुद्धा मानणारा आहें. मी सर्वांना मानतों, पण माझ्या दृष्टीनें मानतों. मी सर्वांचा आहें आणि कोणाचाहि नाहीं."

—मालिकांदा (बंगाल) २१-२-४०.

## मी एक वैज्ञानिक शोधक आहें.

"......मी अढळ आशावादी आहें. कोणी वैज्ञानिक, कमकुवतपणानें आपल्या प्रयोगाला आरंभ करीत नाहीं. मी त्या कोलंबस, स्टिव्हेंसन्च्या पंथांतला आहे कीं, ज्यांनीं अत्यंत कठीण परिस्थितींत, निराशेंत सुद्धां आपली आशा कायम राखली. चमत्कारांचें युग अजून संपलें नाहीं. जोंपर्यंत ईश्वर आहे, तोंपर्यंत चमत्कार होतच राहतील."

—सेवाग्राम, ९-६-४०.

## ईश्वरानें मला कां निवडलें ?

"......त्यांना ( आपल्या चुकांना ) मी स्थितप्रज्ञ होऊन पहातों, मला त्याचें प्रत्यक्ष दर्शन होत आहे, कारण मी अनासक्त आहें. त्या चुकामुळें मला दुःख होत नाहीं किंवा पश्चात्ताप होत नाहीं. ज्याप्रमाणें माझें यश आणि शक्ति मी परमात्म्याच्या देणग्या समजतों, आणि त्यालाच अर्पण करतों, त्याप्रमाणें माझे दोषहि ईश्वराच्या चरणीं ठेवतों. ईश्वरानें माझ्या सारख्या अपूर्ण माणसाला इतक्या महान् प्रयोगाकरितां कां निवडलें ? मी अहंकारानें सांगत नाहीं, पण माझा पूर्ण विश्वास आहे कीं, ईश्वराला गरिबांच्या मध्यें कांहीं कार्य करावयाचें होतें, त्याकरितां त्यानें मला निवडलें. माझ्यापेक्षा अधिक पूर्ण माणूस असता, तर इतकें काम करूं शकला नसता. पूर्ण मनुष्याला हिंदुस्थान ओळखूंच शकला नसता. तो बिचारा विरक्त होऊन गुहेंत गेला असता. यामुळेंच ईश्वरानें माझ्या सारख्या दुबळ्या आणि अपूर्ण माणसाला ह्या देशांत कार्य करण्याकरितां योग्य मानलें. आता माझ्या नंतर जो येईल, तो पूर्ण मनुष्य असेल."

—गांधीसेवासंघाची सभा, वर्धा, २२-६-४०.

# १८ रत्नकण

## १

## वीर-वाणी

### दगडाचें शरीर.

" जो आपलें शरीर दगडासारखें ( कणखर ) राखतो, तो एका जागेवर बसून, साऱ्या जगाला हलवतो."

### दगडांत मानव आणि ईश्वराचें मीलन.

" मनुष्यांत दगड आणि ईश्वर या दोहोंचें एक मीलन झालेलें असतें. माणूस म्हणजे काय? चेतनामय दगड."

—नवजीवन. १९२१.

x x x

" आपल्या राष्ट्रीय इतिहासाच्या या युगांत निर्जीव यंत्रासारख्या बहुमताचा कांहीं उपयोग नाहीं."

x x x

" या जगांत, स्वतंत्रता ही सर्वांत अधिक चंचल आणि स्वच्छंद स्त्रीप्रमाणें आहे. या जगांत, ती महान् मोहिनी आहे. तिला प्रसन्न करणें फार कठिण काम आहे. तिचें मंदिर, तुरुंगांत म्हणजे इतक्या उंचीवर आहे कीं, जेथें जातां जातां नेत्रांसमोर अंधेरी येते. तुरुंगांच्या भिंती चढून, हिमालयाच्या शिखराप्रमाणें उंचीवर असलेल्या मंदिरापर्यंत जाण्याच्या आशेनें, काट्याकुट्यांच्या बिकट मार्गांतून रक्तबंबाळ पायानें, आपण मजल करीत असलेले पाहून, ती खदखदून हंसते."

" कौन्सिलें हीं वज्रहृदयाचीं माणसें तयार करण्याचे कारखाने नाहींत. जोंपर्यंत आपल्याकडे स्वातंत्र्यरक्षणार्थ वज्रहृदय नाहीं, तोंपर्यंत स्वातंत्र्य अत्यंत दूषित वस्तूप्रमाणें आहे."

—हिं. न. जी. १८–१२–२१.

“ जो मनुष्य माराच्या भीतीनें शिवी सहन करतो, तो मनुष्य नाहीं—पशुहि नाहीं. ”

× × ×

“ या वेळीं, भारतवर्ष शौर्याचा धडा गिरवीत आहे. जर धडा पूर्ण झाला, तर स्वराज्य हातावर ठेवलेलें आहे. ”

× × ×

“ आत्म-संयमन हें स्वराज्य अर्थात् आत्म-शासनाची किल्ली आहे. ”

× × ×

“ मरण्याची शक्ति तर सर्वांत आहे, पण सर्वांना त्याची इच्छा होत नाहीं. ”

—हिं. न. जी. १५-१-२२, पृष्ठ १७६.

## “ मृत्यु क्रांति आहे. जीवन विकास आहे. ”

“ राष्ट्राची उन्नति विकास आणि क्रांति या दोहोंनीं होत आहे. दोन्ही एकाच वेळीं आवश्यक आहेत. मृत्यु शाश्वत सत्य आहे—क्रांति आहे. जन्म म्हणजे जीवन आहे—हळू हळू आणि स्थिरपणें होणारा विकास आहे. मनुष्याच्या उन्नतीकरितां प्रत्यक्ष जीवन जितकें आवश्यक आहे, तितकाच मृत्यु सुद्धां आवश्यक आहे.........इतिहासांत शांतिमय मार्गानें घडलेल्या प्रगतिप्रद घटनांच्या ऐवजीं क्रांतीचींच उदाहरणें अधिक सापडतात. ”

—हिं. न. जी. ५-१२-२२.

## स्वराज्य एक मनोदशा.

“ स्वराज्य तर एक मनोदशा आहे. जर या मनोदशेची प्रस्थापना हृदयांत होईल, तर ती मूर्तस्वरूपांत येईल. ”

—हिं. न. जी. २२-१-२२, पृष्ठ १९३.

## असभ्यता हिंसा आहे.

“ असभ्यता एक प्रकारची हिंसा आहे ”

— हिं. न. जी. २९-१-२२, पृष्ठ १९३.

## चौरीचौरा.

" चौरीचौरा, देशाच्या हिंसा-वृत्तीचें एक परिणत चिन्ह आहे. "

—हिं. न. जी. १९-२-२२.

## जीवाशीं खेळणाराच जीव वांचवूं शकतो.

" ...... मनुष्य प्राणांवर जितका उदार होतो, तितका तो अधिक वांचतो. "

—हिं. न जी. ८-३-२५.

# २

# जीवन-कण

## " नकली मर्द "

" ...... जो आपला नामर्दपणा कबूल करतो, तो कोणत्या ना कोणत्या दिवशीं मर्द होणें शक्य आहे. पण उगाच मर्द असल्याचा जो भाव आणतो, तो कधींहि मर्द होणार नाहीं. "

## " सिंहांची संस्था कोठें आहे ? "

" ...... ही संस्था बकऱ्यांची आहे, सिंहांची नाहीं. सिंहांची संस्था कोणीं ह्या जगांत पाहिली आहे ? "

## " वीरता "

" राजपुतान्याचा इतिहास वाचून हें शिका कीं, वीराचा एकहि शब्द खोटा पडत नाहीं. वीरता बडबडण्यांत नाहीं, परंतु ती ( बडबड ) खोटी न पडूं देण्यांत आहे. "

## " आत्मअंकुश "

" दुसऱ्यानें टोचलेला अंकुश अधःपात करणारा असतो, स्वतःचा अंकुश प्रगति करणारा असतो. "

## " सर्वस्वार्पणाशिवाय सेवा नाहीं. "

" सेवा करणाऱ्यानें आपली लाज, अब्रू, मानादि सर्वस्वाचा होम करून जनतेची सेवा करण्याचा पण केला पाहिजे."

—हिं. न. जी. ९–२–२८.

# ३

# ज्ञान-कण

## तपस्येचा महिमा.

" प्रामाणिकपणानें केलेले कष्ट जर प्रामाणिकपणें सहन केले तर ते पाषाणासारख्या हृदयाचें सुद्धां पाणी-पाणी करतात. कष्टसहन करण्याचा म्हणजे तपस्येचा महिमाच असा आहे. तीच सत्याग्रहाची किल्ली आहे."

—द. आफ्रिकेचा सत्याग्रह, १९२१–२३.

## लोकसेवेचा कठिण धर्म.

" केवळ सेवाभावनेनें, सार्वजनिक सेवा करणें म्हणजे तरवारीच्या धारेवर चढण्याप्रमाणें आहे. लोकसेवक स्तुति स्वीकारण्यास तयार होतो, तर निंदेच्या वेळीं त्यानें तोंड कां लपवावयाचें ?"

—द. आफ्रिका सत्याग्रह, १९२१–२३

## चारित्र्यहीन व्यक्ति.

" धन्याशिवाय महाल ज्याप्रमाणें ओसाड भासतो, त्याप्रमाणेंच चारित्र्यहीन माणूस आणि त्याची संपत्ति ( त्याज्य ) मानली पाहिजे."

—द. आफ्रिका सत्याग्रह, १९२४.

## श्रद्धा चिरडली जाऊं शकत नाहीं.

" माणसाची श्रद्धा अथवा धैर्य कोणीहि चिरडूं शकत नाहीं."

x x x

## युद्धच विजय आहे!

“ एकाक्ष्या सैनिकाला प्रत्यक्ष युद्धच विजयासमान आहे. ”

x x x

## अविश्वास सुद्धां भ्याडपणाची खूण आहे.

“ अविश्वास सुद्धां भ्याडपणाची खूण आहे. ”

## “ निर्बलाची शक्ति राम. ”

“ जेव्हां मनुष्य स्वतःला रजःकणापेक्षां क्षुद्र मानतो, तेव्हां ईश्वर त्याला मदत करतो. निर्बलालाच ईश्वर बल देतो. ”

—द आ सत्याग्रह, १९२४.

## सूक्ष्म हिंसा.

“ वाईट विचार, हिंसा आहे. उतावीळपणा हिंसा आहे. दुसऱ्याचें वाईट चिंतणें हिंसा आहे. जगाला ज्या वस्तूची आवश्यकता आहे, तिच्यावर ताबा ठेवणेंहि हिंसा आहे. ”

—येरवडा जेल, २२-७-३०

## ब्रह्मचर्य.

“ विषयाचा निरोधच ब्रह्मचर्य होय. ”

—येरवडा जेल, ५-८-३७.

## व्रतभंग.

“ कोणतीहि वस्तु चवीकरितां चाखणें म्हणजे व्रतभंग होय. ”

—येरवडा जेल, १२-८-३०.

## सूक्ष्म चोरी.

“ ज्या वस्तूची आपल्याला जरूरी नाहीं, ती वस्तु ज्याच्या मालकीची आहे, त्याची परवानगी घेऊन, घेणें सुद्धां चोरी आहे. अनावश्यक

अशी एकहि वस्तु घेतां कामा नये.........मनानें एखाद्याची वस्तु प्राप्त करण्याची इच्छा केली, अगर तीवर वाईट नजर ठेवली, तर ती सुद्धां चोरी आहे."

—येरवडा जेल, १९-८-३०

## आत्यंतिक अपरिग्रह.

"जो मन आणि कर्म यांनीं मोकळा आहे, त्याचाच अपरिग्रह आदर्शवत् होय. म्हणजे, तो पक्ष्याप्रमाणें घराशिवाय, वस्त्राशिवाय, अन्नाशिवाय भ्रमण करील......या अवधूत अवस्थेला फारच थोडे पोहचूं शकतात."

## अपरिग्रह खऱ्या सभ्यतेचें लक्षण आहे.

"खऱ्या सभ्यतेचें, खऱ्या सुधारणेचें लक्षण परिग्रह वाढण्यांत नाहीं, तर उलट तो विचार आणि इच्छापूर्वकतेनें कमी करण्यांत आहे. जों जों परिग्रह कमी होतो, तों तों खरें सुख, खरा संतोष वाढतो, सेवाशक्ति वाढते."

—येरवडा जेल, २६-८-३०.

## तलवार भीरुतेचें चिह्न आहे.

"तलवार शूरतेची खूण नाहीं, भीरुतेचें चिन्ह आहे."

## अभय.

"अभय-व्रताचें सर्वथा पालन जवळ जवळ अशक्य आहे. भय-मुक्ति तर, ज्याला आत्मसाक्षात्कार झाला आहे, त्यालाच प्राप्त होते. अभय, मोह-रहित अवस्थेची पराकाष्ठा आहे."

—येरवडा जेल, २-९-३०.

## नम्रता.

"नम्रतेचा अर्थ, अहंभावाचा आत्यंतिक क्षय."

## आत्यंतिक स्वदेशी.

" आत्म्याच्या बाबतींत स्वदेशी याचा अंतिम अर्थ, साऱ्या स्थूल संबंधापासून आत्यंतिक मुक्ति हा होय. देह सुद्धां त्याच्या ( आत्म्याच्या ) बाबतींत परदेशी होय."

—येरवडा जेल, ७–१०–३०.

# ४

# विविध विचार

## दुसरेहि बरोबर असूं शकतात.

" दुसऱ्याचे विचार चूक आहेत, आणि फक्त आपलेच बरोबर आहेत, तसेंच आपल्या विचारांप्रमाणें जो वागत नाहीं तो आपला शत्रु आहे, असें मानणें योग्य नव्हे."

## वंग-भंग.

" वंगभंगानें इंग्रजी सत्तेला जसा हादरा बसला, तसा कशानेंहि बसला नाहीं."

## असंतोष सुधारणेचें मूळ आहे.

" प्रत्येक सुधारणेचे वेळीं असंतोष होणें आवश्यक आहे."

## पार्लमेंटची आई.

" जिला पार्लमेन्टची आई म्हणतात ती तर वंध्या आहे."

## इंग्लंडच्या अनुकरणांत सर्वनाश.

" माझें ठाम मत आहे कीं, जर हिंदुस्थाननें इंग्लडचें अनुकरण केलें तर त्याचा सर्वनाश होईल."

## युरोपीय संस्कृति.

" ही ( युरोपीय ) संस्कृति वस्तुतः संस्कृतिच नाहीं. आणि तिच्यामुळें युरोपांतील राष्ट्रांचा दिवसेंदिवस नाश होत चालला आहे. ही संस्कृति अशी आहे कीं, जर आपण धीर धरला तर शेवटीं या संस्कृतीची आग लावणारे स्वतःच त्या आगींत जळून खाक होतील.........या संस्कृतीनें इंग्रजी राष्ट्राला कीड लागली आहे. ही संस्कृति नाशकारी आणि नाशमान आहे. तिच्या पासून दूर राहण्यांतच कल्याण आहे."

## आधुनिक संस्कृतीनें दबलेला भारत.

" हें तर माझें पक्कें मत आहे कीं, हिंदुस्थान इंग्रजांच्यामुळें नाहीं तर उलट आजकालच्या संस्कृतीच्या ओझ्याखालीं दबला आहे. ह्या राक्षसी तडाख्यांत तो सांपडला आहे. (फक्त) या वेळीं त्याला वांचविण्याची युक्ति निघूं शकेल, पण जसजसे दिवस जात आहेत, तसा तो हातांतून जात आहे. मला धर्म प्रिय आहे. म्हणूनच मला दुःख होत आहे कीं, हिंदुस्थान धर्मभ्रष्ट होत आहे. तेथें धर्म याच अर्थानें आहे कीं,............ जो धर्म सर्व धर्मांना आधारभूत आहे. खरा प्रकार असा आहे कीं, आपण ईश्वरापासून विमुख होत आहोंत."

## सामाजिक पाखंड विरुद्ध धार्मिक पाखंड.

"......मी हें सुद्धां म्हणावयाला तयार आहें कीं, सामाजिक पाखंडापेक्षां धार्मिक पाखंड अधिक चांगलें.........सभ्यतेच्या आगींत भस्म होणाऱ्यांची सीमा नाहीं, आणि मजा ही कीं, ते तिला ( आगीला ) चांगली समजून तिच्यांत उडी घालतात ! वस्तुतः ते धर्मांत रहात नाहींत, समाजांत रहात नाहींत. सभ्यता तर उंदराप्रमाणें आंतून आंतून कुरतडत आहे, पण आपल्याला (त्याच वेळीं) गुदगुदल्या करीत आहे. या वेळीं तिचा प्रभाव दिसून येत नाहीं. पण ज्या वेळीं आपल्याला तिचा पूर्ण परिणाम दिसून येईल, तेव्हां असें कळून येईल कीं, आधुनिक सभ्यतेपेक्षां धार्मिक

अंधविश्वास फारच कमी हानिकारक आहे. मी असें नाहीं म्हणत कीं, या अंधविश्वास ठेवणाऱ्यांना किंवा पाखंड्यांना मोकळे सोडावें. आपण आपल्या पूर्ण शक्तीनें त्यांना दूर करण्याचा प्रयत्न करूं, पण धर्माची उपेक्षा करून नाहीं, तर उलट.........खऱ्या अर्थानें, धर्म पालन करूनच करूं शकूं."

## निर्भयता बल आहे.

"......शक्ति निर्भयतेमध्यें असते. शरिरावर, मांस वाढविण्यांत नाहीं."

## विश्वास-संपादन.

"......ज्या माणसानें दुसऱ्याच्या मनांत विश्वास निर्माण केला आहे, तो या जगांत कांहींहि गमवत नाहीं."

## वकिलांनीं पेरलेलें विष.

"........वकिलांनीं हिंदुस्थानाला गुलामीमध्यें टाकलें आहे आणि हिंदु-मुसलमानांचीं भांडणें वाढवून इंग्रजी राज्य अढळ केलें आहे."

## भारतीय संस्कृतीची श्रेष्ठता.

"........मी तर असें मानतों कीं, आपल्या (भारतीय) संस्कृतीपेक्षां श्रेष्ठ संस्कृति जगांत नाहीं."

## न होणारी गोष्ट सुद्धां होते.

"जें इतिहासांत नाहीं, तें झालें नाहीं आणि होऊं शकणार नाहीं, असें समजणें म्हणजे मानवी शक्तीवर अविश्वास प्रदर्शित करणें होय."

## हिंसा भ्याडपणा आहे.

" भ्याडपणाचें कारण, आपण दुसऱ्याच्या हिंसेचा विचार करतों."

## फक्त ईश्वराचें भय.

" ज्या माणसाला आपल्या मनुष्यत्वाची जाणीव आहे, तो ईश्वराशिवाय दुसऱ्या कोणालाहि घाबरत नाहीं."

## स्वराज्याची किल्ली.

" आणि जर माणसानें एक वेळ ओळखलें कीं, अयोग्य कायद्यांचें पालन करणें दुर्बलता आहे, तर कोणतीहि पाशवी शक्ति त्याला विवश करूं शकणार नाहीं. हीच स्वराज्याची किल्ली आहे."

## यंत्रांचे कारखाने म्हणजे सर्पाचें बिळ !

" यंत्रांचे कारखाने सर्पाच्या बिळाप्रमाणें आहेत. त्याच्यांत एकच नव्हे तर हजारों साप भरलेले आहेत."

## सेवेकरितां ब्रह्मचर्य.

" बऱ्याचशा अनुभवानंतर मी या निर्णयावर आलों आहें कीं, देशसेवेकरितां जे लोक सत्याग्रही होऊं इच्छितात त्यांनीं ब्रह्मचर्य पालन करणें आवश्यक आहे. सत्याचरण केलें पाहिजे आणि निर्भय झालें पाहिजे."

—१९०८ हिंद स्वराज्य.

## " उपाशी माणसाचा ईश्वर—अन्न."

" जीं माणसें उपाशी मरत आहेत, आणि बेकार आहेत, त्यांचा परमेश्वर म्हणजे योग्य कामधंदा आणि त्यांना मिळणारें अन्न हें होय."

## श्रम न करणारा चोर होय.

" जो आपल्या वाट्याचें काम केल्याशिवाय भोजन करतो तो चोर होय."

## प्रेमाची हांक

" चरख्याचा आवाज, इतर सर्व आवाजांपेक्षां मधुर आहे. कारण ती प्रेमाची हांक आहे आणि प्रेम म्हणजेच स्वराज्य ! "

## आशा हीच आस्तिकता.

" आशावाद आस्तिकता आहे. फक्त नास्तिकच निराशावादी होऊं शकतो.

—नवजीवन १९३१.

## आत्म-निरीक्षण.

" माझ्या समोर जेव्हां कोणी असत्य बोलतो, तेव्हां मला त्याचा राग येण्याच्या ऐवजीं माझा मलाच राग येतो. कारण मी ओळखतों कीं, आता माझ्यांत सुद्धां असत्य वास करीत आहे. "

—नवजीवन १९२१.

## प्रेमहीन असहयोग राक्षसी होय.

" ज्या असहयोगांत प्रेम नाहीं, तें राक्षसी होय. ज्यांत प्रेम आहे तें ईश्वरी होय. "

—नवजीवन १९२१.

## दुःखाशिवाय सुख नाहीं.

" ज्याप्रमाणें भूक असल्याशिवाय भोजन केल्यानें तें पचत नाहीं, त्याप्रमाणें दुःखाशिवाय सुख सुद्धां पचत नाहीं. "

—नवजीवन १९२१.

## संदेहग्रस्ताला स्थान नाहीं.

" ज्याला संशय आहे, त्याला कोठेंहि स्थान नाहीं. त्याचा नाश निश्चित आहे. तो मार्ग चालत असतांहि चालत नाहीं, कारण त्याला कळतच नाहीं कीं, आपण कोठें जात आहों. "

—नवजीवन १९२१.

## मी श्रद्धावान् आहें.

"मी त्रिकालदर्शी नाहीं. मी देव नाहीं. मी श्रद्धावान् आहें. मी ईश्वराला सर्वशक्तिमान् मानतों. माझ्या हृदयांत तो केव्हां उलथापालथ करील तें कोण सांगूं शकेल ?"

## पवित्रता आणि निर्भयता.

"जेथें पावित्र्य आहे, तेथेंच निर्भयता असूं शकते."

## स्त्री-पुरुष ह्या दोघांनाहि लज्जास्पद.

"स्त्रिया स्वतःच्या पावित्र्याचें रक्षण करण्याला लायक नाहींत ही कल्पना चुकीची आहे. हें अनुभवाच्या विरुद्ध आहे. स्त्री आणि पुरुष या दोहोंनाहि लज्जास्पद आहे."

## पवित्र स्त्री अजेय आहे.

"ज्या स्त्रीला आपल्या पावित्र्याची कल्पना आहे, तिच्यावर बलात्कार करणारा पुरुष आजपर्यंत जन्माला आला नाहीं, आणि येणारहि नाहीं."

## मृत्यूला तयार असलेली स्त्री.

"जी स्त्री मृत्यूला तयार आहे, तिच्या समोर कोणता दुष्ट एक तरी अपशब्द बोलूं शकेल ? तिच्या डोळ्यांत इतकें तेज असतें कीं, समोर उभा राहणारा व्यभिचारी पुरुष तिथेंच्या तिथें खाक होईल !"

## विनोदवृत्ति.

"जर माझ्यांत विनोदी वृत्ति नसती तर कधीं तरी मीं आत्महत्या केली असती."

—यं. इं. १९२१.

## चुका आणि सुधारणा.

" माझ्या अनुभवानें तर मला हेंच शिकविलें आहे कीं, आपण ह्या गोष्टी पूर्ण नम्रतेनें ओळखल्या पाहिजेत; असेंच समजा कीं, आपल्या चुकांच्या बरोबर लढणें म्हणजेच जीवन होय."

—यं. इं. हिं. न. जी. १९-८-२१.

## नवजीवन.

" ......प्रत्येक आठवड्याच्या 'नवजीवन' मध्यें माझें मन उकलण्याचा प्रयत्न केला आहे. एकसुद्धां शब्द मीं ईश्वराला साक्षी ठेवल्याशिवाय लिहिला नाहीं."

—हिं. न. जी. २-७-२७, पृष्ठ ३७३.

## रिवाज.

" त्याज्य चालीरीतींच्या स्वाधीन होणें पामरता आहे. त्यांनां विरोध करणें हा पुरुषार्थ आहे."

—हिं. न. जी. १०-६-२५.

## विडी.

" ......येवढीशी विडी ! पण ती जगाचा कसा नाश करत आहे ! विडीची सुद्धां नशा कांहीं अंशीं मद्यपानापेक्षांहि अधिक हानिकारक आहे. कारण तिचे दुष्परिणाम माणसाच्या लक्षांत चटकन येत नाहींत. धूम्रपान अयोग्य मानलें जात नाहीं, उलट सभ्य म्हणवून घेणारेच त्याच्या फार आहारीं गेले आहेत."

—हिं. न. जी. ३१-१२-२६, पृष्ठ १५४.

## शब्दांची अर्जित शक्ति.

" ......राम ह्या शब्दाच्या उच्चारानें कोट्यवधि हिंदूंवर चटकन परिणाम होतो आणि 'गॉड' ह्या शब्दाचा अर्थ समजल्यावर

सुद्धां त्याचा त्यांच्यावर परिणाम होणार नाहीं. अनंतकाल उपयोग केल्यामुळें आणि त्याबरोबर त्यांतील पावित्र्यामुळें शब्दांना शक्ति प्राप्त होते."

—हिं. न. जी. १९–६–३६, पृष्ठ ३३९.

## मित्रता.

"......मैत्रींत अद्वैतभाव असतो. अशी मैत्री जगांत फारच कमी आढळते."

× × ×

## अभिन्न-मैत्री.

"......माझ्या मतें अभिन्न-मित्रता अनिष्ट आहे, कारण मनुष्य दोषांना चटकन बळी पडतो. गुणग्रहणाला फारच प्रयास पडतात."

—हिं. आ. भाग १, प्रकरण ६, पृष्ठ २१

## संस्था आणि हिशोब.

"......सविस्तर हिशोब हें प्रत्येक संस्थेचें नाक आहे. त्याच्याशिवाय संस्था शेवटीं प्रतिष्ठाहीन होते...."

—हिं. आ. भाग २, प्रकरण १९ पृ. १६८.

## प्रतिपक्षाबरोबर व्यवहार.

"माझा अनुभव हेंच सांगतो कीं, प्रतिपक्षाबरोबर न्यायानें वागल्यानें, आपल्याला लवकर न्याय मिळूं शकतो."

—हिं. आ. भाग २, प्रकरण २९, पृ. २०१.

## पूजा.

"सुगंध जाळून आपण सुगंध पसरवितों, त्याप्रमाणें पूजा करून आपण सुगंधमय बनतों."

—हिं. न. जी. १५–९–२७, पृष्ठ २६

## ईश्वर सर्वव्यापी आहे.

"मानवतेच्या सेवेद्वारा मी ईश्वराचा साक्षात्कार करून घेण्याचा प्रयत्न करीत आहें. कारण मला ठाऊक आहे कीं, ईश्वर स्वर्गांत नाहीं आणि पाताळांतहि नाहीं, पण प्रत्येकाच्या हृदयांत आहे."

## डोळे.

"..... डोळे साऱ्या शरीराचे दीपक आहेत."

—हिं. न. जी. १२-४-२८.

## फिरोजशाह, लोकमान्य आणि गोखले.

"......सर फिरोजशाह मला हिमालयाप्रमाणें वाटतात, लोकमान्य समुद्राप्रमाणें वाटतात. गोखले गंगेप्रमाणें वाटतात, तींत मी स्नान करीत होतों. हिमालयावर चढणें कठीण आहे. समुद्रांत बुडण्याचें भय असतें, पण गंगेच्या पात्रांत मी खेळूं शकतों; तिच्यांतल्या होडींत बसून तरूं शकतों."

—हिं. आ. कथा, भाग २ पृष्ठ १९७.

## ओरिसा.

"......भारतवर्षांत, ओरिसा माझी प्रियतम भूमि आहे."

—गांधीसेवासंघसंमेलन, डेलांग २५-३-३८.

## महाराष्ट्र.

'महाराष्ट्रांत त्याग आहे, पण श्रद्धा नाहीं."

—चिपळूणकरांच्या मूर्तीचे उद्घाटनसमयीं, हिं. न. जी. १४-९-२४.

"खऱ्या परिश्रमी सेवकांना, मधमाशीला जसें मधाचें पोळें, त्याप्रमाणें महाराष्ट्र आहे."

—ह. से. ७-११-३६.

## अतिशयोक्ति.

" अतिशयोक्ति सुद्धां असत्य आहे. "

—ह से. १७-३-३३.

## आत्मरक्षण.

" जेथें प्राणार्पणाची तयारी नसेल, तेथें आत्मरक्षणाचा मार्ग हाच एक प्रतिष्ठित मार्ग आहे. "

—ह. से. २९-७-३६, पृष्ठ १८५.

## युवावस्था.

" निर्दोष युवावस्था ही एक अनमोल ठेव आहे. "

—ह. से. २७-९-३५, पृष्ठ २५६.

## गोसेवा.

" गोसेवेसंबंधीं मीं माझ्या मनांतली गोष्ट सांगितली तर आपण स्फुंदूं लागाल आणि मीहि रडूं लागेन—इतकें माझें हृदय भारावून गेलें आहे. "

—गां. से. सं. सम्मेलन, सावली, ६ मार्च ३६.

## मौनाची भाषा.

" कधीं कधीं ही अधिक बोलकी असते. "

—ह. से. २५-२-३९ पृष्ठ १३.

## निर्बल कोण ?

" ज्याला निर्बल संबोधितात तो निर्बल नव्हे, तर स्वतःला जो निर्बल समजतो तो निर्बल होय. "

—ह. से. ४-३-३९ पृष्ठ २२.

## " लोटाभर गंगेच्या पाण्यानें, गढुळ तलाव शुद्ध होत नाहीं. "

" माझ्याजवळ जर लोटाभर गंगेचें पाणी असेल, तर तें तलावांतील घाण पाण्यांत टाकून, तें पाणी शुद्ध होईल असें मानण्याचा मूर्खपणा मी करणार नाहीं. "

## प्रगतीचें पहिलें पाऊल.

" स्वतःची अपूर्णता जाणणें हेंच प्रगतीचें पहिलें पाऊल. "

## मूर्ख-शिरोमणि कोण ?

" आपल्याला कांहीं येत नाहीं, हें ज्याला ठाऊक नाहीं, तो महामूर्ख-शिरोमणि होय."

—मालिकांदा ( बंगाल ) २२-२-४०.

## गुंड आणि भ्याड.

" गुंड एक अपशकुन आहे, आणि कांहीं प्रसंगीं भ्याडतेचा प्रतिसाद आहे. "

× × ×

" ......ही गोष्ट खरी आहे कीं, भ्याडांच्या हृदयांत न्याय-भावनेला स्थान नसतें. त्यांना धमकी म्हणजे क्रियात्मक बल-प्रयोगा-समोर मान झुकवावयाची हेंच फक्त ठाऊक असतें. भ्याड आणि गुंड या दोहोंत कोणाला चांगलें मानावयाचें हे मला ठाऊक नाहीं. दोघेहि एकमेकांपेक्षां हीन आहेत; फरक इतकाच आहे कीं, गुंड नेहमी भ्याडाचा पाठपुरावा करतो. "

—ह. से. २४-२-४० पृष्ठ १.

## फांशी.

" ......फांशीच्या शिक्षा मी अहिंसेच्या विरुद्ध मानतों."

—ह. से. २७-४-४० पृष्ठ ७.

## अपराध एक रोग आहे.

" ......प्रत्येक गुन्हा हा एक प्रकारचा रोग आहे. आणि त्या दृष्टीनेंच त्यावर इलाज केला पाहिजे."

—ह. से. २७-४-४० पृष्ठ ८७.

## आत्महत्या पाप आहे.

"जगण्याची इच्छा अविवेकपूर्ण नाहीं, ती प्राकृतिक आहे. जगण्याची इच्छा म्हणजे वंचना नव्हे तर वास्तवता आहे. त्याचप्रमाणें जीवनाचा एक हेतु-उद्देशहि आहे. तो उद्देश असफल करणें हें पाप होय. याचकरितां आत्महत्येला पाप मानलें आहे.

—ह. से. १-६-४० पृष्ठ १३०.

## गुंड.

" गुंड भ्याड लोकांतच फोफावतात."

—ह. से. ८-६-४०, पृष्ठ १३७.

"आज तर कॉंग्रेस हिंदुस्थानच्या आशेचें आणि विश्वासाचें प्रधान स्थान आहे."

—सेवाग्राम, ११-६-४०.

x x x

## नौखाली.

"ईश्वराला फक्त 'खुदाच' म्हटलें पाहिजे, असें मुसलमानांना वाटतें. असहिष्णु वृत्तीमुळेंच नौखाली उद्भवली. खुदा व राम हीं एकाच देवाचीं नांवें आहेत.

x x x

## शिखांचा आदर्श.

" ......त्यांनीं आपल्या कृपाणांचा त्याग करून अहिंसेचा आधार स्वीकारला पाहिजे."

—सायंप्रार्थना, मसीमपूर ८-१-१९४७.

### बंगाल.

" ......बंगाल ही मरुभूमि आहे. येथील जमीन सुपीक. पाणी मुबलक. असें असून जनता फक्त सुपाऱ्या व नारळ पिकवून कसें बसें जीवन कंठत आहे. या ऐवजीं थोडेंसें शिक्षण घेऊन आपण जमिनीची मशागत केलीत तर खेड्याचें उत्पादन कित्येक पटीनीं वाढेल व आमचीं खेडीं शांतता व उत्कर्षाचीं माहेरघरें बनतील. अशी सर्व खेडीं एकत्र आलीं कीं देशाचा मोहरा बदललाच."

# १९ मानस-दर्शन.

## असं वाटतं कीं, मी माझा मार्ग चुकलों.

## ( १९२४ )

" ......असं वाटतं कीं, 'प्रेम माझ्यापासून दूर जात आहे, आणि मी माझा मार्ग चुकलों असून इतस्ततः भटकत आहें.' मला असा अनुभव येत आहे कीं, माझा सखा माझ्या आसपास निरंतर आहे—पण तरीसुद्धां तो दूर भासतो, कारण तो मला स्पष्ट मार्गदर्शन करीत नाहीं आणि आज्ञा देत नाहीं. उलट गोपींना छळणाऱ्या खोडकर कृष्णाप्रमाणें चिडवत आहे. कधीं दिसतो, कधीं लपतो, आणि कधीं परत दिसतो ! जेव्हां मला माझ्या डोळ्यासमोर स्थिर आणि निश्चित प्रकाश दिसेल, तेव्हां मला माझा मार्ग स्पष्ट दिसेल आणि नंतर मी माझ्या अनुयायांना सांगेन कीं या, आतां माझ्या मागें मागें चला......"

—हिं. न. जी. ७-९-२४

x x x

" ......तुम्ही मला महात्मा मानतां, त्याचें कारण माझें सत्य नाहीं, शांति नाहीं, तर मला दीन-दुबळ्याविषयीं वाटणारें अगाध प्रेम हें होय. कांहींहि होऊं दे, पण मी ह्या दुबळ्या नरकंगालांना विसरणार

नाहीं. त्यांना सोडून दूर जाणार नाहीं. यावरून आपण समजूं शकतां कीं, गांधीचें कार्य कोणतें आहे. याकरितां मी तुम्हांला सांगत आहें कीं, जर तुमचें माझ्यावर प्रेम असेल तर ज्याच्यावर मी प्रेम करतों त्या खेड्यांतल्या लोकांना अन्नवस्त्राशिवाय राहावें लागणार नाहीं, असा प्रयत्न करा. त्या दीनदुबळ्यांचें तुम्ही भजन करा. कशा तऱ्हेनें भजन कराल ? मी सांगतों, जो खोटी माळ जपतो त्याला कधींहि मुक्ति मिळणार नाहीं, उलट अधोगति प्राप्त होईल. कारण बाहेरून माला जपत असतां आंत दुष्ट भावना राहतील. चरखा फिरवीत असतांही माझें मन मलीन होण्याचा संभव आहे, असें मी मानतों. पण मनोमालिन्य निर्माण होऊन सुद्धां, कांतण्याचें बाह्य फल मिळतें. मला तुम्हांला फक्त हेंच सांगावयाचें आहे कीं, ईश्वर अथवा खुदा याचें नांव घेऊन मी भारताच्या गरीब बापड्यांकरितां सूत काततों आणि आपल्यालाहि असें करण्याची प्रार्थना करीत आहें."

## दीनदुबळ्यांशीं तादात्म्य.

### ( १९२४ )

"......माझी नक्की खात्री आहे कीं, तुमचें माझ्यावर जें प्रेम आहे त्याचें दुसरें कारण कांहींहि नसून, हेंच आहे कीं, मी दीन-दुःखी लोकांशीं तादात्म्य पावतों. मी भंग्याच्या सान्निध्यांत भंगी होऊं शकतों, धेडाच्या संगतींत धेड होऊन काम करूं शकतों. जर या जन्मांत अस्पृश्यता नष्ट झाली नाहीं, आणि मला दुसरा जन्म घ्यावा लागला तर माझा भंग्याच्या घरांत जन्म व्हावा अशी माझी इच्छा आहे. जर अस्पृश्यतेकरितां, मला हिंदुधर्माचा त्याग करावा लागला तर मी तो जरूर करीन आणि इस्लामधर्म स्वीकारीन अगर बाप्तिस्मा घेईन. पण माझी तर माझ्या धर्मावर इतकी श्रद्धा आहे कीं, त्यांतच मी जगेन आणि मरेन. तेव्हां त्याकरितांहि जर मला पुनः जन्म घ्यावा लागला तर तो भंग्याच्या घरांत घेईन."

—हिं. न. जी. ७-९-२४, पृष्ठ ३०.

## प्रेमाचीं दोन रूपें.

(१९२४)

"......मी आतां इतका थकलों आहे कीं, मी अधिक काहीं सांगूं शकत नाहीं. माझ्या स्वभावाचीं दोन अंगें आहेत. एक उग्र आणि दुसरें शांत. उग्र अर्थात् भयंकर रूपाचें कारण, माझे अनेक सहकारी दूर झाले आहेत. माझी पत्नी, पुत्र आणि माझीं स्वर्गीय जिवलग माणसें यांमध्यें अंतर पडलें होतें. दुसऱ्या रूपांत तर पुरेपूर प्रेमच प्रेम आहे. पहिल्या रूपांत प्रेम शोधावें लागेल. माझ्याप्रमाणें कठोर आत्म-निरीक्षक कदाचित् दुसरेहि असतील. माझी खात्री आहे कीं, पहिल्या रूपांत द्वेष जराहि नाहीं, परंतु हिमालया इतक्या भयंकर चुका होण्याची शक्यता आहे. कारण मानसशास्त्रज्ञ असें सांगतात कीं दोहोंचें उत्पत्तिस्थान एकच आहे. अपरंपार प्रेम भीषण रूप धारण करूं शकतें. जर मी माझ्या पत्नीला दुःखी केलें आहे, तर त्यामुळें माझें हृदय विह्वळ झालें आहे. दक्षिण आफ्रिकेंत मीं आपल्या इंग्रज साथीदारांना दुःखी केलें, त्यामुळें मला अधिक दुःख झालें. माझ्या येथील कार्यानें इंग्रजांचें मन दुखावलें आहे, तर मला अधिक दुःख झालें आहे.

"मी इंग्रजाना हें सांगूं इच्छितों कीं, तुम्ही आम्हांला खूप शोषिलें आहे, आजहि शोषीत आहांत, पण तुम्हांला त्याची कल्पना नाहीं. तुम्ही चोरी आणि अत्याचार करीत आहांत. याद राखा— पश्चात्ताप होईल!

"इंग्लंडच्या नेत्रांत अंजन घालण्याकरितां मला माझें भयंकर रूप प्रकट करावें लागलें आहे. याचें कारण हें नाहीं कीं मी त्यांना कमी लेखतों, तर उलट मी त्यांना स्वजनाप्रमाणें मानतों. पण आतां माझें भीषण रूप नाहींसें झालें. पं. मोतीलालनीं म्हटलें आहे कीं, आतां तर माझ्यांत लढाऊ वृत्तिहि राहिली नाहीं. मी तर शरणागत आहें. माझ्या घरांत फूट पडली आहे, कटुता आणि शत्रुता वाढत आहे,

तेव्हां दुसरा कसला विचार येऊं शकणार ? मला तर ही परिस्थिति सुधारण्याकरितां भगीरथ प्रयत्न करावे लागतील. मी मान्य करतों कीं मी हरलों. मी तर ईश्वराजवळ इतकीच प्रार्थना करीत आहें कीं, मला सत्पंथ दाखव. माझ्यांत राग, द्वेष वा क्रोध यांचा जर कांहीं अंश लपून बसला असेल तर काढून टाक आणि मला असा संदेश दे कीं, ज्यांत सारे लोक उत्साहानें सामील होतील."

—हिं. न. जी. ७—९--२४, पृष्ठ ३१

## 'महात्मा नांवावर—'

## (१९२४)

[ऑगस्ट १९२४ च्या शेवटीं गांधीजींचें भाषण मुंबईमध्यें झालें. सभेंत निरनिराळ्या पंथाचे वक्ते आणि श्रोते एकत्र झाले होते. श्री. जमनादास द्वारकादासनीं आपल्या भाषणांत गांधीजींच्या विषयीं 'गांधीजी' असा उल्लेख केला. त्या बरोबर कांहीं लोक ओरडूं लागले 'महात्माजी' म्हणा. त्यावर गांधीजींनी आपल्या भाषणांत आपलें हृदय उघडें केलें.]

"......'महात्मा' या नांवावर पुष्कळ वाह्यात चर्चा झाली. मला महात्मा शब्दाबद्दल तिरस्कार वाटतो तरीसुद्धां जेव्हां कुणीतरी असा हट्ट धरतो कीं, माझ्या बाबतींत 'महात्मा' शब्दाचा उपयोग केला पाहिजे, तेव्हां मला असह्य वेदना होतात. जिवंत राहणें जड वाटूं लागतें. आश्रमांत माझें जीवन विकसतें. तेथील प्रत्येक लहान थोर स्त्री-पुरुषास सक्त आज्ञा आहे कीं, महात्मा शब्दाचा प्रयोग होतां नये. कोणत्या पत्रांतहि माझा उल्लेख 'महात्मा' शब्द द्वारा होतां नये. माझा उल्लेख फक्त गांधी वा गांधीजी असा झाला पाहिजे. आपला संग्राम शांतिमय आहे. विनय आणि शिष्टाचार यांशिवाय शांति कशी शक्य आहे ? विनयहीन शांति कृत्रिम शांति होईल. आपण तर चैतन्याचे पुजारी आहोंत, आणि चैतन्यमय शांतींत विवेक, शिष्टता, विनय अवश्य हवा, म्हणून माझी अशी विनंति आहे कीं, ज्यांनीं

जम्नादासजींच्या भाषणांत अडथळा निर्माण केला त्या सर्वांनीं त्यांची माफी मागावी. आपल्या प्रगतीमध्यें अडथळा निर्माण करणारी जर सर्वांत मोठी कोणती गोष्ट असेल तर ती म्हणजे असहिष्णुता. मी ही परिस्थिति नाहींशी करण्याचा प्रयत्न करीत आहें. मी क्षुद्र प्राणी आहें. मोठा प्राणी नाहीं. जर मोठा असतों तर ह्या असहिष्णुतेला रोखूं शकलों असतों."

"हिंदुस्थान माझ्याकडे कांहींसा आशेनें पहात आहे. मी आपल्याला फसवूं इच्छित नाहीं. आपण केलेली स्तुति ऐकून, त्या स्तुतीला मी लायक आहें असें मी मानत नाहीं. माझ्या स्तुतीचा अर्थ इतकाच कीं, माझ्याकडून अधिक गोष्टीची अपेक्षा केली जात आहे— अधिक प्रेमाची, अधिक त्यागाची, अधिक सेवेची अपेक्षा केली जात आहे. पण मी हें कशा तऱ्हेनें करूं शकेन? माझा देह विकलित झाला आहे. त्याचें कारण माझें पाप. पाप केल्याशिवाय माणूस रोगी होऊं शकत नाहीं. मी आजारी होतों याचें कारण माझें पापच. आणि जोंपर्यंत माझ्या हातून असें पाप जाणून बुजून अथवा अजाणतां होत आहे, तोंपर्यंत असेंच समजलें पाहिजे कीं, मी अपूर्ण मनुष्य आहें. अपूर्ण मनुष्य संपूर्ण ( योग्य ) सल्ला कसा देऊं शकेल ?......"

—हिं. न. जी. ७-९-२४.

## [ "सांप्रदायिक ऐक्याकरितां २१ दिवसांचा उपवास" ]

"हल्लीं देशांत दुर्घटना होत आहेत, त्या मला असह्य होत आहेत, आणि त्या बाबतींतील माझी असहाय्यता मला अधिक असह्य होत आहे. माझा धर्म मला सांगत आहे कीं, अनिवार्य संकट आलें आणि कष्ट असह्य झाले कीं, उपवास आणि प्रार्थना केली पाहिजे. माझ्या लिखाणानें अगर सांगण्यानें सुद्धां हिंदु आणि मुसलमानांच्या मध्यें ऐक्य होऊं शकलें नाहीं, हें मी आतां पहात आहें. याकरितांच मी आजपासून २१ दिवसांच्या उपवासाला प्रारंभ करीत आहें. या गोष्टीला ( उपवासाला ) प्रसिद्धि देण्याचें एकच प्रयोजन आहे. मला आशा वाटते कीं, हें प्रायश्चित्त म्हणजे ज्यांच्या मीलनाकरितां मी कार्य करीत

आहें त्या हिंदु-मुसलमानांनीं आत्मघात करून घेऊं नये म्हणून परिणामकारक प्रार्थना होय. मी इंग्रजांसकट सर्व जमातींच्या पुढाऱ्यांना सविनय प्रार्थना करीत आहें कीं, त्यांनीं मानव्य आणि धर्म यांकरितां, लांछनास्पद अशा या दंग्याचा शेवट करण्याकरितां त्यांनीं एकत्र जमून विचार करावा. आज तर असा भास होत आहे कीं, आपण ( हृदयस्थ ) ईश्वराला खालीं पदच्युत केला आहे! या, आपण परत पुनः त्याला हृदयरूपी सिंहासनावर अधिष्ठित करूं या."

## माझा उपवास.

"......मी कोणतेंहि काम प्रार्थना केल्याशिवाय करीत नाहीं. मनुष्य स्खलनशील आहे. तो कधींच निर्भ्रांत असूं शकत नाहीं. अचूक मार्गदर्शनाकरितां माणसाचें अंतःकरण पूर्ण निर्दोष आणि दुष्कर्म करण्यास असमर्थ असलें पाहिजे. चुकणारा, फसणारा, पडणारा आणि उठून प्रयत्न करणारा माझा आत्मा असा अपूर्ण आहे. म्हणून मी माझ्यावर आणि आपल्यावर प्रयोग करत करतच पुढें जाऊं शकतों. म्हणूनच मी ईश्वर आणि मनुष्य यांच्यांत एकत्व मानतों. आमचे देह जरी भिन्न-भिन्न असले तरी आत्मा एकच आहे. परावर्तित सूर्यकिरणें अनेक भासतात. पण त्यांचा आधार–उद्गम एकच आहे. म्हणून मी मला अत्यंत दुष्टात्म्याहूनहि निराळा मानत नाहीं. या परिस्थितींत मी, इच्छा असो अगर नसो, आपल्या सर्व सजातीयांना–माणसांना–माझ्या प्रयोगांत विनासायास सामील केल्याशिवाय राहूं शकत नाहीं. जीवन म्हणजे अनंत प्रयोगाची मालिका."

× × ×

## तपाचा महिमा.

[ १९२४ मधील २१ दिवसांच्या उपवासानंतर ]

"हिंदुधर्मांत तपश्चर्या पावलोपावलीं आहे. पार्वतीला जर शंकर हवा असेल तर तपश्चर्या आवश्यक आहे. शंकराला विसर पडला तेव्हां त्याला तप करावें लागलें. विश्वामित्र तर तपमूर्ति होते. रामचंद्र जेव्हां वनांत गेले तेव्हां भरतानें योगारूढ होऊन घोर तपश्चर्या केली आणि शरीर क्षीण करून घेतलें.

ईश्वर दुसऱ्या तऱ्हेनें माणसाची कसोटी पाहूं शकत नाहीं. जर आत्मा देहाहून भिन्न आहे तर देहाला कष्ट देऊनहि आत्मा प्रसन्न रहातो. अन्न हा शरीराचा खुराक आहे आणि ज्ञान आणि मनन आत्म्याचा खुराक आहे.

परंतु जर तपश्चर्येबरोबर श्रद्धा, भक्ति, नम्रता नसली तर तप म्हणजे निव्वळ कष्ट होय. तो ढोंगीपणाहि होईल."

—हिं. न. जी. १२–१०–२४, पृष्ठ ६५.

## मी एकटाच आहें.

" मी ह्या जगांत, चोहों बाजूंनीं भरलेल्या अंधःकारांतून, प्रकाशाकडे जाणारा रस्ता शोधत आहें. मला आशा वाटते कीं, जरी माझ्या बरोबर दोनच माणसें राहिलीं अगर कोणीच राहिलें नाहीं तरी मी विचलित होणार नाहीं. माझी ईश्वरावर पूर्ण श्रद्धा आहे आणि मी माणसावर एवढ्याच करितां विश्वास ठेवतों कीं, माझा ईश्वरावर पूर्ण विश्वास आहे म्हणून."

—हिं. न. जी. १४–१२–२४, पृष्ठ १४०.

## एकटा उरलों तरीहि—

" मी मुसलमानांचा केव्हांही शत्रु नव्हतों. आफ्रिकेंत मी दीर्घकाल राहिलों आहें. तेथील माझे सहकारी मुसलमानच आहेत. सायंप्रार्थनेला येणाऱ्या हिंदु व मुसलमान दोघांचीही संख्या हळुहळु रोडावत आहे. एक दिवस असाहि येईल कीं, मला एकट्यालाच प्रार्थना करावी लागेल. तथापि मी आपलें कार्य व ध्येय सोडणार नाहीं. माझा चरखा बरोबर घेऊन मी गांवोगांव हिंडेन. हें कार्य म्हणजे ईश्वरी सेवा आहे."

—सायंप्रार्थना नौखाली ता. ७–१–४७.

## माझा मार्ग.

" ......माझा मार्ग सरळ आहे. हिंसात्मक कार्यांत माझा उपयोग करून घेण्याचे माझे सर्व प्रयत्न खात्रीनें विफल होतील. माझ्याकडे

कांहींच गुप्त नाहीं. मी सत्याखेरीज कोणत्याच कुटिल नीतीला जाणत नाहीं. माझें एकच शस्त्र आहे—अहिंसा."

—हिं. न. जी. १४–१२–२४, पृष्ठ १४०.

## हिंदूंना—

"......ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांना मी सांगत आहें कीं, हिंदुस्तानाचा उद्धार जितका मुसलमानांवर अवलंबित नाहीं, जितका ईसायांच्यावर नाहीं, तितका ह्या गोष्टीवर आहे कीं, हिंदु आपल्या धर्माचें रक्षण कशा प्रकारें करीत आहेत? कारण मुसलमानांचा काशी-विश्वनाथ येथें नाहीं, मक्केंत आहे. ईसायांचा जेरूसलेममध्ये आहे. पण आपण तर हिंदुस्थानमध्येंच राहून मोक्षसाधन करूं शकता. ऋषि-मुनींनी आपल्याला सांगून ठेवलें आहे कीं, ही कर्मभूमि आहे, भोगभूमि नाहीं. हिंदुधर्म आज तराजूमध्यें असून त्याची जगातील सर्व धर्मांबरोबर तुलना होत आहे. आणि जी गोष्ट दया-धर्माच्या पलीकडे आहे, जी गोष्ट बुद्धीपलीकडे आहे, तिचा समावेश जर हिंदुधर्मात आला तर धर्माचा नाश निश्चित आहे. हिंदुधर्माच्या नावावर कितीतरी अज्ञान, पाखंडीपणा पसरत चालला आहे. या पाखंडपणा आणि अज्ञानाविरुद्ध, जर जरूर पडली तर मी एकटा लढेन, एकटा तपश्चर्या करीन, त्याचा जप करीत मरेन."

—हिं. न. जी. १५–१–२५.